# खुलाशाचे दोन शब्द

पुणें येथील 'भारत-इतिहास-संशोधक-मंडळा'तर्फे जें संशोधनाचें कार्य चालू आहे व या संस्थेंतील कार्यकर्त्यांनीं श्री शिव-चरित्र कार्यालय नांवाची विवक्षित कार्याकरितां समिति तात्पुरती अस्तित्वांत आणून त्यांच्यामार्फत छत्रपति श्रीशिवाजी महाराज यांच्या काळांची ऐतिहासिक सामुग्री गोळा करून जी प्रसिद्ध केली ती पाहून श्रीमंत सर नानासाहेब घोरपडे, राजेसाहेब संस्थान मुधोळ, यांनीं छत्रपति श्रीशिवाजीमहाराज यांच्या वेळच्या ऐतिहासिक साधनांचें संशोधन व प्रकाशन आणखी कांहीं व्हावें म्हणून पांच हजार रुपयांची रकम या कार्याकडे खर्चण्याकरतां भारत-इतिहास-संशोधक-मंडळाकडे पाठविली. श्री. राजेसाहेब यांनीं सक्रिय प्रोत्साहन दिलें त्याबद्दल भा. इ. सं. मंडळ श्रीमंतांचें सदैव आभारी राहील. ही रकम श्रीमंत राजेसाहेब संस्थान मुधोळ यांचेकडून आल्यावर भारत-इतिहास-संशोधक-मंडळाच्या कारभारी मंडळानें या विवक्षित कामाकरतां एक उपसमिती खालील सह्या करणारांची नेमली असून तिच्या मार्फत शिवछत्रपतिकालीन ऐतिहासिक साधनें जमविण्याचें, त्यांच्या संशोधनाचें व प्रकाशनाचें काम चालू केलें आहे. श्री शिवचरित्र-कार्यालयाचे मार्फत जें काम पूर्वी अपुरें राहिलें होतें तें पुरें करण्याचें या उपसमितीनें ठरवून त्या कार्यास प्रथम प्रारंभ केला असून त्यांतीलच प्रस्तुतचा भाग हें पहिलें प्रकाशन श्रीशिवरायांच्या जन्मतिथीच्या दिवशीं प्रकाशित करण्यांत येत आहे. उपसमितीच्या या कार्यास भारत-इतिहास-संशोधक मंडळांतील श्री. शंकरराव जोशी व श्री. ग. ह. खरे यांचें पूर्ण सहाय्य मंडळाच्या कारभारी मंडळानें देण्याचें ठरविल्याप्रमाणें हा भाग प्रसिद्ध करण्याचे बाबतींत त्यांची महत्त्वाची मदत झाली आहे. या भागाचें संपादन श्री. शंकरराव जोशी यांनीं केलेलें आहे. श्री. खरे यांनीं अनेक ठिकाणीं जाऊन बरेच नवीन कागदपत्र गोळा करून आणले आहेत व त्यांचें प्रकाशन होईलच. या नवीन कामाकरतां उपसमितीनें रा. पटवर्धन, रा. गोखले व रा. साठे या होतकरू सुशिक्षित पदवीधर मंडळींना तात्पुरते नोकरीस ठेवले असून त्यांचीही या कार्याला चांगली मदत होत आहे. हा भाग यापूर्वी लौकरच प्रसिद्ध करतां येईल अशी उपसमितीची कल्पना होती. परंतु काम होतां होतां तें सारखें वाढत गेलें व त्यामुळें या भागाच्या प्रकाशनास बराच उशीर झाला आहे. तथापि शिवजयंतीच्या सुमुहूर्तावर हा भाग प्रकाशित होत आहे ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट आहे.

भारत इतिहास संशोधक मंडळ कचेरी
सदाशिव पेठ, पुणें २.
मिति फाल्गुन वद्य तृतीया शके १८५८
शिवजयंति.

न. चिं. केळकर
अ. वि. पटवर्धन
द. वि. आपटे
सभासद, उपसमिति
भा. इ. सं. मंडळ.

# प्रस्तावना

——:0:——

हा ग्रंथ शिवकालीन पत्रसार–संग्रहाचा तिसरा खंड आहे. पहिला व दुसरा हे दोन खंड इ. स. १९३० मध्यें महाराष्ट्रग्रंथोत्तेजक मंडळ–इंदूर व रायगडस्मारक–मंडळ–पुणें ह्यांच्या साहाय्यानें शिवचरित्र–कार्यालयामार्फत प्रसिद्ध झाले आणि प्रस्तुतचा तिसरा खंड श्रीमंत राजेसाहेब मुधोळकर घोरपडे यांच्या जाणिक व उदार वृत्तीनें दिलेल्या देणगीमुळें प्रकाशित होत आहे. महाराष्ट्रेतिहास प्रभु जो शिवाजी राजा त्याचा काल व त्याचें चरित्र ह्याच्या साधनांचा अभ्यास, संशोधन व प्रकाशन हेंच काम करावें म्हणून श्रीमंतांनीं जी साक्षेपीपणानें व अगत्यवाद धरून ही देणगी दिली व जिचें फल हा पहिला ग्रंथ होय त्या देणगी–बद्दल श्रीमंतांस धन्यवाद देणें हें पहिलें कर्तव्य होय.

हे तीनहि खंड किंवा ह्यापुढें असेच आणखी खंड निघाल्यास तेहि जरी एका दृष्टीनें वर्गीकृत व एकीकृत केलेले असे असले तरी ते महाराष्ट्राच्या इतिहासाचे साधनात्मकच ग्रंथ होत. म्हणजे येथें पत्रेंच साररूपानें ह्या तिन्ही भागांत कालानुक्रमानें संग्रहित केलीं आहेत व हाच ह्या ग्रंथांचा विशेष आहे. कोणच्याहि इतिहासाच्या अभ्यासास पहिलें, मुख्य उपकारक आणि अत्यंत आवश्यक असें कोणतें कार्य असेल तर तें त्याच्या साधनांत कालानुक्रम ठरवून तो लावणें हेंच पहिलें व शेवटपर्यंत उपयोगीं पडणारें मुख्य काम असतें. साधन–साहित्यांत समकालीन पत्रांना अग्रपूजेचा मान आहे; ही गोष्ट आतां सर्वांना कळून चुकली आहे. अर्थात् अशीं जीं शिवकालास उपयोगीं त्या कालचीं व त्या कालाच्या पूर्वीचीं पत्रें त्यांचें ह्या तिन्ही भागांत कालानुक्रमानें व साररूपानें संकलन केलें आहे. हा उपक्रम करण्याचें एक कारण हें कीं, ह्या कालाचीं साधनें इतक्या विस्कलितपणें म्हणजे विखरून प्रसिद्ध झालीं आहेत कीं, तीं पुनः व इतिहासविषयक ग्रंथांत छापणें भागच आहे. नहून तीं पत्रें छापलीं जाऊनहि जणूं छापलींच नाहींत असें होऊन गेलें आहे. वर्तमान–पत्रें, मासिकें, प्रासंगिक किंवा स्मारक ग्रंथ इत्यादि पुस्तकांतून जे इतिहासविषयक लेख आले ते प्रसिद्ध झाले नाहींत असें नाहीं. पण त्या त्या ग्रंथांचा मुख्य विषय व हेतु वेगळा आणि त्या पुस्तकांना स्वतंत्र इतिहासविषयक ग्रंथासारखें मानिलें जात नसल्यामुळें अशा पुस्तकांतून आलेली माहिती इतिहासास उपयोगी न पडतां गैरविल्हेस लागली व थोडक्याच अवधींत विस्मृतींत जाऊन बसली. सरस्वतीमंदिर, रत्नाकर इत्यादि मासिकांची गोष्ट क्षणभर सोडली तरी इतिहासाचे म्हणून जे ग्रंथ आहेत त्यांतहि जुने म्हणून ते तसे दुर्मिळ झाले आणि नवे दरेच

अथवा अन्य भाषांतील असल्यास ते ग्रंथ सर्व मिळणें व समजणें दुर्लभ व कठीण होऊन बसलें. ह्यामुळें अभ्यासकांस वाटूं लागतें कीं ह्या ग्रंथांतील लेखांकांचें पुनर्मुद्रण होईल तर मोठी सोय होईल. शिवाजीकालापुरतें पाहतां ही अडचण विशेषच होती म्हणून येथें तीं पत्रें कालानुक्रमानें छापलीं.

शिवाजीकालीन पत्रांचें संशोधन व प्रकाशन गेलीं तीस वर्षें कधीं जोरानें कधीं मंदगतीनें पण सारखें चालूं आहे. इ. स. १९३० सालीं अशीं पत्रें २३४० छापून झालीं, आणि गेल्या सहा वर्षांत त्यांत आणखीं ४७० पत्रांची नवीन भर पडली, तसेंच चालू व गत वर्षांत तितक्याच पत्रांची नवीन उपलब्धी होऊन तींहि प्रकाशनाची वाट पहात आहेत. ह्यावरून झालेल्या संशोधनापेक्षां व प्रकाशनापेक्षां असंशोधित स्थलें व घराणीं वरींच व अगदीं अबोट अशीं राहून गेलीं आहेत हें चांगलें निदर्शनास येतें आणि ह्या कामीं अद्यापि पहिल्याप्रमाणेंच नव्या जोमानें नव्या जुन्या संशोधकांनीं धाटचाल करावयास लागण्याची आवश्यकता आहे हेंहि कळून येतें.

शिवाजीकालीन पत्रांचें कालानुक्रमानें एकत्रीकरण करण्याचें आणखीहि एक महत्त्वाचें कारण असें आहे कीं, नवीन सांपडलेलें पत्र, नवीनच आहे कीं पूर्वी कोठें छापलें गेलें आहे हें समजण्यास आणि तें नवीन असें ठरलें तरी कालदृष्ट्या व प्रसंगदृष्ट्या कोणत्या पत्रांशीं सदरपत्र विरोधी वा अनुरोधी आहे, अथवा वृत्तांतकथनांत कोणची नेमकी भर अगर पुष्टी देणारें आहे हें, थोड्याशा परिश्रमानें कां होईना कळून येण्यास मार्ग व्हावा.

संशुद्ध इतिहासप्रेमी श्रीमंत राजे मुधोळकर ह्यांच्या प्रारंभीं निर्दिष्ट केलेल्या देणगींतून प्रसिद्ध व्हावयाच्या तीन चार ग्रंथांपैकीं हा पहिला ग्रंथ कालानुक्रमिक सारसंग्रहाचाच प्रसिद्ध होत आहे ह्याचेंहि कारण हेंच आहे. नवीन पत्रें उपलब्ध होत आहेत आणि त्यांचाहि एक ग्रंथ प्रसिद्ध व्हावयाचा आहे. पण त्यांत घ्यावयाच्या पत्रांची निवड करण्यासाठीं हा ग्रंथ प्रथम प्रसिद्ध होणें अवश्यच होतें.

ऐतिहासिक पत्रांच्या अभ्यासाचें कार्य किती थोर व उपयुक्त आहे हें इतिहासाचार्य राजवाडे ह्यांनीं फारच निर्दोष व समर्पकरीत्या सांगितलें आहे. राजवाडे आपल्या आठव्या खंडाच्या प्रस्तावनेंत शेवटीं सांगतात 'पृथ्वीवरील जुन्यांत जुनें वाङ्मय म्हणजे जसे वेद तसें अर्वाचीन युगाच्या प्रारंभींचें अभ्यसनीय वाङ्मय म्हणजे हीं सतराव्या शतकांतील पत्रें इत्यादि होत.' उघडच झालें कीं, ह्या पत्रांचें अध्ययन व मनन हें वेदाध्ययनाइतकें आत्मशुद्धीकारक म्हणजे पवित्र असून स्वसंवेद्य आहे. अर्थात् ह्या व ह्याच्या लगतच्या पूर्वींच्या वाङ्मयाचा अभ्यास किती आवश्यक व कोणच्या कल्पनेप्रमाणें करावयास पाहिजे; तसेंच पदक्रमादि पद्धतीप्रमाणें किती सूक्ष्म व वाक्यशः नव्हे पदशः करावयास पाहिजे

हें निराळें सांगणेची जरूरी नाहीं. राजवाड्यांच्या ह्या कल्पनेप्रमाणें प्रस्तुतच्या सार-संग्रहांविषयीं असें म्हणणें संयुक्तिक होईल कीं, हा संग्रह म्हणजे एका परीनें ऋचांच्या संहितीकरणाप्रमाणें होय. वेदांतील ऋचांचा रचनाकाळ आणि त्या ऋचांची संहितीकरणानें बांधणी व मांडणी केली तो काळ हा वेगवेगळा आहे. पत्रांना वेदांची उपमा आणि पत्रांच्या ह्या संग्रहांना संहितेची उपमा देण्यांत पत्रांचें महत्त्व व त्यांच्या व्हावयाच्या अभ्यासाची सूक्ष्मता व अनेकविधता अभ्यासकांनीं लक्ष्यांत आणावयाची आहे. पैकीं ह्या पत्रांची येथें फक्त कालानुक्रमानें मांडणी केली आहे. विषयवार अथवा प्रसंगवार आणि व्यक्तिपरत्वें हींच पत्रें अभ्यासकांना फेरनिवड करून घ्यावीं लागतील. तसेंच कोणचें पत्र त्यांतील कोणत्या भागापुरतें पूर्ण विश्वसनीय व कोणत्या भागासंबंधानें प्रत्यंतर पुराव्यानंतर प्रमाण अथवा पत्रांतील अमुक भाग मुळींच अविश्वास्य हेंहि चौकसून मग ह्या पत्रांचा विनियोग निश्चित करावा लागेल. इंग्रज वखारवाले, पोर्तुगीज सत्ताधारी, मुसलमानांपैकीं आदिलशाहींतील वजीर व कुतुबशाहींतील दिवाण आणि दिल्लीकर मोंगलांकडील सुभेदार ह्यांच्या पत्रांत प्रसंगभेदानें वर्ज्यावर्ज्य लिखाण आलें आहे तात्पर्य, पत्रांतील शब्दांचा व वाक्यांचा बारीक व शास्त्रशुद्ध विचार जो व्हावयाचा त्याचा ह्या पुस्तकानें प्रारंभच केला आहे.

येथें घेतलेलीं पत्रें पूर्ण नसून सारांशरूप आहेत. अर्थात् हा काढलेला सारांश, वतन, घराणें, लेखन, जमाबंदी इत्यादि वेगवेगळ्या दृष्टींनीं पाहणारास पूर्णपणें उपयोगीं पडेल असें नाहीं. राजकीय दृष्टीनें घेतलेला सारांश घराण्याच्या दृष्टीनें पाहणारास निरुपयोगी व सामाजिक दृष्टि ठेवून काढलेला सारांश लेखनपद्धतींच्या अभ्यासकास निकामी; तेव्हां ह्या अनेकांनाहि उपयुक्त असें हें पत्रांचें घेतलेलें सार असणें अशक्य, हें सांगणें नको. असें आहे तथापि एवढें सांगून ठेवण्यास प्रत्यवाय नाहीं कीं, सारांश घेतांना राजकीय दृष्टि मुख्य ठेवून तो घेतला आहे. तसेंच पत्रांतील शब्द, वाक्यरचना शक्यतोंवर मुळाप्रमाणेंच घेण्याची सावधता बाळगिली आहे. आणि विषयदृष्टीनें म्हणजे पत्रांत येणारे कर, पट्या, मानपान हे सर्व न घेतां संक्षेपानें ग्रहण केले आहेत.

ह्या तीनहि खंडांत मिळून छापलेलीं पत्रें २८१० आहेत. त्यांत भाषावारीनें पाहतां मराठी १४२७, फारसी १५८, इंग्रज, फ्रेंच, डच हे युरोपीय व्यापारी व पोर्तुगीज सत्ताधारी यांचीं मिळून ११७७, कानडी ३९, हिंदी १ व संस्कृत ७ पत्रें आहेत. ह्यांतहि फारसींपैकीं दिल्लीकर मोगल, आदिलशहा व निजामशहा व कुतबशहा यांचीं पत्रें किती, तसेंच युरोपीयांपैकीं कोणाचीं किती हें देण्याजोगें आहे. पण येथें हा विस्तार न करतां ठोकळ माननेंच ह्या पत्रांविषयीं स्थूल विचार मांडावयाचे आहेत. इंग्रजाचें पहिलें पत्र ह्यांत जें येतें तें श. १५४१ ( इ.

१६१९) मधील अझून शिवाजीविषयक इंग्रजांचें पहिलें पत्र श. १५८१मधील म्हणजे अफजलवधानंतर शिवाजीनें १५ च दिवसांत पन्हाळा घेतला. त्यासंबंधींचें व भलेपणानें शहाजीचा उल्लेख केलेलें असें आहे. मुसलमानांचें शिवाजीविषयक पहिलें पत्र श. १५७२ म्हणजे इ. १६५० मधील म्हणजे इंग्रजी पत्रापूर्वी नऊ वर्षं आधींचें आहे, व त्यांत शिवाजीस तो शहाजीचा मुलगा ह्या नात्यानें ओळखिलेलें आणि शहाजीबद्दलहि गौरवाचेंच लिहिणें केलेलें असें आहे. मराठी पत्रांत शिवाजीचा उल्लेख ह्या दोन्हीं भाषांतील पत्रांच्या पूर्वी येतो; हें सांगण्यांत विशेष औचित्य आहे असें नाहीं. तसें नसतें तर मात्र ती गोष्ट खेदाची व आश्चर्याची होती. मराठी, मुसलमानी व इंग्रजी पत्रांतून शिवाजीचा निर्देश प्रथम केव्हां व कसा आला हें पाहण्यांत ह्या मंडळींचें लक्ष शिवाजीकडे कधीं व कां वेधलें गेलें हें लक्ष्यांत येतें आणि त्याबरोबरच शिवाजी चरित्रांतील कोणत्या भागापुरतीं कोणतीं पत्रें किती व कशीं माहिती पुरविण्यास समर्थ आहेत हेंहि स्पष्ट होतें. मुसलमानी पत्रांवरून असें दिसून येतें कीं, शिवाजीचा उदय व वाढ होऊन त्यांना त्याचा धक्का बसेपर्यंत त्यांची दृष्टिच शिवाजीकडे वळली नाहीं. नंतर लक्ष्य वेधलें पण तेव्हां शिवाजी अनावर व सामर्थ्यवान् झालेला होता. म्हणून मुसलमानी पत्रांतून शिवाजीच्या प्रथमच्या हालचाली नाहींत, पुढल्या लिहिण्याचें टाळलें असणार अथवा कांहीं कथन केलें असलें तरी तें अपूर्ण व विकृत असणार हें उघड आहे. इंग्रजी पत्रांची गोष्ट ह्याहून भिन्न पण परिणामाला सारखीच आहे. युरोपीयन पत्रांतून शिवाजीसंबंधींचा मजकूर पुष्कळ व पत्रेंहि पुष्कळ, पण तें त्यांचें बरेंचसें श्रुतार्थ कथन आहे, दृष्टार्थ कथन नाहीं. सुरत, राजापूर अशा कांहीं ठिकाणीं शिवाजीच्या ज्या स्वाऱ्या झाल्या त्यांचीं वर्णनें अथवा रायगडावरील राज्याभिषेकप्रसंगींचें वर्णन ह्या इंग्रजी पत्रांतून प्रत्यक्ष दृष्ट म्हणून विश्वसनीय मानणें सयुक्तिक आहे. पण बाकीचीं–आणि अशींच फार आहेत–पत्रें किंवदंती ऐकून लिहिलेलीं आहेत. शिवाजीचा मुक्काम कोठें आहे, शिवाजी आला केव्हां व जातो केव्हां, फार काय, शिवाजी म्हणजे नेमका कोण ह्याचा कित्येक वेळां ह्यांना उमज पडलेला दिसत नाहीं. कोणच्याहि महाराष्ट्रीयाला हे शिवाजी म्हणून बोलतांना आढळतात. मोरोपंत पिंगळे, संभाजी ह्यांनाहि हे शिवाजी म्हणून मानून मग फसल्याची कबूलीहि ह्यांच्या पत्रांतून दिसून येते. सारांश, श्रुतार्थ–कथक पत्रें आणि दृष्टार्थ–कथक पत्रें ह्यांतील भेद व महत्त्व, हीं पत्रें वाचतांना, लक्ष्यांत बाळगणें भाग आहे. हीं दोन्हीं पत्रें–मुसलमानी व युरोपीय–शिवाजी चरित्र व शिवाजीकाल लक्ष्यांत आणून देण्यास उपयोगी आहेत हें निर्विवाद; पण तो उपयोग ह्या चरित्राच्या बाहिरंग सजावटीस होईल; अंतरंगाच्या मांडणीस व स्पष्टतेस तितका होणार नाहीं.

मराठी पत्रांची संख्या वर १४२७ म्हणून दिली आहे. त्यांत शिवाजीचा आयुर्दाय लक्ष्यांत घेऊन तेवढ्यापुरतींच हीं पत्रें घेतलीं तर तशीं पत्रें १०९० निघतात. ह्यांतहि १ शिवाजीनें पाठविलेलीं, २ शिवाजीला आलेलीं, ३ शिवाजीसंबंधानें एकानें दुसऱ्यास परस्पर लिहिलेलीं आणि ४ शिवाजीची राजवट प्रत्यक्ष पाहणारांनीं प्रसंगानें पुढें त्यांतील वृत्त निर्णयसभेंत सांगून तें लिहून ठेविलेलीं, अशीं चार प्रकारचीं पत्रें मुख्यतः आहेत. शेवटच्या चवथ्या प्रकारच्या पत्रांतील म्हणजे निर्णयपत्रांतील म्हणजे महजरांतील मजकूर ह्या ग्रंथांत घेतला आहे तेथें ' उल्लेख ' असें शीर्षक देऊन ह्या वृत्ताचें भिन्नत्व दर्शित केलें आहे. दुसऱ्या प्रकारचीं म्हणजे शिवाजीला आलेलीं पत्रें अत्यंत कमी म्हणजे अवघीं ३८ च आहेत. ह्यांतहि सातआठ पत्रें इंग्रज व्यापारी व पोर्तुगीज आणि शिवाजी ह्यांमध्यें झालेले तहनामे धरले आहेत. शिवाजीला आलेलीं पत्रें इतकीं थोडीं उपलब्ध होण्याचें कारण उघडच आहे कीं रायगडावरील सरकारी लेखशाळेंत हीं पत्रें असावयाचीं व तो संग्रह तर शिवाजीचे पश्चात् लवकरच रायगडावरोबर शत्रूच्या हातीं जाऊन अग्निमुखीं सांपडला. आणि शिवाजीला आलेलीं पत्रें मिळण्याचें आशास्थान अशा प्रकारें नष्ट झालें. सरकारी अधिकाऱ्यांच्याकडेच त्यांचा त्यांचा पत्रव्यवहार व दप्तर असावयाची प्रथा त्या काळीं होती; पण यांतहि थोडा विवेक आहे. शिवाय, सांपडलेल्या पत्रांत अशा ठिकाणाहून एकहि पत्र उपलब्ध झालेलें नाहीं. जीं काय १०-१२ आहेत तीं सातारा येथें छत्रपतींच्याकडेच मिळालेलीं आहेत. मिळालेल्या पत्रांत पोर्तुगीज (१६), मोगल अधिकारी (१२) व इंग्रज वखारदार (८) ह्यांजकडून आलेलींच जवळजवळ सर्व असून एकच पत्र मराठा गृहस्थ बाबाजी सोनदेव सोनटके यांचें आलेलें उपलब्ध झालें आहे. तापीदास ह्या गुजराथी मनुष्याचें एक पत्र शिवाजीस आलें आहे पण तें फ्रेंचांचेकरतां व फ्रेंचांचा हस्तक म्हणून आलेलें आहे. पत्रांच्या चार प्रकारांपैकीं ह्या दोन प्रकारांनंतर परस्परांनीं एकमेकांस शिवाजीविषयीं लिहिलेलीं आणि शिवाजी काळांतील वेगवेगळ्या प्रकारचे लोकव्यवहार सांगणारीं अशीं पत्रेंच सर्व पत्रांत निम्म्याहून अधिक ( ८५६ ) आहेत. पण एवढेंच त्यांविषयीं येथें सांगून पत्राचा पहिला प्रकार जो शिवाजीनें लिहिलेलीं पत्रें त्यांतील विभागणी तेवढी नमूद करतों. शिवाजीनें पाठविलेलीं हीं पत्रें १६८ आहेत. त्यांत वतनासंबंधींचीच सर्वांत अधिक म्हणजे १३२ आहेत; राजकारणी पत्रें २१ आहेत आणि राजकीय वा सामाजिक व्यवस्थेसंबंधीं १५ आहेत. वतनासंबंधींच्या १३२ पत्रांतहि ५८ पत्रें देवधार्मिक वतनाविषयींचीं असून ७४ पत्रें गांवकारभारांतील वतनबाबींचीं आहेत. देवधार्मिक वतनाच्या ५८ पत्रांपैकीं एकट्या मोरगांवच्या मोरया गोसाव्यांनाच २७ पत्रें शिवाजीनें पाठविलेलीं

उपलब्ध झालीं आहेत. आणि गांवकारभारविषयक ७४ वतनी पत्रांत २८ पत्रें वतनी व राज्यव्यवस्थेसंबंधींचीं आहेत.

अशी ही पत्रांची ठोकळ विभागणी व संख्या आहे. ह्या पत्रांची ही संख्या विषयवारीनें व वर्षवारीनें तक्तारूपांत देणें आवश्यक आहे. पण सध्यां तें विस्तार-भयास्तव येथें न करतां ह्या संख्येवरून सूचित होणाऱ्या निष्कर्षासंबंधीं थोडेसें लिहून हा प्रस्ताव आटोपता घेतों. शिवाजीराजांच्या ह्या प्रस्तुतोपलब्ध १६८ पत्रांवरून त्यांचें राजकीय धोरण, त्यांची राज्यकारभारपद्धति, त्यांचे राज्यआक्रमणांतील टप्पे व चढउतार हीं दिसून येतात. पैकीं राज्यकारभारपद्धतींतील एका मुद्याविषयीं येथें पाहूं.

शिवाजीनें पाठविलेल्या पत्रांपैकीं वतनासंबंधींचींच पत्रें—मालकांनीं जतन करून ठेवलीं, आणि हें मनुष्यस्वभावास धरूनच आहे. तींच-अधिक प्रमाणांत उपलब्ध व प्रकाशित झालीं. ह्या पत्रांवरून शिवाजी वतन देण्याच्या व जमीन इनाम देण्याच्या सर्वस्वी विरुद्ध होता हें म्हणणें टिकणार नाहीं. कारण छापलेल्या पत्रांत वतनें व इनामें पूर्वीप्रमाणें पुढें वंशपरंपरा चालविण्याविषयींच शिवाजीनें आज्ञा केली आहे अशीं पत्रें बरींच. व हीं पत्रें लोकांनीं अत्यंत जपून ठेविलीं ह्याचें तरी कारण हेंच कीं, त्यांत त्यांचें वतन चालवावें असा मजकूर आहे. तुमचें वतन अमानत केलें व तें यापुढें चालावयाचें नाहीं असा जर ह्यांत निर्देश असता तर प्रभावी इतिहासप्रेमाशिवाय आपलेंच वतन वा इनाम राहिलें नाहीं हें सांगणारें तें पत्र इतकें उरापोटाशीं बाळगून रक्षण करून कोणी सहसा ठेवलें असतें. सारांश छापलेल्या ह्या वतनी पत्रांतील उदाहरणांवरून वतनें नवीन देणें, स्वतः घेणें, इतरांचीं चालविणें, इनाम गांवें व जमिनी देणें हें शिवाजी करीत होता हें, पत्राधारें बोलावयाचें तर, प्रथमदर्शनीं मान्य करणें भाग आहे. इंदापूरकर, जेधे, घाटगे, सिलिमकर हे देशमूख; सिवरे, कल्याण, खामगांव, पासिणे, इंदापूर, वाल्हे येथील पाटील; पुरंदरे, ब्रह्मे, दीक्षित, चित्राव, बोडे, चांबळी येथील ज्योतिषी व कुलकर्णी; तसेंच, सूसचे ठकार, पाध्ये, पानशी, आटोल्ये, पंताजी गोपिनाथ ही वृत्तिवंत मंडळी इतक्यांचीं इनामें व वतनें शिवाजीनें चालविलीं असून ह्यांतील कांहीं अगदीं नवीन शिवाजीनें निर्माण केलेलीं आहेत. झुंझारराव मरळ देशमूख व हैबतराव सिलिंबकर देशमूख यांना तर राजकार्यार्थ नवीन इनाम कोंढावळे बुद्रुक व चिचले बुद्रुक हीं गांवें नवीन बक्षीस दिलीं आहेत. अशीं हीं उदाहरणें शिवाजीची वतनदातृत्वाची वृत्ति आहे असें कबूल करविणारीं असलीं तरी शिवाजीचा दंडक वतनें व जमिनी देण्याच्या विरुद्ध होता हेंहि निर्विवाद खरें आहे. कारण, वतनें अमानत करून नस्त मोईन चालूं करणें, आपल्या राज्यांत जमिनी देण्याचा शिरस्ता नाहीं हें स्वतःच

शिवाजीनें स्पष्ट व निःसंदिग्धपणें सांगणें; आणि शिवाजीस मुलूख हस्तगत झाल्यावरी वतनदाराच्या कुल वृत्ती अमानत केल्या, नख्त व गलारूपानें माईन होती तीहि बरोबर येईनाअथवा तेवढ्यानें आपला अवकात चालेना असें छ. राजाराम काळीं अनेकांनीं सांगून आपापल्या पूर्वीच्या वृत्ति संपादन करून घेणें अशींहि उदाहरणें प्रसिद्ध आहेत. म्हणजे वतनवृत्ति चालविल्याप्रमाणें किंवा दिल्याप्रमाणें वतनें अमानत केल्याचेहि दाखले सांपडतात. प्रत्यक्ष उदाहरणांवरून नियम सांगावयाचा तर वतनें दिल्याचींच उदाहरणें संख्येनें अधिक सांपडतील. तथापि, तो नियम शिवाजीचा नाहीं. आणि त्याचीं कारणेंहि जरा वेगळीं वाटतात.

शिवाजीराजास राज्य आक्रमणाचा उद्योग करतांना सैन्य ठेवावें लागलें व त्या सैन्यास द्यावयाचा पैसा त्याच्या वाडिलार्जित जहागिरींतून पुरेसा निर्माण होण्याजोगा मुळींच नव्हता. मुलूखगिरी करूनच तो तो मिळवी आणि सैन्यासाठीं अथवा किल्लेदुरुस्तीसाठीं किंवा अन्य इतर खर्चाकरतां म्हणून त्याजजवळ हा आणलेला पैसाच तेवढा असे. म्हणजे जमीन अशी देण्याला त्यापाशीं नव्हतीच म्हटलें तरी चालेल. अर्थात् नख्त मोईन म्हणजे होन, टक्के अथवा धान्य गल्ला इत्यादींची वार्षिक नेमणूक करून देणें एवढेंच त्या पुरुषाला सुलभ होतें. वतनें अथवा जमिनी न देण्याची शिवाजीची जी वृत्ति तिची एक बाजू अशी असणें शक्य आहे. शिवाजी हा जहागिरदाराचा पुत्र होता, देशमुखासारख्या वतनदाराचा पुत्र नव्हता हीहि गोष्ट येथें लक्षांत घेण्याजोगी आहे. जो स्वतः वतन घेतो पण दुसऱ्यास देत नाहीं; हिंदवी स्वराज्याची शपथ घेतल्याचा उल्लेख करणारे पत्रांतहि दादाजी नरसप्रभूस तुमचें वतन आमचा वंश चालविल असें आश्वासन जेथें द्यावें लागलें आहे; वतन नसेल तर गोतांत इज्जत नाहीं असें म्हणून खेडेबाऱ्याकडील मराठा गृहस्थानें शिवाजीकडून पाटिलकीच संपादन केली आहे; खजाना गोळा करावयास सांगतांना आपला ' जो वतनी मुलूख आहे ' असेच शब्द शिवाजी जेथें योजतो. सरकारकुन म्हणजे अष्टप्रधान ह्यांचेकरतां एकाचें वतन एकाला देण्यांत शिवाजीचें न्यायनिष्ठुर मन प्रसंगीं भिडस्त जेथें बनतें; पांढरीवरी शतंभीष्म झाले असले तरी आपण वतनदार शाश्वत, व वतनदाराची वृत्ति म्हणजे कैदेंत जावें, मरावें, मारावें पण वतनावरी दुसऱ्यास जडूं देऊं नये, ह्या प्रवृत्तीचा जेथें बहुजनसमाज, वतनावर कोणीं नाहीं, म्हणून आरूढपतित होऊन म्हणजे संन्यासदीक्षा सोडून गृहस्थी जेथें पुनः पत्करली जाते, तसेंच परगांवीं राजकारणांत असतांहि वतनप्रेमानें तें कार्य सोडून 'गावकी' करून राहण्याकडे ज्या काळीं समाजमनाचा ओढा आहे, तेथें नियम व त्याची अंमलबजावणी ह्यांत अंतर पड-

त्यास त्यांत अपराध कोणाचा ? तात्पर्य, वतन देऊं नये हा जो शिवाजीचा नियम त्याची अंमलबजावणी परिस्थितिसापेक्ष घडली आहे. आणि नियमच अपवाद होऊन राहण्यापर्यंत पाळी आली. वतनासंबंधींचीं हीं उदाहरणें ह्यापेक्षां अधिक खुलाशानें व पदवाक्यप्रमाणपद्धतीनें मांडतां येण्याजोगीं आहेत. गांवकींतलें वतन, कामगिरीचें बक्षीस म्हणून जमीन इनाम आणि राजकीय कार्यांतलि एकादा अधिकार व काम वतनाप्रमाणें वंशपरंपरा असणें, ह्या तीन गोष्टी भिन्न आहेत. आणि त्यासंबंधी नेमकें व पुरतें विवेचन व्हावें म्हणून हीं वतनपत्रें आणि इतर तद्विषयक उल्लेख ह्यांचें सविस्तर विवेचन करण्याचें हें स्थळ नसल्यानें तूर्त येथेंच थांबणें प्राप्त आहे.

ह्या पत्रसारसंग्रहाच्या खंडांत शिवाजी शकावली विस्तृत दिली आहे. तसेंच जुलूस व शिवाजीचे पदरचे अंमलदारहि दिले आहेत. आणि शिवाजीचरित्र व शिवाजी-काल ह्यांच्या इतिहासासाठीं महाराष्ट्रांत व महाराष्ट्रालगत आजपर्यंत कोठें कोठें संशोधन झालें त्याचीहि गांवयादी अकारानुक्रमानें दिली आहे. ही यादी अगदीं परिपूर्ण नाहीं. शिवकालाचा शास्त्रशुद्ध अभ्यास करण्यास हें पुस्तक उपयुक्त होईल अशी आशा करून व शिवचरित्र साधनसमितीचे आभार मानून हे शिवाजीपत्रमोजणी-विभागणीरूप असलेले चार शब्द पुरे करतों.

शं. ना. जोशी,
भा. इ. सं. मं. पुणें.

# अनुक्रमणिका

# शिवकालीन-पत्र-सार-संग्रह

## खंड ३ रा

---

| | | |
|---|---|---|
| पे. द. ३१-१<br>सु० ८२७ मोहरम १० | ( २३४१ ) | श. १३४८ मार्ग. शु. ११<br>इ. १४२६ नोव्हें. ११ |

दिवाणखास—

भीवराव वलद देवजी सावंत देशमुख तर्फ वाडे चौऱ्याशी इ.

भीवर नेहरात राजा मवासी करतो, मुलकाचा पैसा दरोबस्त भीमेपासून देत नाहीं. तमाम अमीर उमराव यांस हुकूम फरमाविला कीं, जो आमीर राजे बाटेराव याजला मोडून मुलकाचा अमल घेऊन येईल त्यास चौथाई अमल देशमुखी दिधला. भीवराव सावंत याखेरीज कोणी विडा न घेतला...( अपूर्ण )

| | | |
|---|---|---|
| पुरं. भा. ३ पृ. १२७<br>सं. १५१७ विक्रम | ( २३४२ ) | श. १३८२ आश्विन शु. ५<br>इ. १४६० सप्टें. १९ |

चाकणेस दुर्गाचा पाया उभारिला. जव्हारीसी फर्मासी केली. दर गावासी गाडा येक व बेठे दोन, येकु बेटा दुर्गाच्या पायात घालीत येकु गाड्यासगाते सोडीत; याबद्दल विलाइती गयाल आली. पद्मावती, गीरमटेक, गीरमालवड पाटील मोकदम गीरमा कान पाटील, पुणे देश आपुली मोकदमाई. परुसी माजुमियाच्या हवाली मोकदमी केली. गिरम्याचे हासीचा वोवसीचा कोणी उभा राहील, थलपत्र दावील त्यास आरधी मोकदमी देईन. राजान मीयाचे हासीच वौसीचा अर्धी खाईल.

| | | |
|---|---|---|
| पे. द. ३१ ले. २<br>फ. ९५८ श. | ( २३४३ )<br>महजर-उल्लेख | श. १४७० आ. शु. ५<br>इ. १५४८ जुलै १० |

मौजे रावेतची पाटीलकी नवाबअलीखान वलद रुस्तुमखान सुबेदार यांची होती ती साहेबाचा खेलनवाला गज्यालीखान याजला दिल्ही. खानाचे बग्चा थलकरी तान्हाजी भोंडवा यास गांवचा कारभार दिल्हा. रंगोजी भोंडव्याची व खानाची जुरस लागली सबब भोंडवाने खानास मारिले. मोकदमी सरकारांत गेली ते वेलेस अडकोजी हिरोजी पाटील भोंडवे याणे जातीस बदा लावून खानाजाद होऊन मोकदमीचा ... ... ... ... ... ... (अपूर्ण)

फा. सा. खं. २ ले. ३९ } (२३४४) { श. १४७१ आश्विन शुद्ध १
हि. ९५६ साबान २९ }  { इ. १५४९ सप्टेंबर २२

सुलतानास ऐश्वर्य आणणारी ( हुमाए सुलतान ) विची ता. २९ माहे शाबान सन ९५६ हिजरीमध्ये *बांधली.

मु. घो. इ. प. ले. १० } (२३४५) { श. १४८६–८७ भाद्र-श्रावण शु. २–१
हि. ९७२ }  { इ. १५६४ ऑगस्ट ९–१५६५ जुलै २८

[ पहिला अली आदिलशाह ]—

चोलराज बिन कवनसिंव बिन अम्बयसिंव [ घोरपडे ].

तुम्ही व तुमचे वडील यांनीं थोरल्या लढाईत शौर्य दाखवून शत्रूला दफा करण्यांत जो प्रयत्न केला तो सर्व आमच्या ध्यानांत आला. त्यावेळीं तुमचा बाप करनसिंव शत्रूच्या पुष्कळ लोकांना मारून कामास आला व मान्यतेस पावला. ही चाकरी व आत्मयज्ञ ध्यानांत आणून कुलाच्या शाश्वततेसाठीं रायबाग व हुकेरी या तर्फेस जास्त असलेला ८४ गांवासह मुधोळ हा भाग बेन (बाई) परगण्यांतील चाळीस गांवें व किल्ले हा–तुम्हाकडे पूर्वीपासून चालू आहे, तोरगळ परगण्यासह तुम्हास वहाल केला आहे व तुम्हांस सात हजारी सर्दार केलें आहे. आणि नेमलेल्या फौजेच्या खर्चासाठीं मुद्‍गल परगणा व कल्लूरच्या भोवतालचीं... खेडीं इतकी जास्त मेहरबानी केली आहे. ही मिळकत कायमची ताब्यांत ठेवून राज्याची नोकरी करावी व यांतच स्वतःचें कल्याण समजावें.

सा. ४ ले. ६७६ } (२३४६) {श. १४८७–८८
मु. ९६६ } कौलनामा {इ. १५६५–६६

अज दिवाण तपे खोरपाटण मामले मुजाफराबाद—

कृष्ण जोइसी बिन आद जोइसी सेकिन पोंवुरलें, तपे मजकूर.

तुम्हीं अपुला भावाचा लेक गोपाल जोईसी वेटा करून पाळिला त्याचे कारखैर केलें, या चावे हरी ठाकूर देसाई, कान्ह ठाकूर, विठ्ठल प्रभू, हंबर नाईक, व अर्जोजी व ग्वोतानि मालूम केले. तरी हा गोपाल जोइसी मागापुढें तुमचे जिवाजितरवाचे घणी असे.

---

*हा लेख ज्या मशिदींत आहे त्याच मशिदीच्या पाठीमागच्या भिंतीवर कोणीतरी मनुष्य ता. २५ माहे जिल्हेज हिजरी ९४९ (श. १४६५ चैत्र वद्य १२ इ. स. १५४३ एप्रिल १) मध्यें मरण पावल्याचें सांगणारा दगड बसविला आहे.

फा. सा. खं. २ ले. १७ } ( २३४७ ) { श. १४९१ कार्तिक शुद्ध १५.
मु. ९७०, हि. ९७७ जवल १३ } { इ. १५६९ आक्टोबर २४

पहिला अली आदिलशाह—

मलिक अश्रफ मीर ताजुद्दीन नायब गैबत व कारकून मामले मुबारकाबाद (= मिरज)

मुबारकाबाद येथील अडीच चावर जमीन हजरत अलीआदिल यांच्या सदक्याच्या रूपानें इब्राहीम कत्ताल व त्याचे वंशज यांजकडे चालू आहे. तरी ती जमीन त्याजकडे सन ९६९ सालापर्यंत ज्याप्रकारें चालू होती त्या प्रकारें सन ९७० सालींहि चालू ठेवावी व त्याचे ताब्यांत यावी. फर्मानाप्रमाणें चालावें.

फा. सा. खं. २ ले. १८ } ( २३४८ ) { श. १४९२ मार्गशीर्ष वद्य १०
मु. ९७१, हि. ९७८ रजब २४ } { इ. १५७० डिसेंबर २२

अली आदिलशाह—खान ठाणेदार तपे सालसी

कुकदे प्रभू बिन भाइदे प्रभू देसाई तपे मजकूर यांनीं कचेरीस विनंति केली कीं, या तप्यांतील इतर देसायांस गांवें इनाम आहेत. यास नाहींत. तरीहि इतर देसायांबरोबर मशागत करून निष्ठा दाखवितो व किफायत करतो. स्वतःस नवीन गाव इनाम व्हावें. त्याबद्दल पेशकशीची चौथाई २५० होन कबूल करतो. मौजे ओटव इनाम मिळावें. तरी त्यास ओटव इतर देसायांप्रमाणें इनाम दिलें आहे. पेशकशीचा पैसा खास म्हणून मुरादखान गाझी मीरजुम्ला यांस सन ९७० सालीं देवविल्याप्रमाणें आदा* करणें.

सा. ४ ले. ६७७ } (२३४९) { श. १४९४ आश्विन वद्य ६
मु. ९७३ जवल १९ } कौलनामा { इ. १५७२ सप्टेंबर २७

अंज दिवाण तपे खारेपाटण मामले मुजफराबाद—

गोपाळ कृष्ण जोइसी सेकीन पोंबुर्ले, तपे मजकूर

कृष्ण जोइसी निपुत्रिक मयत झाला म्हणून मौजे मजकूरच्या खोतानीं कृष्ण जोइसीचें वज ते दिवाणासि पावणें असी मिसली सादर केली. तथेवरी तू येऊन कौल कारकिर्दी किस्वरखान मोकासाई तपे मजकुरीं सादर देविला. ते मध्यें लिहिलें असे कीं, तुज धाकुटपणीच आपुले विराजार याला मागोन घेउन आपला फरजंद करून पोसिला. खोतानि तपे मजकूर, साहेबासी मालूम करून कृष्ण जोइसी याची

---

* अशाच मजकुराचें सुर्दखत मामले गोव्याच्या सालसी तपे येथील दिवाणानें मौजे रुट येथील भावकर व विर्निक यांस लिहिलेलें ह्या लेखांत अंतर्भूत आहे. त्याचा काल शाबान १६ म्हणजे श. १४९२ पौष व. २ ता. ९६।१।१५७१ हा आहे.

वज गोपाळ जोइसी तेयाचे दिमती करणें. तरी आतां खातिरेस आणून तमाम वज तुजे तुज हवाली केले आहे. कृष्णंभट जोइसी आपला काइदा देऊन जोइसीपण चालवीत होता तैसेची चालवीजे.

फा. सा. खं. १ ले. ७९ } (२३५०) {श. १४९४-९५
हि. ९८० } {इ. १५७२-७३

[पहिला ] अली आदिलशाह याच्या कारकीर्दीत एक चावर जमीन मुसलमानांच्या दफनासाठीं व ईदगाकरितां दान करून सार्वजनिक केली. कोणाला या जागेत अडथळा करण्याचा हक्क नाहीं.

फा. सा. खं. १ ले. ७६ } (२३५१) {श. १४९४।९५ व ९७।९८
हि. ९८०, ९८३ } {इ. १५७२।७३ व ७५।७६

या घराची सेवा पहिलवान, अली बिन अहमद इस्फहानीस-तीर अंदाझखान किताब असलेल्यास फर्मावलेली आहे. सन ९८० [हि.]. [घर] पूर्ण झालें. सन ९८३. ही तारीख वाचील त्यानें इमारत बांधणाऱ्याच्या आभारांचें कायम स्मरण करावें.

सं. सा. खं. १ले.११७ } (२३५२) {श. १५०० फाल्गुन शुद्ध १
श. } {इ. १५७९ फेब्रु. २६

वरील दिवशीं गरूड यांनीं ओझर (परगणे जुन्नर) येथें विहीर बांधली.

फा. सा. खं. १ ले. ७० } (२३५३) {श. १५००-१
हि. ९८६ } {इ. १५७८-७९

हुसेनी मुर्तजाच्या राज्याच्या कारकीर्दीत असा सुंदर व स्वच्छ हौद हाजी आका याच्या प्रयत्नानें पूर्ण झाला. ऐन खुर्रमीहा (आनंदाच्या झऱ्यांत) यांत मिती आहे.

फा. सा. खं. १ ले. ७८ } (२३५४) {श. १४८०-१५०२
} {इ. १५५८-१५८०

अली आदिलशहाच्या कारकीर्दीत या भव्य मशीदीचा पाया, कामिलखानानें स्वेच्छेनें फर्मावला. इमारत आकाशाच्यावर डोकें काढलेली झाली.

फा. सा. खं. १ ले. ७७ } ( २३५५ ) { श. १५०२ / इ. १५८०

शाह अली आदिलशहा [ १ ला ] याच्या कारकीर्दीत उत्तम सौख्य, ( परमेश्वरावर ) निष्ठा, सुरक्षितता असो व खान आलीशान इब्राहीम कामिलखान ( राजकुलाचा ) मित्र ( राहो ).

फा. सा. खं. १ ले. ७१ / हि. ९८९ } ( २३५६ ) { श. १५०३–०४ / इ. १५८१–८२

मूर्तजा निजामशाह याच्या कालीं, मुसलमानांचें बरें इच्छिणाऱ्या जावितखानानें ही मशीद बांधविली.

सा. ३ ले. ६१८ / सु. ९८६ सवाल २१ } ( २३५७ ) कौलनामा { श. १५०७ आश्विन व. ८ / इ. १५८५ आक्टो. ६

दिवाण किले स्यादुर्ग—सर्जाराव मोकदम मौजे मंगळूर.

तुम्हावाबे मौजे मजकूरच्या मोकासाईयाणी इलतमेसी केल्याप्रमाणे मौजे मजकूरची पटेलगी बदलखरीदी कबूल केले असे. तुम्हासी कौलनाम तकवेती सादर केले असे. कोणे बावे काही अदेसा न करिता किले मजकुरास येऊन आपले हवाल मालूम कीजे. तुम्ही येइतमाम करून, मंगळूरचे पटेलगी करून गाव कीर्दमामुरी कीजे.

सा. ३ ले. ६१९ } ( २३५८ ) { श. १५०७ / इ. १५८५

मुधोजी विश्वासराव देशमूख किल्ले स्यादुर्ग—
सर्जाराव काटे मोकदम मौजे मंगळूर.

तुम्ही मौजे मंगळूरची मोकदमी खरीद केली तुम्हास किलाचा नैबगैबत साहेबाचा कौल व मोकासा मौजे मजकूरचा पाठविला आहे. तरी तूर्त मंगळूरास येऊन कीर्दमामुरी करिजे, मोकदमी चालवीजे.

फा. सा. खं. २ ले. ४० / हि. ९९५ } ( २३५९ ) { श. १५०८ पौ. शु. २ ते १५०९ मार्ग. शु. २ / इ. १५८६ डिसेंबर २. ते १५८७ नोव्हें. २१

अबुल–मुजफ्फर इब्राहीम आदिलशाह बिन अली आदिलशाह याच्या कारकिर्दीत हिजरी ९९५ मध्यें हैदरखान बिन मालिक हैदर यानें या विहिरीची इमारत बांधिली.

फा. सा. खं. १ ले. ८१ } (२३६०) { श. १५०७-०८
हि. ९९४. } { इ. १५८६

खरोखर मशिदी परमेश्वरासाठीं आहेत. तेव्हां परमेश्वराबरोबर [ आणखी ] एकाला [ ही ] बोलवूं ( हांक मारूं ) नका. हिंमतीचे हात कल्याणापर्यंत पसरले व द्रव्य खर्च केलें. ( त्यायोगें जेव्हां ) स्वर्गीय बाज्यासारख्या मशीदीचा पाया घातला ( तेव्हां ) मला काळजी लागली व नकलेपाशीं तारखेचा शोध केला. [ तेव्हां ] ज्ञान विकसलें व म्हणालें 'ही कल्याणस्वभावी इमारत'.

हे परमेश्वरा, हे मुहम्मदा, हे अली, जनाब मीर मुहम्मद झमान यानें जेव्हां ऐश्वर्याचें दार आपल्या हातानें आपल्या बाजूस उघडावें [ अशी ] हिम्मत धरली [ तेव्हां ] परमेश्वराच्या कृपेसाठी तीस व तीन देवळें मोडलीं [ व ] या खराबाबादेंत इमारतीचा पाया घातला.

एपि. कर्ना. व्हाल्यु. ५ } (२३६१) { श. १५०९ वैशाख शु. ५
नं. १६० शक } { इ. १५८७ मे ७

म्हैसूर येथें कंठीरव नरसराज राज्य करीत असतां त्यानें चेनरायपट्टण चेनवीरायचा पुत्र दोडाय यास दिलें. हा चेनवीराय गौड तुंगनीनाड येथील कनकरनहल्लीचा प्रभु होता. या दोडायनें तुर्कराजाच्या करितां दगडी किल्ला बांधविला. ( चेनरायपट्टण येथील ओलगराम देवालयांतील शिलालेख. )

सा. ४ ले. ७४७ } (२३६२) { श. १५११ श्रावण वद्य १
सु. ९९० } कौलनामा { इ. १५८९ जुलै १८

अर्जे दिवाण परगणे वांई—

दादजी ( मुजुम ) ली नाईकवाडी ठाणे परगणे मजकूर.

भुल्लाजी सरदार रुक्खाने मोकरम यास पूर्वीचा गुन्हा माफ करून हजरत साहेब खान आलिशान यांनीं त्यासी आपुला फरजंद म्हणविले. त्यासी आपली बेटी देऊन कारसेर करुन मुहेर आरसांजे. हजरतसाहेबांचा बोलूं मोहूं नये. तुम्ही बेटी आमचे हाती दीजे आम्ही कारसेर करून देऊं. कोणे विरवी सक न कीजे.

फा. सा. खं. २ ले. ४१ } (२३६३) { श. १५१० मार्ग. शु. २ ते १५११ का. शु. १
हि. ९९७ } { इ. १५८८ नोव्हें. १० ते १५८९ आक्टो. ३०

स्वर्गवासी अली आदिलशाह यांच्या वेळीं सय्यिद अहमद बिन सय्यिद अलाउद्दीन यानें निमजग्याचा पाया घातला होता. सध्यां इब्राहीम आदिलशाह याच्या वेळीं विश्वासू दिलावरखान याच्या विनंतीवरून फर्मान सादर झाला. म्हणन सय्यिद महमूद इब्न सय्यिद अलाउद्दीन यानें हा निमजगा पुरा केला.

फा. सा. खं. २ ले. १९ } (२३६४) {श. १५१२ चैत्र शुद्ध ६.
सु. ९९०, हि.९९८ जखर४} {इ. १५९० मार्च ३१

दुसरा इब्राहीम आदिलशाह—

सय्यिद उस्मान सय्यिद महमूद मजलिसी व कारकून मामले मुबारकाबाद.

मुबारकाबादेमधील खुर्शीदखानाच्या मशिदीच्या वक्फाच्या बाबतींतील बागेसह एक चावर जमीन–जी सध्यां मर्हूम खानाचे मुलगें व—यांजकडे चालू आहे ती—हक्कांसुद्धां सुहूर सन ९९० पासून पुन्हां पूर्वीप्रमाणें उपर्युक्त खानाच्या मशिदीच्या रूपानें मद्‌मत केली आहे. तरी ती ताब्यांत यावी.

सा. ४ ले. ६७८ } (२३६५) {श. १५१२ पौष
हि. ९९९ रबल ३} फर्मान {इ. १५९०।९१ डिसें. जाने.

दिलावरखान अमीर—

शेख इसहाक नायब मुनीब व कारकुनान तपे खारेपाटण.

*गोदजी व गोपाळ बिन नारायण बिरादरजादा कृष्ण जोशी यास* दरहर मौजा एक लारी इनाम कदीम भोगवटा आहे. तो चालविणें.

पे. द. ३१–२ } (२३६६) {श. १५१९ भाद्र. शु. १३
सु. ९९८ मोहरम १९ } खुर्दखत {इ. १५९७ आगष्ट १५

येकतारखान—कारकून व खोत महाल जकाती परगणे न्यामताबाद.

दतंभट बिन पद्‌माकर भट सेकीन कसबे चाद्‌वड यासी खैर सदका परगणे मजकूर जकाती पथक कडेवणे कसबे चांद्‌वडावरी इनाम् दरोज नख्त रुके सा ०६. तेल वजन ००१ दिधलेंआहे. आद्दा कीजे. अवलाद व आफलाद चालवीजे......
मुसलमानासी सव मुस्तकेची असे, हिंदू यासी गाईची सव आहे.

फा. सा. खं. १ ले. ३ } (२३६७) } श. १५१९ आश्विन वद्य १०
सु. १०००, हि. १००६ रबल २४ } } इ. १५९७ आक्टोबर २५

?—हुद्देदार व कारकून जजिया खातें शहर बुर्हानपूर

दत्ताजी महाद नाईक आंधारे यानें हुजूर येऊन कळविलें कीं, आपला बाप महाद नाईक व चुलता कासी नाईक व सोन नाईक मुहम्मदशाहाच्या वेळेस या मुलखांत आले. त्यानें त्यांवर सर्व प्रकारें कृपा करून जजिया माफ केला. त्यानंतर मीरां आदिलशाहाच्या वेळेसहि तोच अमल चालू होता. या खात्याचे हुद्देदार आज तीन सालें झालीं दरसाल १२॥ मुजाफरी व २८ चितल प्रमाणें जजिया घेत आहेत. माफ व्हावी. तरी या वर्षापासून दत्ताजी नाईक यास वंशपरंपरेनें जजिया माफ केली आहे. ( लेखांतील सुहूर फरुकी सुलतानांचा आहे. )

मु. घो. इ. ५. ले. ११ } (२३६८) { श. १५२० आश्विन शुद्ध १३
हि. १००७ रवल ११ } { इ. १५९८ आक्टोबर २

[ दुसरा इब्राहीम आदिलशाह ]—

या दरबारच्या ध्यानांत आलें कीं, राजा चोलराज घोरपडे यांचा मुलगा राजा पिलाजी घोरपडे या राज्याची उत्तम चाकरी करून मरून गेला. त्याचा मुलगा प्रतापसिंव घोरपडे बापाप्रमाणेंच जीवादारम्य चाकरी करूं लागला. तो शूर व निष्ठावान् आहे. त्याची व त्याच्या वडिलाची चाकरी ध्यानांत आणून चौऱ्याऐंशीं गांवासह मुधोळकर्यात आणि बापाची सात हजारी मनसब व जागीर त्यास आतां बक्षीस देतों. त्यानें वाडवडिलांप्रमाणें आज्ञाधारकतेचा प्रयत्न करून बादशाही मिळकत उपभोगीत रहावें आणि बादशाही खुशींत स्वतःचें कल्याण आहे असें समजावें.

सा. ४ ले. ७१५ { (२३६९) } श. १५२०–२१
सु. ९९९ { महजर } इ. १५९८–९९

तपे वाळ्वे मुकाम किले पनाले

तानो मेगदेऊ व जोगोबा माणको यामध्यें तपे वाळ्वेचे देस कुलकरणाबद्दल तक्रार झाली. कारकीर्दी दिलावरखान, अजमखान, शाहातकी, होनोपंडित कामिलखान यैसे चालवीत होतो. साहेबानी दोहीं वर्गाचिया तकरिरा मनासी आणिले. साहेबी मनासी आले जे जोगोबा माणिको मिरासी नव्हे. पेसकेसी वा नफराई करून मिरासी ...त्यावरी तानो मेगदेऊ याचे देसकुलकरण मनासी आले.

सा. ४ले.६७९ { (१३७०) { श. १५२४ आश्विन वद्य ७
सु.१००३रखर२० { मिसेली फा. मु. { इ. १६०२ सप्टेंबर २७

दिवाण तपे खारेपाटण—

खोताने व गावकराने विर्तिकानी देहाये तपे मजकूर.

तपेमजकूरचे जोसी गोपाल जोसी बिरादर कुल्ल जोइसी हे यासी गावगना सालिना लारी १ साल गुदस्ता चालिले आहे. तैसेंचि चालविजे.

सा. ५ ले. ७६० } (२३७१) { श. १५२६ ज्येष्ठ शु. ७
सु. १००५ मोहरम ५ } कौलनामा { इ. १६०४ मे २५

हैबतखान—हिरोजी देशमूख तपे रोहिडे तर्फ उतरवली.

तुमचे बाबे मलारजी देशमूख परगणे सिरवलमालूम केले जें तुमचे देशमुखीपण काढून भावास दिले म्हणून तुम्ही बेदील होऊन बाहेर गेले. देशमुखपण मोकरर केलिया विलायती मामुर करील. तरी बगये मालुमाती खातिरेसीं आणून तुमचे देशमूखपण तुम्हासी मोकरर केले असे.

सा. ३ ले. ६२० } (२३७२) { श. १५२६ कार्तिक शु. ६
सु. १००५ जखर ४ } { इ. १६०४ आक्टो. १८

पतंगराऊ राजे-हुदेदार व मोकदम मौजे खरडे तर्फ जावखेड.

सेख मुस्लीम या इनामती जमीन मस्याखती बाबा रमजानपीर मौजे मजकूर मालूम केले, इनाम चावर नीम भोकरपटी + + देखील नख्तयाती कुलबाब आहे. भोगवटियास मलिक लाल(?) वरचि खुर्दखत मठीमधे होते...खुर्दखते गांवात होती. सन आर्बामधे मसनदअली येऊन गाव जाळिला लुटिला ते वेळीं खुर्दखतें जळाली. तरी इजानेबु मनास आणौनु चालवीजे. खुर्दखताचा उजुर न कीजे.

फा. सा. खं. १ ले. १ } (२३७३) { श. १५२५।२६
गैब हि. १०१२ } { इ. १६०३।०४

बुऱ्हाण शहाच्या कालांत उत्कृष्ट व निर्दोष इमारती केल्या, याकुताच्या बायकोनें मशीद बनविली. 'गैब' (या शब्दां) तून तारखेचा आवाज आला.

सा. ३ ले. ६७३ } (२३७४) { श. १५२७ कार्तिक शु. २
फ. १०१६ जखर १, श. } दत्तकपत्र { इ. १६०५ आक्टो. ३

रखमाबाई वागमोड मोकदम मौजे बोरी, आपले भ्रतार भगताजी पाटील निमे, मौजे मजकुरीचे असता पडले. पुत्र चौघ. त्यांत वडल जनकोजी. *त्यास संतान नाहीं. त्याचे स्त्री तुकाई, हिला धुललोजी दीर जनकोजीचा लेक करून* वसंगला घातला. त्याचे पाणीग्रहण विव्हाह नावरूप तुकाईने करावे. विठोजी व जबाजी या दिरानी श्रीची सफत केली, आपले वौसपरंपरेनें या रहणीनें चालावे.

सा. ३ले.६२१ } (२३७५) { श. १५२७ कार्तिक वद्य ६
सु. १००६ जखर २० } { इ. १६०५ आक्टो. २३

राजे जाधवराऊ—हुदेदार व मोकदम मौजे खरडे तर्फ जावखेड.

[ले. २३७२ प्रो] सेखमुस्लीम इनामती रमजानुपीर यासी इनाम चालवींजे.

पे. द. ३१ ले. ४ } (२३७६) { श. १५२८ श्रावण शु.९
सु. १००७ रखर ७ } सनद { इ. १६०६ आग. २

रा. शाहजी राजे भोसले—रा. बयाजी मुदगल देशपांडे

कसबे खेड तर्फ खेडेबारे येथें जमीन बाग लावावयास; बागसेरीची मजमू सांगोन सालिना तैनात होन १०० करार केले असे.

सा. ४ ले. ६८० }　(२३७७)　{ श. १५२९ मार्गशीर्ष व. ७
सु. १००८ साबान २० }　मिसेली फा. सु.　{ इ. १६०७ नोव्हेंबर ३०

दिवाण तपे सोदळ—

हुद्देदार, महाजनानी, बिर्तिकानी, गांवकरानी मौजे ढिंई तपे मजकूर.

गोपाळ जोइसी बिराजर कृष्ण जोइसी यासी जोईसीपणाचें इनाम भाटले किता १ रकम लारी ३० सालाबाद चालिले असे दुबाला करणें. साल गुदस्ता मुतालीक मोकासाई मौजे मजकूर जोइसी मजकूरपासी लारी ३... घेतले होते. जोरीने येक साल घेतलेचे अमल वातल होत असे, तो भोगवटा नव्हे. सालगुदस्ताचे उजूर न करितां जोइसी मजकूरचें इनाम दुबाला कीजे. दरसाल मिसेलीचे उजूर न कीजे.

पे. द. ३१ ले. ५ }　(२३७८)　{ श. १५३० अ.भाद्र. शु. १३
सु. १००९ जवल ११ }　खुर्दखत　{ इ. १६०८ आग. १३

मलिक सर्क मलिक अंबर—

कारकून व देशमुख परगणे न्यामताबाद व माहाल जकाती.

दतंभट बिन पद्माकरभट मुकाम कसबे चांदवड याच्या (क्र. २३६६ प्रमाणें) मिया राजे व वस्ता पेरोजखान व मुकासाई कारकीर्दी दरकाराकिर्दी हुजती खातिरसीं आणून तशरुफाती चालत आहे तेणेप्रमाणे चालवीजे.

सा. ४ ले. ७१६ }　(२३७९)　{ श. १५३० मार्ग. शुद्ध १३
श. }　विक्रयपत्र　{ इ. १६०८ डिसेंबर ९

गोमाजी व पुज व रायोजी पाटील म्हईसधुणे मौजे मुंगसेर—

तिमाजी गर्गे धर्माधिकारणी मौजे मुंगसेर परगणे दिंडोरी.

मौजे मजकूरचा कुलकर्णी बालो राम वर्षा होता. सितापन मुलुक मोकासाई सालझाडा हिशेब पाहतां ४० होन आंगी आले. १० होन दंड जाहाला. म्हणोन ५० होन तुम्हापासून कर्ज काढिले. तो मयत झाला. बायकामुलें नासिक येथें हालाखीत आहेत. कर्जफेड होणें शक्य नाहीं. म्हणून ये कुळकरणाची तुम्हास मिरास करून दिल्हीं. हरकत कोण करील तो दिवाणाचा गुन्हेगार व गोताचा आन्याई. गोत्री नेमणूक २ होन व गला खडी २ व तूप २ सेर घेत जाणे.

सा. २ ले. ६२२ }　(२३८०)　{ श. १५३१ माघ शु. ८
सु. १०१० जिल्काद ६ }　　{ इ. १६१० जाने. २२

पतंगराऊ राजे—कारकून व देशमुख तपे जामखेड व हुद्देदार मौजे खरडे.

सेख मुसलीम खिजमतीगार रोजा बाबा रमजानु यासी इनाम चावर एक

देखील मालसेत भिऊ मढीकर बहुकूम हुजती सेख अबदुला मुकासाई सन सीत तिसैन तिसा मैया (इ.१५९५ श.१५१७,) चालिले असेली तेणेप्रमाणे व पतंगराऊ व जाधवराऊ व हजरती बुऱ्हान निजामशा याचे कारकीर्दीमध्ये चालिले असेली तेणेप्रमाणें चालवीजे.

पे. द. ३१ ले. ६ } (२३८१) { श. १५३०–३१
सु. १००९ } { इ. १६०८–९

मलिक सर्क मलिकअंबर—कारकून सरकार जुनर.

मेगो नरसिव चिटिणवीस सरकार मजकूर माालूम केले, आपली चिटिणविसी पिढी दरपिढी मिरासी आहे. तैनात बदल यारेदी मेहताना दरमाहा होन ५ पाच गहदम चालताती. मुसमा नख्त यासी जागा महमूल कमावीस व इसल व साहने व सारी बिजे माल व राय तेल....( अपूर्ण )

सा. ३ ले. ४६९ } (२३८२) { श. १५३२ वैशाख शु. ६
सु. १०१० सफर ७ } { इ. १६१० एप्रील २१

मलिक सर्ज्या मलिक अंबर—कारकुनानी बावी परगणे संगमनेर.

दत्तो नागनाथ कुलकर्णी हाजूर मालूम केले, कसबे राहाते येथील रया मोकदम येही अर्जदास्त पाठविली की आपला थल मौजा परगणे संगमनेराखाले पहिले होता. परगणा मोजला गेला तेव्हां लाग चावर ८० केले, त्या नागोजी देस-कुलकर्णी तरफेस १३॥ चावर तनुरीक करून एकूण चावर ९३॥ केले. आपण उत्तर द्रिधले गावावरी जमीन चढऊं नका. जे कोण्ही सेत करितील त्याचे बाटोळे होते व देशमुख व देशकुलकर्णी आपली आकस करिताती, नांदणूक होत नाहीं. यावरी हाजरतीचा हुकूम जाला कीं,- दिवाणीची शेरणी कबूल करणे. तुमचा मौजा आहे, तो कसबा, अलहिदा परगणियासिवाये बहाल करून. आपण ३ हजार होन कबूल केले. ते पावले नाहीत. बंदगीस ओलेसी ठेविला. गणेश पाटील यास हत्तीच्या पायासी देण्याची ताकीद जाली. त्यावरी पाटील बोलला आपण नावचे पाटील गांवात कारभार कुलकर्ण्याचा आहे. हाली येमाजी कुलकर्णी याचे घरी जयमगल घोडा आहे तो बंदगी हाजरती लायक आहे. तसेच रामाजी गोरियाचे घरी हिरा; ऐसिया दोन्ही वास्ता हाजूर आलियाने होन मजकूर वसूल होतील. घोड्याची किंमत ३ ह. होन आली. हे होन कर्ज येऊन दिवाणात देऊन पाटिलास सोडविला. हिरियास खोडी कैफ आहे म्हणून जाहीर केले. हिरियाचा धणी आपले पातशाही टाकून येदिलशाहीचे सरहद्देमधे चाईस गेला. अवघी रयेती मेलवून जाहीर केले व ३ हजार होनाची पटी मागितली. मग जो देशमुखी व देस-कुलकर्ण वतनाच्या हक आदावा खाईल तो हे होन देईल. येमाजी कुलकर्णी

दोंही वतनाच्या सनदा दिल्या. देशमुखीस चावर १ व देशकुलकर्णास चावर नीम देऊन महाला बोहडविले.

पे. द. ३१ ले. ७ } (२३८३) { श. १५३६ कार्तिक शु. ६
सु. १०१५ सौवाल ४ } दानपत्र { इ. १६१४ आक्टो. २८

रा. मुधोजी—कारकून व देशमूख परगणे पट देऊळगाव.

भटाचारिये बिन रामराज गोसावी सेकीन कसबे निवासे हुजूर येऊन मालूम केले जे, आपण वाराणसीस स्नानसंध्या पुराणश्रवण करून असतो. आपणासी इनाम-येक गाव अजरा मऱ्हामती दिधला पाहिजे. इनाम जाल्या विश्वनाथी अध्यायन चालउनु, म्हणोन मालूम जाले.... (अपूर्ण)

एपि. कर्ना. १२ सिरा ता. ६६ } (२३८४) { श. १५३६
हिजरी १०२३ } { इ. १६१४

(सिरा येथील एका लहान मशिदीवरील शिलालेख.) अल्ला व त्याचा प्रेषीत यांची स्तुती करून देवदूत म्हणाला १०२३ या सालीं ही मशीद उभारली जाईल. ही मशीद नजीबखान अहरारी ( Ahrari ) यांनीं बांधविली.

सा. ३ ले. ४१६ } (२३८५) { श. १५३७ आश्विन शु. १४
सु. १०१५ साबान ११ } मजलस वाटणीपत्र { इ. १६१५ सप्टेंबर २५

ममलकत मदारि मलिकअंबर खान सुरुरखान—

मामले अमिनाबाद ऊर्फ पालीपैकीं खारापाटचे प्रभु कुलकर्णी.

गणेशप्रभु कसबे नागोठणे यानी मालूम केले जे, तर्फ मजकुरीचे कुलकर्णी आपली तिसरी तकसीम मिरास गहदम सालाबाद चालत असता जुनरात वडील चुलतभाऊ कृष्णाजी तानप्रभु करकसा करितात. ये बाबे पूर्वी निवाडा केला तो हाजीर मज्यालसी कागद पाहून त्याप्रमाणें वांटणीच्या तर्फा केल्या. दस्त व नुकसान आणि हक लाजिमा, नागवण पडेल ती दो ठाई.

सा. ३ ले. ५०६ } (२३८६) { श. १५३८ चैत्र व. १
सु. १०१६ रबल १५ } { इ. १६१६ मार्च २४

मीरखान ठाणे सिरवल—हिरोजी धोंडापा चिखलगांव तर्फ रोहिडखोरे.

वतनाबद्दल नजराणा होन ८०० तूं दिल्हे ते दिवाणात जमा केले. तेणे-प्रमाणें पाटिलकी मिरासी बद्दल इनाम टके ३ वगैरे पासोडी व कुल मानपान खाऊन गावची चाकरी मुकरद अवलाद अफलाद खाऊन गावची वसाहात करून दिवाणांत रुजू राहणे; ये बाबे कौल असे.

सा.४ले.६८९ व भारतमित्र पिसुर्लेकर (२३८७) आहादनामा श. १५३८ पौष-माघ इ. १६१७ जानेवारी

इ. १६१५ आक्टोबर ९ तारखेस नवरसपूर येथें प्रधान शहा नवाजखान यानें आदिलशाहाच्या मध्यस्थीनें पोर्तुगीज व निजामशाहा यांच्यामध्यें तह घडवून आणिला. त्यांत निजामशाही वकील काशी पंडित व पोर्तुगाल बादशाहातर्फे अंतोनि मचेर हे हजर होते. इ. स. १५७१ सालीं थोरल्या मुर्तजा-निजामशाहाच्या वेळेस झालेल्या तहाप्रमाणें चालावें. व त्यांच्या बंदरांत व देशांत इंग्रज व डच यास जागा देऊं नये व मदत करूं नये, अशी नवी अट घातली. मलिकअंबर, निजामशाहा, आदिलशहा हेजीब दफाखान यांच्यासमक्ष एक आणखी अट घातली ती; निजामशाही व फिरंगी रयत यांच्यांत बागा व नारळीची झाडे याबाबत तंटा होऊ नये म्हणून दोघांकडील प्रत्येकी २ पंच निवडून त्यांनीं सरहद्दीवरील मालकांचे कागद तपासून योग्य तो निवाडा यावा. जानेवारीच्या १ तारखेस पोर्तुगीज व्हॉईसराय यानें काशी पंडित व समशेरखां यांच्या समक्ष, निजामशाहा किंवा त्याचे वंशज जोंपर्यंत हा तहनामा पाळतील तोंपर्यंत आम्हीहि पाळूं असें सांगितलें.

सा. ४ ले. ६७५ हि. १०२७ सु. १०१८ हि. जखर ५ (२३८८) श. १५३९ ज्येष्ठ शुद्ध ७ इ. १६१७ मे ३१

दिवाण रस्तखाने खास—

कारकून देशमुख भगणे पुणें व मुकासाई व हुदेदार अजहती मुकासाई व बाजे कर्यातीचे मोकदम.

रंगनाथभट भटंभट पुरंदरे सेकीन कसबे पुणें यास दोन चावर जमीन इनाम बरहुकूम हुजती व फर्मान सवा तिसैन कारकीर्दी बहादुर निजामशाहा, दिलेलखान सीत तिसैन चालत आहे. हाली कारकून फर्मानाचा उजूर करितात व मुसलमान व हिंदू यांना इनामाचें फर्मान असतील त्यांना इनाम दुमाला करा असा फर्मान ममलकत मदारी मलीक अंबर समान अशर अलफ छ २० सफर आहे. मन्हामत होय मालूम जालें. बहुजती खान हैबतखान सलास अलफ करार चावर १ मौजे पिंपरी व १ चावर चिखली राहाटणी, केलें असे.

सा. ४ ले. ७०६ सु. १०१८ जिल्हेज ६ (२३८९) खुर्दखत श. १५३९ मार्गशीर्ष शु. ८ इ. १६१७ नोव्हेंबर २५

मलिक शर्क मलिक अंबर दौलताबाद—

कारकून देशमुख मामले गुलशनाबाद.

गोमाजी भट्ट क्षेमकल्याणी कसबे नाशीक यानी हुजूर मालूम केलें कीं, सालाबाद गोदावरी जो कोणी ऋग्वेदी अगर चतुर्वेदी ब्राह्मण तीर्थविधीस येतो

तो प्रथम जो ब्राह्मण भेटेल त्यास तीर्थगुरू करितो व वरकड कृत्ये आपले शाखेनेच करितो. हलीं कसवे मजकूर ग्रामणी करून लायनी खलेल केले. तरी जसे सालाबादप्रमाणे चालत आहे त्याप्रमाणें खुर्दखत करून देणें. त्याप्रमाणें खुर्दखत करून दिले असे. पेस्तर फिर्याद येऊ न देणें.

सा. ४ ले. ७०० } (२३९०) { श. १५४० चैत्र शुद्ध ११
फ. १०२७ सु. १०१८ रबर ९ } खुर्दखत { इ. १६१८ मार्च २६

?—मुतसदियानी व हुदेदारानी हाल व इस्तकबाल व मोकदम मौजे वेलपिपलगों परगणे निवासे.

दाशो माणको वडवा यासी इनाम दर सवाद कसबे मजकूर गज सगयेनी बरहुकूम परवाना नवाबसाहेब, जैसे चालिले आहे तेणेंप्रमाणें चालविजे.

सा. ३ ले. ४७० } (२३९१) { श. १५४० ज्येष्ठ व. ५
सु. १०१९ जवल १८ } { इ. १६१८ मे २३

मलक आबर—दाउदखान ठाणेदार कसबे संगमनेर वाघी.

मोकदम व रयान कसबे मजकूर यानी अर्जी कळविले की,कृष्णाजी नरसीह मिरासीदार नव्हे, गैरमिरासीदार होऊन कुलकर्ण करतो. सिरजोरीनें प्रजावरी बाकी राहात नाहीं, लाइनी बाकी काहाडून नख्त फाजील घेऊन, मसाहती सेती बेरीज एक आणि गावात येऊन बेरीज आर्णीक करतो, रोखा लिहून कारकुनासी सांगितले तरी सरंजामी करीत नाहीं, सालगुदस्ता रयतीचे फाजील तहसील कृष्णाजीनें नेली आहे ते देविली पाहिजे व कृष्णाजीचे रयेत खुशनुद नाहीं. तरी या अमलाची तहकिकी करून वाजवी पुरसीस करीत नाहींत; तुमचे ठाणे ते जागा असता तुम्हास खबर नाहीं काय माना आहे? रयेतीचा दिलासा करून कौर्दीमामुरी होये तो आमल. कोण्हाची कोसीस न कीजे. रयेतीची फिर्याद येऊ न दीजे.

पे. द. ३१ ले. ८ } (२३९२) { श. १५४० आषाढ व. ८
सु. १०१९ } कौलनामा { इ. १६१८ जुलै ५

ग. पतंगराऊ राजे—

कान्होजी जुझारराऊ देशमुख तपे कानदखोर मामले गाइर.

तुवा हुजूर येऊन मालूम केले जे,तर्फ मजकूर साल गुदस्ता साहेबास मुकासा अर्जानी जालियावर उगवणीचा व लागवणीचा हागाम हे दोन्ही कामे जाली पाहिजेती. शेरीकरास महाली पाठविले. कामाची सरंजामी करून साहेबाचे वंदगीस आलो. हालहवाल सांगितला. साहेबी इनामतीचे भोगवटियाचे कागद दासवा म्हणताती. यावर हैवतखान आदिलशाही होते. तर्फ कबज केली. तर्फेस

काबिजाती येता आधी याला घालून तर्फ लुटून नागवून तलफ केले ते वस्ती कागद गेले. मग रयतीसी कौल देऊन वसाहती करू लागले. (अपूर्ण)

सा. ३ ले. ४७१ } (२३९३) { श. १५४० भाद्र. शु. १३
सु. १०१९ रमजान १२ } { इ. १६१८ ऑगष्ट २३

मलिक सर्क मलिकअंबर—कारकुनान परगणे संगमनेर.

पंताजी रखमांगद कोकील मालूम केले जे, आपले वडिली नरसोदादा भानजा त्यास यरेदी ठेविले होते. त्यासी खुदाई जाल्या उपर त्याचा फर्जद कृष्णाजी नरसीह आजवर चालवीत होता. हाली कृष्णाजीनें कसबा रजीस केला, मोकदमास मागे सारून सिरजोरीने अमल करतो, असे तमाम रयतीने सांगितले-वरून त्यास दूर करविले. तरी आपले कसबे मजकुरीचे कुलकर्ण मिरासी आपणास देववणे. पंताजीस कुलकर्ण दिधले. लुगडी देऊन पाठविला. यापासून कुलकर्णीचें काम घेणें. कृष्णाजीपासून पेसजीचे कागद वा हिशोब रयेतीच्या मुकाबल्याने घेऊन याचे हवाली कीजे.

सा. ४ ले. ७४७ } (२३९४) { श. १५४० मार्ग. शु. १०
हि. १०२७ जिल्हेज ९ } आज्ञापत्र { इ. १६१८ नोव्हें. १७

?—जुझारराऊ मरळ आदिकारी तर्फे कानदखोरे.

आदिलशाही लोक सरहद रुस्तुम वाई व फलटण येथे येऊन तसवीस देताती. यावद्दल विठोजी सितोळे देशमूख प्रगणे पुणें यास मसलहतीचे काम फर्माविले आहे. तुम्ही विठोजीनजीक जाऊन मसलती सरंजाम करणें. हुजरून सरंजाम अहडोन तुमची सरफराजी होईल.

सा. ४ ले. ७४८ } (२३९५) { श. १५४३ आश्विन व. ८
हि. १०३० साबान २२ } आज्ञापत्र { इ. १६२१ जुलै १

?—कानोजी तर्फ कानदखोरे.

किले रोहिडाचे नाईकवडियास सिरवलीची मसलहती फर्माविली आहे. तुम्ही त्यानजीक जाऊन मसलहतीचे काम सरंजाम करणें.

सा. ४ ले. ७४९ } (२३९६) { श. १५४३ कार्तिक शु. १३
सु. १०२२ जिल्हेज १२ } कौलनामा { इ. १६२१ आक्टो. १८

मलिक जमरुतव हवालदार किले हाय सर सिले किले राईर—

बावाजी जुझारराऊ आदिकारी तर्फे कानदखोरे.

आलम पन्हाईचा फर्मान तुम्हास मन्हामती जाहाले आहे. अजमितीसी सिरी धरून बदले इनामती मौजे २ मौजे पावे टके ८२५ मौजे धानेब टके६ १९ येकूण टके

१४४४ हे खाउनु दिवाण नफराई करून पिढी दरपिढी इसावतीचे गाव दिधले आसती. हजरतीचे केसाची आण असे.

सा. ४ ले. ७०१ रखर ८ } (२३९७) { श. १५४३ फाल्गुण शु. १०
सु. १०२२ हि. १०३१ } खुर्दखत { इ. १६२२ फेब्रुवारी १०

?—मुतसदियानी महमात मौजे निंबोडी.

सिवदास भट बिन कृष्णभट यासी इनाम जमीन चावर येक देखील नख्त-याती ता (?) देह कुलबाब कुलकानू ता इहदे (?) तसरुफासी–वतन जैसे चालिले तसे चावर नीम ·॥· दरहर साल चालवीजे.

सा. ३ ले. ६५६ } (२३९८) { श. १५४३
सु. १०२२ } { इ. १६२१

खिलतखान मौलाना बाबा खुली—कारकून परगणे इंदापूर.

काजी हाफीज यास कलस येथे चावर १ इनाम आहे. परगणे मजकूर साहेबास मोकासा अर्जानी जाला. तरी काजी यास तसरुफाती खातिरेस आणून सदर इनाम चालवीजे.

सा. ४ ले. ७५० } (२३९९) { श. १५४४ ज्येष्ठ वद्य २
हि.१०३१ रजब १६ } कौलनामा { इ. १६२२ मे १७

?—जुझारराऊ देसमुख तर्फ कानदखोरे.

तुम्हास मुकासा मऱ्हामती करून दिले आहे. मसलहतीचे कामास आजाल-खान ते तर्फेस नामजाद केले आहेती. त्या नजीक साबित असत जाणें.

सा. ३ ले. ५७७ } (२४००) { श. १५४४ ज्येष्ठ व. ३
सु. १०२२ रवल १६ } महजर { इ. १६२२ मे २५

?—लखजी भडाळा मोकदम मौजे आंबवले इसाफती देशमुख.

इनामती मोकदम मजकुरास नक्त टके २ व उक्ता टका १ यास टके १० व खाचर हे रकमेवेगळे चिचवले खालील हे देशमुखाच्या वडिलानी दिल्हे. ते खाऊन देशमुखाची चाकरी करुन मौजे मजकरची मोकदमी खाऊन सुखी असिजे.

सा. ३ ले. ६५५ } (२४०१) { श. १५४४ श्रावण व. ४
सु. १०२३ रमजान १९ } { इ. १६२२ आगस्ट २५

दिवाण ठाणे इंदापुर—

हुद्देदार व मोकदम कसबे इंदापुर व कलस परगणे इंदापुर.

काजी हाफीज...गिजमती नसीद कसबे मजकुर यासी इनाम इंदापुर चावर ३ व कलस चावर १ आहे. दरहुकूम रजा इनाम मोकरर २ केला आहे. चालवीजे.

सा. ३ ले. ६२५ }
श. }
(२४०२)
यजितखत
{श. १५४५ मार्ग. शु. ५
{इ. १६२३ नोव्हें. १६

भिकाजी नाइकजी डिमला मोकदम मौजे सिवर व कल्याण तर्फ खेडेबारे.

तानजी कृष्णाजी डिमला मौजे कल्याण—

आपल्या वडिलीं सांगितले म्हणून तुम्हासी मोकदमीबद्दल भांडलो. आपल्यास मूलपुरविसी होत नाहीं. आपण तुमचे बुडिचे नव्हे. आपला वंश कदमाकडील च ते दिगुली. ( ? ) कुडी एक. आपली आजी गोडाई हिजपासून काही बद आमल जाला होता. आपले कुलीस बोल लागला. आपण खोटे. आपणासी मुकदमीसी अर्थाअर्थी संबंध नाहीं.

सा. ४ ले.७३१ }
सु. १०२७ सफर ५ }
(२४०३)
खुर्दखत
{श. १५४६ मार्गशीर्ष शु. ७
{इ. १६२४ नोव्हेंबर ७

महाराज उदाजीराम—कारकून परगणे येदलवाद.

कसबे मजकुरी त्रिंबकजी नायक आपण जे पैके लागतील ते वेंचून तले करू पहातातीं. तरी त्यासी तेरा नितने तीन विघे १३०३ म्ह. १ चावर इनाम अजगमम्हामती करून दीजे. आबादानी होईल. उदीम बहूत होईल. ( सु. फरुकी आहे. )

फा. सा. खं. १ ले. ७२ }
हि. १०३३ }
(२४०४)
{श. १५४५–४६
{इ. १६२३–२४

परमेश्वराचा चाकर याकूत मलिकअंबर जंगीखानी १०३३ साल.

सा. ४ले.७०२हि. १०३५ }
सु. १०२६ रजब २३ }
(२४०५)
खुर्दखत
{श. १५४७ चैत्र वद१०
{इ. १६२५ एप्रिल २१

?—मुतसद्दियानि महमात परगणे निवासे.

दादो माणको वडवा यास खैरातीबद्दल पिपलगौ येथें चावर १ व नरसो पीलदेऊ व माणको दादो वडवा यांस म्हाळसादेवी व भोगलगौ येथें चावर १ इनाम आहे. चालवीजे.

सा. ४ ले. ७१० }
सु. १०२६ सौवाल २ }
(२४०६)
मिसेली
{श. १५४७ आषाढ शु. ४
{इ. १६२५ जून २८

मलिकअंबर—कारकून मामले मुर्तजाबाद उर्फ चेऊल.

मामले मजकुरु हसम ( शिपाई ) दिवाणकामास पुरत नाहीं. येकसे हसम देववणें. रेवदंडा सारद आहे. हली नसंरतखान गेला आहे. फिरंगीयाचा दगेदगा आहे. निपादास्ती देववणें. अर्जदास्त हुजरूं पाठविणें.

सा. ४ ले. ७१८
सु. १०२६ सौवाल १७
(२४०७)
कौलनामा
श. १५४७ आषाढ व. ५
इ. १६२५ जुलै १३

धारराऊ [ व ] चिनोजी राजे देसमुख परगणे फलेटण—
खडोजी राजे व बाजीराव घोरपडे मोकदम मौजे कापसी परगणे मजकूर.

मौजे मजकुरीची पटेलगी तुमचे वडील चालवीत होते. हाली बोबडे हरकत करतात. तरी बोबडे गैर मिरासी, त्यास दूर करून पटेलगी तुम्हास दिल्ही असे.

सा. ४ ले. ७१९
सु १०२६ मोहरम १
(२४०८)
मिसेली
श. १५४७ आश्विन शु. २
इ. १६२५ सप्टेंबर २३

कोबाजी राजे खडाडे—
हुद्देदार व मोकदम, रयानी मौजे कापसी परगणे फलेटण.

खडोजी वा वाजी घोरपडे पटेल मोज मजकूर यास कदीम चावर ॥ ज्याजती मन्हामती चावर ॥ बिघे बीस जिराती ०२० ।१० माहासूल वा नख्तयाती वाजे उजुहाती कुलकानूसी दिले असे.

सा. ३ ले. ६५७
सु. १०२६ रवल २८
(२४०९)
श. १५४७ मार्ग. व. १४
इ. १६२५ डिसें. १९

दिवाण ठाणे परगणे इंदापूर—हुद्देदार मोकदम.

काजी खोजा हुजर काजी इमाद त्याने मौजे काटी परगणे मजकूर मसिदीचे भोगवटे दूप करून रोशनाईबदल चावर १ घेतले. दरमाने मसिदीचे खबर घेता, खिजमती न करता खातो येसे मालूम जाले. दरम्यान सुलोखाले कारकीर्दी मुला महमद येदिलशाही ते वस्ती इमादे हुजमती घेतली. यावरी साहेबांस महाल. अर्जानी जाला. तरी काजीकडे तसरुफाती चालिले असेल ते रीती चालवीजे.

पे.द.३१ ले.९
सु. १०२६ रखर ६
(२४१०)
श. १५४७ पौष शु. ८
इ. १६२५ डिसें. २६

बजाजी आटोले सेनाबारासहस्री—रा. येसाजी खंडेराव.

रा. तुकोजी धुमाल यांसी मुकासा दिल्हा आहे. तरी मुकासाबाबेचा वसूल मझार निलेचा देवणे व अधवड बकरे देवणे. गै न कीजे.

सा. ४ ले. ७०३
सु. १०२७ जवल ५
(२४११)
खुर्दखत
श. १५४८ माघ शु. ५
इ. १६२७ जानेवारी १२

दिवाण ठाणे परगणे निवासे—
मोकदमानि मौजे बेलपिपलगाऊ परगणे मजकूर.

दादो माणको बडवा सेकीन निवासे ठाणा येऊन मालूम केले की, साल मजकुरी ताजे खुर्दखताचा उजूर करितातो. तरी इनामदार मजकुरास भोगवटा तसरुफाती गहदम चालिले असेल तेणेप्रमाणे साल मजकुरी दुमाला कीजे.

सा. ३ ले. ६२४ } (२४१२) { श. १५४९ चैत्र शु. २
सु. १०२७ रजब १ } { इ. १६२७ मार्च ९

गुंजनमावल परगणे मुरंबदेऊ मुजाफती मामले मजकूर येथील देशमुखी हैबतराऊ कान्होजी व हावाजी हैबतराऊ चचरे भाइ हकावदल भांडत व जमेती करून तर्फ मजकूर तसवीस देऊन खराब केला. कान्होजीनी आंबवणे येथे कमीन राहात होता त्यास अर्जोजी गिरराव व हावाजी देशमूख या हाती सांगोन पाठविले की, रोहिडेकर देशमूख आपणास जिवाचे जमान होतील तर आपण हरणसखोरियास जाईन. यैसे बोलोन मुरंबदेव तोरणे किले कोंढाणा ते वाट धरिली. यावरी कान्होजी जमेतीचे जोरे कमिनाचा दिवटिया नुकसान केला; गंभीररायाचे माणूस तीन पोटावरी हाणोन मारिले. कान्होजीने डोंगर धरिला. कमीन आंबोणियास येऊन अर्दास व महजर रवाना केला. मग कमीन हरणखोरियास जाऊन तेथे कृष्णाजी बांदल जमेतीसी भेटला. कौल, फर्मानाची व शर्तीची बव्ळकटी करून रायाजी, बालाजी, सूर्याजी व हावाजी हैबतराऊ कमीनाबरावरी देउनु व आपली जमेती देउनु तर्फ गुंजनमावल येथे आणिले. एकादो गावींचे कुणबी त्यास भेटविले. साहेबी नाइकजी याचे नावे फर्मान, कौल, लुगडी हे नफर दौलतख्वाह असती म्हणून सादर केली. हली कान्होजी मुरंबदेऊ व तोरणा किले कोंढाणाचे वाडीस माणूस व आपण गहोन आसनी मार्गे तर्फ मजकूरचा मोकदम दस्त करून नेला. यैसे रयेतीस तसवीस देऊन हरामखोरी करतो. त्यास मदती रोहिडेकर देशमूख देतो व आसरा किले मुरंबदेऊ व तोरणा व कानदखोरेचे देशमूख व देशकुलकर्णी देतो तरी ताकीद दिली पाहिजे. तरी जो अदिकारी मामले मजकुरावरी येउनु कीर्दमामुरी व दिलासा काम करतो त्यास कौलच आहे. व तुम्हीहि जो अधिकारी बाहेर पडिला आहे त्यासहि समेतेस मालूम करून दस्त कीजे. आसरा दिधला त्यासहि ताकीद असे. कृष्णाजी बांदल आपले जमेतीने आला त्यास कौलाची बव्ळकटी, शाल, होन ५ व विश्वासराव हेजीब शेला १ व होन १ दिले. कमीने बाबाजी, रायाजी व बाव्ळाजीस फर्माविले की तर्फ मजकूर सरखोत व रयेती आणोन मामुरी होय ते करणे. सालमजकुरी तेजीपटी उलफपटी झडतीस उगवणी कीजे. पारवडी, आसनी, कुरंगवडीचे मोकदमास दिलासा करून बुहुडाविले. तुम्ही माहालीचे कारकून रयेतीचा दिलासा करून कौल देऊन मामुरी कीजे. गुंजणमावलींचे बाबे मोहबतखान व आवदुला कोके याचे कारकुनी अर्दास रवाना केली आहे. माकुल हाल असेल ते सरंजामी होईल. तर्फ मजकर

कमीने राहावे तरी जागाजागाचे काम खोलवेते. घाट तरफेस स्वारी करून जाऊन तेथे सिस्त झाडा खबर लिहिणे.

सा. ४ ले. ६९० } (२४१३) { श. १५४९ अ. श्रावण शु. १०
शक व सु. १०२८ जिल्काद ८ } { इ. १६२७ जुलै १२

काजी अकरम बिन काजी अबदुल कादीर खतीब कसबे निवासे खुर्द—
अंतो कृस्ण पारनाक सेकीन मजकूर.

आपला मायेआजा त्याची मिरासी जमीन साहाण ही तुम्हास होन ५ यास खरीदी दिधली. जमिनीचे बाबे कोण्ही वारीसदार नाहीं. पण आला तर आपण निवारूं. तुम्ही खरीदी मिरासी म्हणौउनु सुके नांदिजे.

पे. द. ३१–११ } (२४१४) { श. १५५०
सु. १०२९ माहे (?)११ } { इ. १६२८–२९

( निजामशाहा ? )—देशमुखानी परगणे पुणे.

रहिमखान अदमखान हुजूर दस्त केले. याचा मुकासा परगणे मजकूर अमानत केले असे. मशारइलेचे घोडी तस्त व गला कैद करुनु...कारकूनही दस्त करणे.

सा. ४ ले. ७०५ } (२४१५) { श. १५५० चैत्र वद्य २
सु. १०२८ सावान १५ } कौलनामा { इ. १६२८ एप्रील १०

दिवाण मामले बंदर मैमून मुस्तफाबाद—
हैबतराउ वा बालाजी देसाई तपे गुंजनमाउलु.

तुमचे बाबे मोकदमल, डमसाल, सुज्याआत अयार प्रतापराऊ, रायाराऊ मालूम केले, तरी तुम्ही आपले हसम वा राऊत घेउनू हुजूर येईजे. रोजगाराचे हि फ़िकीर बरवे करून. तुम्ही खातीर खुद जमा करून येईजे.

सा. ४ ले. ७२० } (२४१६) { श. १५५० आषाढ शुद्ध ३
सु. १०२९ जिल्काद २ } { इ. १६२८ जून २४

मुधोजी वणगोजी नाईक—
विठोजी घोरपडा मोकदम व प्रजा मौजे कापसी परगणे फलटण.

परगणा मजकूर हजरत आलमपन्हा साहेबी आम्हास मुकासा मन्हामत केला आहे. तुम्ही कविहाल ( निर्धास्त ) होऊन कीर्दीमामुरी करणें. तुम्हास लागले ठेपेचा कौल असे. कीर्दीमामुरी करावयास चूक न करणें.

सा. ४ ले. ७५१ } (२४१७) { श. १५५० श्रावण वद्य ३०
सु. १०२९ जिल्हेज २८ } कौलनामा { इ. १६२८ आगष्ट १९

खुदावंदखान—बाबाजी जुझारराउ देशमूख तपे कानदखोरे.

तुज सन सवापासून इस्तावा बांधोन इजारती दिधली. तुजवरी इजारतीपैकीं सालगुदस्ताचीं बाकी राहिली आहे. ते रयेती निसबती जे असेल ते त्यापासून घेणें तुझे निसबतीस सिस्त बेरीज खुद बाबा टके ३००० तीन हजार आहे त तुवा आपणापासून इसावती व इनामती व हकलाजिमा व बिस्वा येसी जागा माहाल्लीच्या कारकुनास दिधला आहे. इनामपटी सालमजकुरी टके ६०० साहसे तुज माफ केली असे. कविहाल होऊन दिवाण कामात साबीत असणें.

सा. ४ ले. ७५२ } (२४१८) { श. १५५० भाद्र. शु. ११
मोहरम १० } आज्ञापत्र { इ. १६२८ आगस्ट ३०

?—जुझारराऊ देशमूख तपे कानदखोरे.

ते तरफेस गनीम जोरावर होऊन आले आहेत. त्यांचे रोखे वजारत माब राउ अजम शाहाजी भोसले सर करून पाठविले. तुम्ही आपले जमीयेतिनसीं येऊन मशारइले नजदीक राहोन हजरतीची मसलहती करणें. ( ले. २४१७ वरून वर्ष गृहीत धरलें आहे. )

सा. ४ ले. ७५३ } (२४१९) { श. १५५० कार्तिक वद्य १४
रवल २७ } आज्ञापत्र { इ. १६२८ नोव्हेंबर १४

?—जुझारराऊ मरल.

आपले जमयेतीनसीं शाहाजी भोसले यानजदीक मुशरफ होणें. गनीमास गाशिमाल देऊन अपली तरकशबंदी जाहीर करून फतेची खबर पाठवणे.

सा. ३–४४९ } (२४२०) { श. १५५१ ?
कागद सिरस्ता { इ. १६२९

खान दिलावरखान वगैरे—कसबे संगमनेरचे दोन देशमूख.

कागदाचे सिरस्ताबद्दल व कसाबियाबद्दल तिमाजी व सिमाजी करकसा करीत होते. हाली तह केला तो–(यापुढें कसब्याची तेरीज, रसद, बेरीज, तकरीर, कसबा इत्यादि कोणीं काय लिहावें त्यासंबंधीची १०–११ कलमें दिलीं आहेत.) तेणेप्रमाणे हर दो जनी वर्तणे.

सा.३ले.४४८ } (२४२१) { श. १५५१ !
सु. १०३० ? } { इ. १६२९-३०

दादाजी विस्वनाथसाहेब--कारकुनानी परगणे अकोले.

परगणे मजकूर पैकी कर्यांती राजूरचे कुलकर्नी तिमाजी व सिवाजी हे कुलकर्नाचा करकसा होता म्हणौनु आले. मुनसफी करता फडी वाद सागितला, माहाली गोहीसाक्षी आहे. तिया वेगळा निवाडा होत नाही म्हणौनु कुलकर्न अमानत केले. पेस्तर माहादाजी रंगनाथ महालास येतील ते वख्तीं साक्षी पाहोनु निवाडा करून ज्याचे होईल त्याचे दुमाला करतील. तश्रीफ दिली आहे ते ठाणा जमा करणे.

सा. ५ ले. ७६८ } (२४२२) { श. १५५१ ज्येष्ठ व. ६
श. } खरेदीखत { इ. १६२९ जून २

मलजी बिन गणपाटील मौजे पिंपलगौऊ पिसा—

रा. बालाजी कोनेर परगणे पारनेर सरकार जुन्नर.

सालगुदस्ता मोगली, गावावरी धावणी करून गाव मारिला. वस्तभाऊ गुरे-ढोरे तमाम गावाचा बंद धरून नगरास आणिला माणसे दादले व बाइला व लेकरे यैसी सेदोडसे बंदी राहिली; कितेक बंदीखानी मेली. मग दरम्यान भले लोक होऊन खडणी होनु २५०० झाडा करणे कुल बद सोडनुक केली. यावर ज्याची माणसे गुतली होती यासी सोइरिया-धाइरियापासी माले भीक हाली मागोन पैकियाचा झाडा केला. पैकी होन राहिले त्यास ततबीर नाही. माणसास खावयास नाही. मानसे सुजावया जाली व मरावया जाली. आपणास ततबीर कोठे जाली नाही; मग तुम्हापासी नगरास आलो. येऊन होन घेऊन सदरपैकी अपण तुम्हास मोकदमी निमे तवरत बंद दिधली आहे. तुम्हापासून होन २००० घेऊन पाटिलकी तुम्हास दिधली असे हे पत्र सही.

सा. ४ ले. ६९१ } (२४२३) { श. १५५१ भाद्र. शु. १२
सु. १०३० मोहरम ११ } कौलनामा { इ. १६२९ आगस्ट २१

दिवाण खालिसे परगणे निवासे—

मोकदम व चौगुले व देसक व माहाजन कसबे सोनई परगणे मजकूर.

तुम्ही मकसूदनामा लिहिला कीं, सालगुदस्ता मोगल येऊन तमाम सिवार तसनस केला. भोसालियासी जागीर जाली तेही ग्यतेसी बहुत जलल केले. लोक परागंदा झाले. मख्ता सालसाल होत गेलियाकरितां येका प्रजेची तुटी येका प्रजेवरी पडिली तरी मक्ता माफ करून कौल देणें. कसबे मजकूर प्रजा येतील तरी निमे माफ करून निमे हासील घेणें. दरिवा माफ करून कदीमकानू आदा करून निमे हासील घेणे. म्हणौन खातिरेस आणून कौलनामा सादर केला.

सा. ३ ले. ४४७ } (२४२४) { श. १५५१ आश्वी. शु. १०
सु. १०३० सफर ८ } खुर्दखत { इ. १६२९ सप्टेंबर १६

दिवाण ठाणे परगणे अकोले—

कारकून, देसमुख व मोकदम कर्याती राजोरु परगणे मजकूर.

तिमाजी गंगाधर कुलकर्णी कर्याती राजौरु हुजूर मालूम केले जे, कर्याती मजकूरचें कुलकर्ण आपली मिरासी. ममलकत मदार मलिकअंबर कारकीर्दपासून आपले वडील खात आले. हाली आपला गोत्रज सिवाजी, आपली तक्सीम आहे म्हणून कुसूर करतो. कर्यातीचे हवालीचे देसमूख बालोजीहि तिमाजीचाच भोगवटा म्हणऊन गोही जाहीर करतो. तरी याचे वतन याचे हवाला करणे. विसाजी-( तिमाजी ? ) पासून कुलकर्णाचे काम घेत जाणे.

सा. ५ ले. ७५९ } (२४२५) { श. १५५२ वैशाख
श. } संमत पत्र { इ. १६३० एप्रील मे

दादंभट्ट भट्टादि—

मुंबापुरस्छ विद्वद्दर देशस्छ चित्तपावन कर्नाटक गुर्जर प्रभृति.

सासष्टी व कुशस्थली या सारस्वतान्तर्गत पोटजाती असून षट्कर्माधिकारी आहेत. त्यांच्यामध्यें अग्निहोत्रादि असल्याचें विद्वानांच्या तोंडून ऐकू येते, कमलाकरभट्टांनीं या ज्ञातीतील संन्याशांचें महत्व स्थापित केलें आहे. दुसऱ्यानें स्वयंपाक केला असता भोजन व्यवहार होतो, ब्राह्मण यांच्यासह अनुष्ठान करतात, मात्र श्राद्ध पदावर चालते. तेव्हां हे द्विज आहेत याविषयीं शंका नाहीं. (*सह्या*)

फ्रा. सा. खं. २ ले. १ } (२४२६) { श. १५५२ अ. आषाढ शु. १४
जु. ३ तीर २ } { इ. १६३० जून १३

शाहजहान बादशाह—योग्य अधिकारी.

धारगीरवारच्या देशमुखीची चाकरी भिकूजी चव्हाण याजकडे असावी. त्यानें बळकट व प्रगतिपर अशी चाकरी करून दौलतीच्या सदिच्छेचा शिरस्ता सोडू नये. वर्तमान व भावी अधिकाऱ्यांनीं हा हुकूम पाळून त्यास त्या ठिकाणचे देशमूख जाणावें. शेतकऱ्यांनीं त्यास तेथील देशमूख समजून त्याच्या सल्ल्याबाहेर जाऊं नये. हुकुमाच्या बाहेर जाऊं नये. ता. २ माहे तीर इलाही सन ३.

सा. ५ ले. ७७७ } (२४२७) { श. १५५२ कार्तिक व. ९
सु. १०३१ रखर २३ } श्री. नं. { १६३० नोव्हें. १८.

?—बाळाजी नाईक तर्फ गुंजणमावळ.

सिदी आंबर आबदूल वाहाब ठाणेदार किले कोंढाणा.

तुमची अर्जदास्त हरसाल केली की, किले मुरंब देऊ (ताबीन)

शाहाजी राजे याचा मुरसाल सोनजी यासी गनिमानें लढाई केली व त्यास जखमी केले. आम्ही गनिमावर चालून जाऊन सिकस्त दि्धली म्हणून लिहिले. तरी तुम्ही दौलतख्वाहां आहां...आल हाल नजर आनायेत फुर्मानू तुम्हाकडे पाठविले आहेत, ते सिरी घेऊन आपला खातिरनामा राखणे.

सा.३ले.६२६ }        (२४२८)        { श. १५५३
सु. १०३२ }        { इ. १६३१-३२

सिवाजी—कारकून तर्फ खेडेबारे.

तर्फ मजकूरचे देशमुख मालुम केले की, आपला हक गावगना चालत हाता. हाली साहेबी हुजूर हुकमी अमानत करून खडमल्ता करार केला. हुकमाबरहुकूम चालिलो तो गुदरानी होइना. तरी मुदामत चालिल्यावरहुकूम दुमाले करावया हुकूम होय. खातिरेसी आणुन गावगना नख्त दरसदे रु. ३ गला केली ॰॰ हरजिनस सालाबाद दुमाला करणे. तसरुफा तुटालियाचा उजूर न करणे.

सं. सा. खं. १ ले. १६ }        (२४२९) करिना        { श. १५५३ ? { इ. १६६१

मांडवीकर पायेगुडे देशमूख तर्फ कर्यात मावळ—?

मूळ पुरुष बहिरजी; रविराव त्याचे पुत्र गोविंदराव, अर्जोजीराव ( कुडिजेकर ) भिवजीराव ( आगळंबेकर ) वगैर. गोविंदरावाचे हैबतराव हे खडकवाडीस होते. त्यांनीं खेचरे व बेलवडे हे गांव मारिले. तेव्हां ढमाले देशमूख आडवे पडले. त्यांनीं हैबतराव याचा पुत्र सर्ज्याराऊ खडकवाडीस मारिला. त्याची आई अनसावा सिके गल्यांत घालून बसली. अर्जोजी व भिवजी यांनी त्यास अग्नि दिला. सर्ज्यारावाचा मुलगा सयाजीराव. अनसावा व बतावा ( अर्जोजीरावाची बायको ) यांची सिक्याबद्दल कटकट झाली. पुढें अनसावा मेली. रायारावास कुडिजेकरांनीं मारेकरी घातले. त्याची आई नायेकावा मूल घेऊन कसबे सुपे येथें माहेरास गेली. तेथें २० वर्षे होती. कोणी वाद सांगायबासी नाहीं तो राजश्री—छत्रपतींचे राज्ये जाले राजश्री दादापंत याणी तमाम मुलकास कौल दिला. तेव्हा नायेकावा दादाजी पंताजवळ सिक्याच्या कजियाबद्दल उभी राहिली. त्याणी उत्तर दिल्हे *की आपण मुलुकगिरीस जातो तेथून आलियावर तुमची मनसुभी आणू. त्यास* ते मुलुकगिरीस गेले. पुढे धामधूम जाली...हा करिना सही.

सा.३ले.६३० }        (२४३०)        { श. १५५३ चैत्र शु. ४
श. }        { इ. १६३१ मार्च २३

संत विन बिमनाक मोकदम मौजे पोडोडि—
रायोजी पाटील आदोळे.

किले फत्तेमंगल, आपण उपवासी मरूं लागलो, मोर्ड पडलो, बहुत बेहाल जाला. याकरितां मौजे मजकुरीची मोकद्मी सारी काली व पांढरी कुलबाब: हाकलाजिमा मानमानणूक तमाम मोकद्मी होन पासष्ठ विकत दिधली. लेकराचे मिरास खाऊन सुखे आसिजे.

सा. ३ ले. ६५८ ) (२४३१) { श. १५५३ कार्तिक शु. १५
सु. १०३२ रबर १२ } { इ. १६३१ आक्टो. २९

दिवाण किले फत्तेमंगल—

हुद्देदार मोकदम खोत माहाल जकाती पेठ किले मजकूर.

मुला सेन बिन मुला अतासेन यास चावर १ बदल खिजमती मसीद व अबा सैद हाली किले मजकूर मुकासा साहेबास... सालाबादप्रो चालवीजे.

सा. ३ले. ५०९ } (२४३२) { श. १५५३ मार्ग. व. ७
सु. १०३२ जवल २० } { इ. १६३१ डिसें. ४

सैफखान——कारकुनानी परगणे देव्हरिगपेठ सरकार जुन्नर.

त्रिंबक मोरेश्वर गोसावी मुकाम उझर कर्यात जुन्नर. मर्द खुदातरस गोसावी आहेत, दुन्याई अमल करीत नाहीत, रातिदीस खुदाई दीनमतीमध्यें राहतातो, हरएक ब्राह्मण, फकीर येतो त्यास दाणापाणी घालितातो. आजी सबब मशारइलेस दरोज लारी १०८ व तेल बदल रोषनाई देवानजीक दरोज वजन शेर १ दिधली. सदरहू इनामतीस जागा महसूल हरएक बाबपैकीं बावे दारद आदा करणे म्हणोन पेसजी हुजती सादर आहे आणि कारकून सरंजामी करून झाडा करीत नाही यावरुन कारकुनी मालूम जाली. मशारइलेचा हक आसल मोर्तबे सिताब झाडा करुन देणे.

सा. ४ ले. ७३० } (२४३३) { श. १५५३ पौष शु. ३
फ. १०७१ जवल १ } महजर { इ. १६६१ डिसेंबर १४
सु.* १०६४

साहेबी महादेव नायके देशमुख परगणे येदलाबाद मयेत झाला त्याचे घर देशमुखीमधे अथवा देसमुखी आर्धी, यैसी पुरसीस केली. त्यावरी मोकदमानी सांगितले जे येही घर बांधिले तें येदिलस्या फारोखी येही कसबे मजकुरी कोठ बांधला तें दत्ताजी माहादेव नायेक घर व दुकान बांधले. त्याचे वारीस त्रिंबकजी नायेक व गोपालजी नायेक त्याचे वारीस माहादेव नायेक व दत्ताजी नायेक देशमुखी घेतली... अंमल जागीर महाराजा उदाजीराम तें घेतली. कदीम यात हवेली व दुकान आहे, कुरशा चार जाल्या आहेत. (*फारुकी सुलतानानीं नवीन सुरू केलेला सुहूर येथें आहे. विशेष विवेचन मुखांत पहावें.)

सा. ३ले.४५० }        (२४३४)        { श. १५५४-५५
सु. १०३३ }                         { इ. १६३२-३३

तिमाजी गंगाधर———तुकाजी दादा.

आपली तकसीम हवेलीचे कुलकर्ण गाव ९ आहेती. तेथील मुस्याहिरा, इनामती, सणवार, दिवाणांतील तश्रीफ येईल याखेरीज आणीक उत्पन्नापैकीं दर टकियास १६ (१८) रुके तुम्ही घेणे व ३० टके आम्ही घेणे. जो चाकरी करील त्याणे येणेप्रमाणे घेणें. याखेरीज नागोजीचे तर्फ गांव ८ खरेदी केले. त्यापैकी एकोजी गांव ४ बाकी गांव ४ याचेपैकीं होनु ४॥ तेहि सद्‌रहू प्रो वांटून घेणें.

सा.३ले.५१० }        (२४३५)        { श. १५५४ श्रावण शु. ६
सु. १०३३ }                         { इ. १६३२ जुलै १३

मलिक सैद*——

कारकून, देशमुख, महालदार इसलमाबाद व कसबे हुरवाड देऊचे.

वेस्मी त्रिंबक मोरेश्वर गोसावी सेकीन आकोले हाली मुकाम उझर, अवकात चालिला पाहिजे म्हणौनु इनाम अजरामऱ्हामती दरोज लारी १ दस्ती जागा कसबे मजकूर देखील महसूल व जरिवे, जकाती, हरएक दस्त जागापैकी आदा करणे. इस्तकाबिल अवल सालापासून देविले आहेती.

सा. ३ले.५११ }        (२४३६)        { श. १५५४ भाद्र. शु. ६
सु. १०३३ सफर ६ }                 { इ. १६३२ आगष्ट १३

राहान सर्जा——

कारकून परगणे करनाले सागुसे देसमुखानी व अधिकारी परगणे मजकूर.

बदल इनाम मोरेश्वर गोसावी यासी लारी १ दर सवाद परगणे सागुसे-पैकी देविले असे.

पे. द. ३१ ले.१४ }        (२४३७)        { श. १५५५
सु० १०३४ }                          { इ. १६३३-३४

रा. शाहाजी राजे—कारकुन प्रगणे चाकण सरकार जुनर.

रा. जोगनाथ भट बिन शंकर भट ब्रह्मे उपाध्ये सेकिन प्रगणे चाकण यासी ब्रह्मत्वाचा अधिकार आपले वरीचा पूर्वापार आहे. या कारणे याचे वर्षास होन १०० शंभरी वडिलातागाईत आहे ते तुम्ही सालदरसाल प्रगणे मजकुरीच्या पोतापैकी मशारइलेस पाववीत जाणे.

---

*ह्याच मलिक सैदनें भिवंडी (इस्लमाबाद), चेउल (मूर्तिजाबाद), कोरकोडा, अमीनाबाद, खारेपाटण, चोराटी (मुरंजन) येथील एक लारी, चेऊलहून दोन लारी मोरेश्वर किंवा त्रिंबक मोरेश्वर यांस देण्याविषयीं हुकूम दिले आहेत.

सा. ४ ले. ६८१ } (२४३८) { श. १५५५ श्रावण व. ९
सु॰ १०३४ सफर २२ } { इ. १६३३ आगष्ट १८

दिवाण तपे खारेपाटण—

खोतानि, गावकरानी व वितिकानी देहाये तपे मजकूर.

इनाम गावमना दादन हर जोइसी बिन गोपाळ जोइसी तपे मजकूर हेयासी बरहुकूम फर्मान दर देहाये सालिना लारी १ येक पेसजी चालले आहे तेसेची सन खमस सलासीन अलफ ( श. १५५६ इ. १६३४ ) कारणे, दीजे.

पे. द. ३१ ले.१३ } (२४३९) { श. १५५५ पौष शु.८
सु. १०३४ रजब ६ } सनद { इ. १६३३ दिसें. २८

—चि. राय यासी.

मालोजी नरसिंगराऊ वा विठोजी सितोला देशमूख मामले दौलतमंगल यानीं मालूम केले जे, *जकाती मामले मजकुरी आमचे विस्वे आहेत.* चौत्रे कसबे मजकूर वा चौत्रे लोहगाऊ व चौत्रे चिंचोली व मार्ग भरे व मार्ग अगटवे परिच्यावीर चौत्रे पाटस वा राजोरी येथील आपला एक उभा मार्ग व थलभरीत थलमोड मीठ भूस किराणवाव वा कापड व बाजे वाव याजवरी, अज कारकीर्द निजामशाही चालत आहे, त्याप्रमाणे सनद मराहमत होये म्हणून अर्ज केला.

पे. द. ३१ ले. १५ } (२४४०) { श. १५५५ माघ शु. ७
सु. १०३४ सावान ५ } { इ. १६३४ जाने. २५

मुऱ्हार जेगदेराऊ—

मालोजी नरसिंगराव व विठोजी सितोले देशमूख मामले दौलतमंगल.

दिनकरराव काकडे यासी मोकासा दिला आहे. त्यास जावजी बिन बालोजी काकडा मौजे मजकूर पका सुरलीत देत नाहीं. नवदाई करितो, कुले फितवितो. तरी तुम्ही त्यास ताकीद करून याचा पैका सुरळीत पावे ऐसे कर्णे.

फा. सा. खं. १ ले. ३९ } (२४४१) { श. १५५५ माघ वय३०
हि. १०४३ साबान २८ } { इ. १६३४ फेब्रुवारी १७

मुहम्मद आदिलशहा—

मूरुदेव ( राजगड ) किल्ल्याचा हवालदार, सरनौबत व नायकवाडी.

किल्ल्याची डागडुजी व दाणागोटा, रसद वगैरे यांसाठीं मलिकंबर व निजामशहा यांच्या कारकीर्दीपासून जो मुकासा चालू आहे व त्या मुकाशास जी जमेत दिली आहे ती जमेत व तो मुकासा आजही मुकरर आहे असें जाणावें व दौलतीच्या सदिच्छेच्या मार्गावर दृढ असावें.

राम. अं. १६८ पृ. ७६ } (२४४२) { शक १५५६
सु. १०३५ } निवाडा { इ. १६३४-३५.

त्र्यंबकेश्वर

सीउ भटी (ढेरगे) नवे उपार्जित आहेती राजश्री शाहाजी राजे व याचे दिमतीचे जे अहेती ते सीउ भटी आपले घरास (ने)णे. भिकंभटीसी निसबत नाही..

सा. ३ ले. ५१२ } (२४४३) { श. १५५६ कार्तिक व. ५.
सु. १०३५ जवल १८ } { इ. १६३४ आक्टो. ३१

मवाजी राजेसाहेब—कारकून मामले मुरंजन.

मोरोबा गोसावी यास इनाम बदल धर्मादाऊ दरोज लारी १ दिले आहे. साल मजकुरी कारकून इस्कील करिताती. तरी ताजे खुर्दखत दिले आहे तेणे-प्रमाणे दुमाला कीजे.

पे. द. ३१ ले. १८६ } (२४४४) { श. १५५६ माघ व. २
सु. १०३५ सावान १५ } { इ. १६३५ जाने. २५

मुरारी जगदेवराव-मालोजी नरसिंगराऊ सितोळे देशमुख मामले दौलतमंगल..

दाईमखान मुकासाई मौजे साई(व) मालूम केले की मौजे साई येथील मोकदमी देसमूख मजकुराची आहे. तेथे रायाजी सितोळा मुतालीक ठेविला आहे. तो मुकासियाचा टका देत नाही. आपण देसमुखास सांगितले त्याणेहि खातिरेस आणिले नाही. तरी तुम्ही देशमूख मौजे मजकुरीचे मोकदम असोन आपलिया मुकासियाचे पदरी साईवचे टके, माफीक कानू त्याचे पदरी घालणे. फिरोन बोभाट आला म्हणजे मुलाहिजा होणार नाही. ताकीद असे.

सा. ३ले. ५१३ } (२४४५) { श. १५५७
सु. १०३६ } { इ. १६३५-३६

स्याहाजी राजे—कारकून अमिनाबाद उरुफ पाली.

रा. मोरेस्वर गोसावी मालूम केले, आपणास दरोज १ लारी इनाम दिधली आहे. एकदोन वेल माणसे पाठविली ताकीद खुर्द खतेहि पाठविली परी कारकुनी आदा केला नाही. तरी गोसावियास रजीस करणे कार्य माना आहे. आता खुर्द-खत पावताच दरोज लारी १ खारीज जकाती व महसूल व हरएक दस्तजागापैकी आदा करणे. फिर्याद आलिया तुम्ही जाणा.

एपि. कर्ना. व्हॉल्यु. ७ इ. नं. ३२४. } (२४४६) { श. १५५७
हिजरी १०४५ } { इ. १६३५

हा किल्ला म्हणजे विजयाचे चिन्ह होय. धर्मरक्षक सुलतान इब्राहीम अदीलशहा त्याचा पुत्र जो महमद त्याच्या राज्यांत हा बांधविला. (मसूर मदाग तलावासमोरील शिलालेख.)

नंदोबा पत्रक (पे, ते, रे, काफ) याजकडे असलेल्या देशकुलकर्णाच्या मिराशी-बद्दल (आपणांस मिळावी यासाठीं) मिराशीचा दोन सालाचा वसूल, म्हणजे एका सालचा नजराणा, १०० होन देण्याचें कबूल केलें आहे. तरी वरील मिरास त्याजकडे तीवरील हक्क वगैरेसह चालू ठेवावी. नजराण्यापैकीं अर्धा हिस्सा बाद-शाही खजिन्यांत व अर्धा हिस्सा व्यवस्थाखातीं जमा करावा. या सालचे ५० होन वसूल झालेले आहेत व पुढील सालीं वसूल व्हावयाचे ५० होन वसूल करून खात्याला दाखल करावे.

| | | |
|---|---|---|
| एपि. कर्ना. १० सिद्लघाट ४९ <br> *ईश्वर संवत्सरे कार्तिक वद्य १२ | (२४५१) | श. <br> इ. १६३७ ? |

(हुजगुर (Hujgūrs) गावांतील सानभोगाच्या शेतामधील (Sânanho gas) शिलालेख)

इ. स. १६३७ या सालीं श्रीमंत देशकुलकर्णी सामण्णा (Sâmanna) यांनीं हसुगूर या गावच्या शेतांतील (*manya*) बक्षिस दिलें.

| | | |
|---|---|---|
| पे. द. ३१ ले १० <br> सु. १०३७ | (२४५२) <br> थलझाडा | श. १५५८ <br> इ. १६३६ |

मौजे वहुली तर्फ मुठेखोरे मुलूक डागाण सुभा बेदर आमल नव छेत्रे सिर-काली वसाहात किले मुरढू पेठ उंबरडी येथील सर्व वतनदार हे ढोंग सुखी होते. त्यावर वतन समधे सुभाहून कसाला पडिला म्हणौन परागंदा जाले. वसाहत बुडाली.... यासी श्रीमंत महाराज सिव छेत्रपती स्वामीच्या कौलास रा. दादाजी कोंडदेव याचे कारकीर्दीस सावाजी गंभीरराव मारणे देशमूख तर्फ मजकूर याणी उगवणीची चौकसी करून वतनदारीचा तह घर म्हैस वगैर पालपाळणूक यावयाचा करार करून जीर्णोधार वसाहतीस चौथले केले.

| | | |
|---|---|---|
| फा. सा. खं. १ ले. ३८ <br> सु. १३०६?, हि. १०४६ जवल ४ | (२४५३) | श. १५५८ आश्विन शुद्ध ५ <br> इ. १६३६ सप्टेंबर २४ |

मुहम्मद् आदिलशाह—देशमूख तपे रोहिडा.

या तप्यांपैकीं अर्धा भाग गोंदाजी शिंदे यास आणि अर्धा माणकोजी व चीरसिंगजी यास जागीर दिला आहे. उपर्युक्त तपा त्यांचे ताब्यांत देणें.

---

*शक १६१९ ला ईश्वर आहे. म्ह. १६९७ इसवी येतो !

पे.द. ३१ ले. १६ }
सु. १०३७ रजब २० }
(२४५४)
{ श. १५५८ मार्ग व. ८
{ इ. १६३६ डिसें. ९

महमदशहा महमदआली—हवालदार व कारकून आंमल दौलतमंगल.. बापूजी मुद्गल यास इनाम बमय कुलबाब मेहेरबानगी फर्माऊन ठेविले आहेत दुमाला करून हुकुमाप्रमाणे चालवावे.

फा. सा. खं. १ ले. ४० }
सु. १०३७ हि. १०४७ सफर २३ }
(२४५५)
{ श. १५५९ आषाढ वद्य ९.
{ इ. १६३७ जुलै ६

मुहम्मद आदिलशहा—कान्होजी जेधे देसाई किले राहिडा.

सध्यां दरबाराच्या ध्यानांत आलें कीं, कान्होजी यानें सद्धेतु व निष्ठा यायोगें बादशाही मसलतीच्या बाबतींत प्राणार्पण करण्याचे कष्ट व अतिशय उपाय केले व करीत आहे. हा अर्थ आमच्या मनास पसंत पडला व सुख झालें. तेव्हां आतां हें फर्मान पोहोंचतांच किल्ला घेणें व हरामखोरांना दफे करणें यांत दृढ राहून नमकहलाली व चाकरी व्यक्त करावी म्हणजे व्यवस्था (इनामाची?) व उत्कर्ष या बाबतींत हुकूम होईल.

सा. ३ ले. ६५९ }
सु. १०३८ जवल ८ }
(२४५६)
{ श. १५५९ आश्वीन शु. ९.
{ इ. १६३७ आक्टो. १७

दिवाण ठाणे बायेबडे परगणे इंदापूर—

हुदेदार मोकदम देहाये कसबे मजकूर.

काजी अबन बिन काजी हार्पाज परा यास चावर ३ दरोज तेल व कुलफर्माये गहदम चालिले आहे फर्मान व भोगवटियाचे कागद फितरतीकरता गूम जाले. हाली साहेबास मुकासा अर्जानी जाला तरी इनामदार मजकुरास त्याचे इनाम भोगवटे चालवीजे.

सा. ३ ले. ५७९ }
सु. १०३८ जखर ६ }
(२४५७)
{ श. १५५९ कार्तीक शु. ९
{ इ. १६६३ आक्टो. १५

—कारकून तपे रोहिडे.

कानोजी जेधे देसाई तपे भोर किले मजकूर याणी मेहनत करावयासी कोताई न केली, दुर्दिन केले. याकरितां बहुत कृपा करून मौजे चिखलगांव किले मजकूर हा इनाम दिल्हा. तरी कुलबाबकानु त्याचे स्वाधीन वंशपरंपरेनें करणें.

मु. घो. इ. प. अ ले. १२ }
हि. १०४७ रजब १७ }
(२४५८)
{ श. १५५९ मार्गशीर्ष वद्य ४
{ इ. १६३७ नोव्हेंबर २५

[ मुहम्मद आदिलशाह ]—[ शाहजी भोसले ? ].

राजा शाहाजी भोंसले यांनीं दरबारांत तक्रार केली कीं, मुधोळची जागीर, .

वाई परगण्यांतील गांवें व किल्ले आणि कऱ्हाड परगणा यांतील निम्मा हिस्सा पूर्वीपासून माझा असतां हल्ली चोल राजाचा नातू प्रतापराव घोरपडे बहादूर यानें सर्व गांवें व किल्ले जबरदस्तीनें आपल्या ताब्यांत घेतले आहेत. स्वतः वल्लभसिंघाचा नातू महालोजी यास त्याचा हिस्सा देत नाहीं. अमानसिंग व अंबाजी यांना मुधोळपैकीं हिस्सा देतो. तरी हुजूरनीं ताकीद करून माझा स्वतःचा हिस्सा व वल्लभसिंघाचा नातू महालोजी याचा हिस्सा पावयास लावावें. त्यांचा अर्ज ध्यानांत आला. हें कुल जुनें व विश्वासु असल्यानें त्याचें पोषण करणें योग्य आहे. म्हणून आम्हीं असा हुकूम करतों कीं, चोल राजाचा नातू प्रतापराव यानें चौऱ्याऐंशी गावांसह मुधोळ, तोरगल परगणा, कर्नाटक व कऱ्हाड यांतील निमे गांव व सात हजारी मनसब येवढा सरंजाम आपल्या ताब्यांत ठेवावा. राजा शहाजी भोसले यानें वाई परगण्यापैकीं अर्धीं गावें, कऱ्हाड परगण्यांपैकीं सव्वीस गांवें, अर्धा कर्नाटक व पांच हजारी मनसब येवढा सरंजाम ठेवावा. महालोजी बिन बहिरवसिंग बिन वल्लभसिंग यानें विजयनगरपैकीं तीस गांवें व दोन हजारी मनसब आपल्या कबजांत ठेवावी. याबद्दल त्याला निराळी सनद दिली आहे. आतां बादशहाच्या या देणगीनें बादशाही हुकुमावरून या कुलांतील सर्व लोकांनीं राजी राहून आमच्या दौलतीची सेवा करण्यास तयार असावें.

फा. सा. खं. १ ले ४२ } (१४५९) { श. १५५९ फाल्गुन शुद्ध १
मु. १०३८, हि. १०४७ रमजान ३० } { इ. १६३८ फेब्रुवारी ५

मुहम्मद आदिलशाह—किले गोहिड्याचे अमलदार व देसाई.

कोरलें, वडटेवी व थिटेवर हीं गांवें वाई परगण्याचा देसाई ककाजी (गंगाजी) याजकडून काढून मान्जी साठ्या याजकडे चालूं होतीं. आतां तीं पूर्वीप्रमाणें गंगाजी देसायाकडे दिलीं आहेत. तरी तीं गंगाजीच्या ताब्यांत देणें.

सा. ३ ले. ४५० } (१४६०) { श. १५६०–१६०० ?
{ इ. १६३८–१६७८ ?

हिरोजी व रायाजी देसमुख परगणे अकोले—
कसोपंत व माणकोजीपंत देसपांडिये परगणे अकोले.

.... गोविंद धोडोस प्यादे पाठवून दरबारास आणले. ताकीद करता त्याने पुरसीस केली कीं, आपण परवाणा घेतला नाही, महालास पाठविला नाही. पाठवुनु ते आपली गर्दन मारिली पाहिजे. याची तहकिकात हुजूर पाठविणे म्हणून लिहिले. तरी गोविंदाचा बाप धोडावा याणे अमिनापासी परवाणा हाजीर मजालसी दाखविला. यावरी आम्हीं हजीर मजालसीस पुसिले तुम्हीं परवाणा आणिला आहे तो दाइमुदाई दोघे दरबारी उभे राहोनु घेतला की देसगैवती घेतला. त्याने जाब दिधला कीं दोघे उभा रोहोनु परवाना घेतला. (अपूर्ण)

सा. ३ ले. ४५३ } (२४६१) { श. १५६०–१६००
{ इ. १६३८–१६७८

२० लुखजी व इलोजी देसमूख कर्यातो राजूर—हिरोजी देसमूख.

मानकोजी तुवदे व केसो त्रिमल यास महजर करून देणें. आम्हास बोलावा तेथवा येउनू.

सा. ३ ले. ४७२ } (२४६२) { श. १५६०–१६००
{ इ. १६३८–१६७८

हिरोजी दादजी देसमूख व कृष्णाजी जानो देशपांडिया मोकदम इ.—

हिरोजी कृष्ण व देवाजी पंतोजी ह्यामध्यें कसबे संगमनेरचे कुलकर्णाबद्दल झगडा आहे. निवाडा करणे म्हणोन रजा. वरहुकूम त्यांचे राजिनामे घेतले. त्यावरी तकरिरा घेतल्या. देवाजीच्या सनदेस मजमून की, कृष्णाजी नरसीह मिरासदार नव्हे तो दूरी करून पंताजी रुख्मागंद कोकील मिरासदार कुलकर्णी म्हणून महालास रेऊन ठाणाची चिठी घेतली. हिरोजीच्या सनदेस मजमून की, मिरासी कुलकर्णी नाहीं; ठाणाची चिठी नाही, मालुमातीचे खुर्दखत आहे. त्यावरी महालाची व थलीची सडी आणउनू तेणेप्रमाणें निवाडा करुनु. त्यावरी हिरोजी कबूल पण फडीहून गैरहाजीर होऊन गेला. बंदगी रोसन होये.

फा. सा. खं. २ ले. २ } (२४६३) { श. १५६०, वैशाख शुद्ध ९
शा. जु. 11 हि. १०२ (४) जिल्हेज ७ } { इ. १६३८ एप्रील १२

शाहजहान व औरंगजेब—भिकूजी मोहिते हंबीरराव.

दरबाराकडे पाठविलेली अर्जी पोहोंचली. ध्यानांत आलें कीं, राजा बहिरजी याचे आईनें हुजुरासमोर जें कबूल केलें त्याप्रमाणें ती मुल्हेर येथें गेल्यावर उपर्युक्त राजानें सुदैवानें तोच मर्तबा कबूल करून उच्च हुकुमास मान्य केलें. त्याची विनंति आहे कीं, किल्यांची तफ्वीज (ताब्यांत येणें) झाल्यावर परगणे सुलतानपूर, जो त्यास वतन म्हणून मिळाला होता त्याचें फर्मान त्याच्या नांवें मिळावें. तरी त्यास माहीत असावें कीं, आमचा हुकूम ईश्वरी हुकमाप्रमाणें आहे. त्यास ज्या अर्थी गुलामांच्या मालिकेंत बसण्याचा उत्कर्ष मिळाला आहे त्या अर्थी त्याची ही विनंति मान्य करतों. त्यानें खातरजमा ठेवावी कीं, इच्छा दर्शविल्याप्रमाणें दरबारच्या गुलामाकडे उपर्युक्त किल्ले सोपविण्यांत आल्यावर त्यावर कृपा केल्याचें वतन म्हणून सुलतानपूर परगणा त्याचे नांवें करण्याबद्दलचें फर्मान सुटेल.

फा. सा. खं. १ ले. ४३ } (२४६४) { श. १५६० वैशाख शुद्ध ९
हि. १०४७ जिल्हेज ७ } { इ. १६३८ एप्रील १२

मुहम्मद आदिलशाह—कानोजी जेधे.

हुकूम झाला होता कीं, त्यानें रोहिडा किल्ल्याजवळ जाऊन—यांना स्वतःच्या जागेवरून हालूं देऊं नये. तरी हा हुकूम पावतांच स्वतःच्या तमाम जमेतीसह किल्ल्याजवळ जाऊन त्यांस तेथून हालूं देऊं नये. या बाबतींत सक्त ताकीद जाणून एक घडीचा दिरंग न करणें. या कामासाठीं महालदार पाठविला आहे. जाणावें.

फा. सा. खं. २ ले. ३ } (२४६५) { श. १५६० भाद्रपद शुद्ध ९
शा. जु. ११ हि. १०४८ जवल ७ } { इ. १६३८ सप्टेंबर ६

शाहजहान व औरंगजेब—भिकूजी.

मुल्हेर किल्ला खालीं करण्याचे वगैरे बाबतींतील तुझी उत्तम चाकरी ध्यानांत येऊन पसंतीस आली. अशा प्रकारें ताकीद करावी कीं, मुहम्मद ताहीर बागलाणांत येई तों साल्हेरचा किल्लाहि खालीं होईल. ही चाकरी तुझ्या बाबतींत आणखी पसंतीला कारण होईल. या बाबतींत सक्त ताकीद जाणून विरुद्ध जाऊं नये.

सा. ३ ले. ६३३ } (२४६६) { श. १५६० मार्ग. शु. ७
सु. १०३९ साबान६ } { इ. १६३८ डिसें. २

सिवाजी राजे—कारकून व देशमुख देशकुलकर्णी तर्फ खेडेबारे.

चिटोजी रामजी चोरघा मोकदम मौजे राहाटवडे हा वडील भाऊ, धाकदा कान्होजी सिवजी. याने पोटाकारणे दिवाणचें कर्ज होन २५ काढून तें वारणेसाठीं आपला मोकदमीचा वाटा दिवाणात दिला. दादजीपंती इनामांत विहीर बांधली व तें इनाम वाहिलें. मग आपण परागंदा जालों. मग बापूजी मुद्गल यानी पंताकडून कौल देववून कान्होजीचें कर्ज वारविलें. मोकदमीचा भोगवटा सालाबाद चालला आहे. तरी खुर्दखत दिले असे. चिटोजीचें दुमाला मोकदमी करणे. तसरुफाती तुटलियाचा उजूर न करणे. मोकदमी इनाम सेत सारा दुमाला करणे.

फा. सा. खं. १ ले. ४४ } (२४६७) { श. १५६० मार्गशीर्ष वद्य १०
सु. १०३९, हि. १०४८ साबान २४ } { इ. १६६८ डिसेंबर २०

मुहम्मद आदिलशाह—शेख अली हवालदार व कारकून किले रोहिडा.

रणदुलाखान यांच्या हेजिबानें सांगितलें कीं, भोर तर्प्यांतील नाटंबी हा गांव कान्होजी जेधे, उपर्युक्त तर्प्याचा देसाई, याजकडे इसाबत म्हणून चालूं आहे. तरी त्यास फर्मान मिळावें. अर्जाचा विचार करून पूर्वीप्रमाणें तो गांव इसाबत म्हणून चालविण्याची आज्ञा केली आहे. तरी चालवावा.

सा. ५ ले. ७८१ ) (२४६८) { श. १५६० फाल्गु. व. १३
सु. १०३९ जिल्काद २६ } { इ. १६३९ मार्च २२

रणदुल्लाखान — देशमूख व देसक परगणे वाई.

हुजूर खबर आली आहे की गावगना रयेत गमबाई करून परविलायेतीस गेली आहे. यावरून अजब वाटले. आम्ही पैसजीची बाकी होती तेहि माफ केली व सालमजकुरी पटीहि गलियास निरख अर्जी देखोनु उसूल होये यैशीच करणे म्हणोन फर्माविले व जयास जैसा कौल पाहिजे तैसा देविला असौनु परविलायेतीस जाणे याचे काये माना आहे? तुम्हास इनाम गौ व जमीन याजबद्दल दिधली आहे की, किर्दीमामुरी करावी. गेली रयेतीचा दिलासा करून हा आमल तुम्हापासून पडला नाहीं. दुसरे काहीं जलल नसता रयेती काये सबब गेली. आम्हांस दखल न होतां फर्मान आणविले. हवालदार याची नामाकुली कळो आली. यांबद्दल शंकराजीचा हवाला दुरी करून मशहुरल भानजी रंगनाथ यासी हवाला फर्माविला आहे तरी तुम्ही त्याचे रजातलब दिवाण कामाबद्दल असोनु किर्दीमामुरीस तकसीर न करणे. भानजीपंताचा कौल तोच आमचा कौल असे.

सा. ३ ले. ६३२ } (२४६९) { श. १५६१ श्रावण व. ५
शक } महजर { इ. १६३९ आगष्ट ८

मौजे बोरी कुलं खराब पडिली होती. यावरी खेलोजी राजे विलाइतीची मोकदमी घेत होते. यावरी देशमूख व कुलकर्ण व विरोजी मोकदम मौजे लासुरणे व बोरीचे मोकदम बापभाऊ म्हणोन बोलिले. त्याजवरी खेलोजी घोडी मागताती ती देऊन मोकदमी सोडवणे. नंतर मिरासी मोकदम उभा राहिला. विरोजीनें लावणी केली होती. यावरी मिर्जा यासी मोकासा जाला. त्याणी धावणी करून बोरीचा चिंधीचोळा केला; हरदोजणामध्यें कवाबत जाली. दिवाणचे लोक जखमी जाले. विरोजी गाव खराब करून बाहेर पडला. यावरी मिर्जासी १ घोडा व १० होन देऊन कौल देविला. याजबद्दल गोतानिवाडा कीं, मिरासी मोकदम तोडू नये, मोकदमी राखिली तोहि तोडू नये. हरदोजणासी काली व पाढरी दो ठाई खाऊंन सुखे लेकराचे लेकरी असणे. निमे गाव येलोजी व जवाजी वागमोडे याचा व निमे मउ विरोजी. दिवाणांतील तश्रीफ दो ठाई, नागर आधी येलदोजी व मग जवोजी.

फा. सा. खं. = ले. ४ } (२४७०) { श. १५६१ कार्तिक शुद्ध १०
हि. १०४९ शा. जु. १३ रजब ९ } { इ. १६३९ आक्टोबर २६

शहाजहान व औरंगजेब — भिकूजी.

आम्हीं हुकूम फर्माविला आहे कीं, तूं बागलाणमध्यें सरकारचाकरींत दृढ असावें. तरी आतां हा हुकूम पोहोंचतांच तूं स्वतःच्या जमेतीसह औरंगनगरास

जोऊन मुहंम्मद ताहीर याच्या विचारानें जें काम निघेल तें निकालांत काढण्याविषयीं प्रयत्न करावा. आणि योग्य चाकरीच्या परिणामाविषयीं उमेद बाळगावी.

सा. ३ ले. ५१४ (२४७१) श. १५६१ मार्ग. व. ३०
सुं. १०४० साबान २८ इ. १६३९ डिसें. १४

मलिक सैद—

कारकून व देसमुख कसबे कलियाण व तर्फ अंबरनाथ मामले मुरजन.

रा. मोरेस्वर गोसावी मुकाम मोरेस्वर यासी इनाम बदल धर्मादाऊ लंगर आदाराटी गरीबगुरिबा दरसवाद कसबे मजकूर लारी १ दिला आहे. गोसावी कासीस गेले होते अजी सबब खुर्दखत घेतले नाहीं. भोगवटा तुटला. हाली खुर्दखत दिलें आहे. तरी जागा बंदर मजकूर पैकीं आदा कीजे. स्याहाजी, मंबाजी राजे यांचेप्रमाणें चालवीजे.

सा. ४ ले. ७०९ (२४७२) श. १५६१ माघ शुद्ध ८
फ. १०४९ सवाल ७ खुर्दखत इ. १६४० जानेवारी २९

देशमुखानि व धर्मातकर्णीयानी व महाजनानी व समस्त ब्राह्मण रुगविदी व अजुरविदी माहाक्षेत्र त्रिंबक सुभे दक्षण.

जो कोन्ही ब्राह्मण आपणामधे भांडोन ब्राह्मणास आजार देईल तो पातशाही गुन्हेगार होईल. जे कुल क्षेत्रास येईल जे ज्यास आनकूल असेल ते त्याणे नेणें.

फा. सा. खं. २ ले. ५ (२४७३) श. १५६२ आषाढ
हि. १०५०; शा. जु. १२ रवल इ. १६४० जून-जुलै

शाहजहान व औरंगजेब— भिकूजी मोहिते.

— चाकर मुहम्मद ताहीर याच्या अर्दासीवरून तुझ्या उत्तम चाकरीची व तरतुदीची हकीकत ध्यानांत आली. तूं दिवसादिवस जास्त चाकरी करून दाखविण्याचा प्रयत्न करावा म्हणजे उत्तम परिणाम होऊन डोकें वर निघेल.

फा. सा. खं. १ ले. ४५ (२४७४) श. १५६२ आषाढ शुद्ध १४
सु. १०४० हि. १०५० रवल १२ इ. १६४० जून २२

मुहम्मद आदिलशा —

मीर मुहम्मदखान हवालदार आणि मोकाशाचे व इतर कारकून किल्ले रोहिडा.

भोर तर्फेपैकीं वेन्हवडी गांवांतील माणकोची सहा टाके जिगअत जमीन कांहीं हकांसह कान्होजी नायकजी जेधे देसाई तर्फे भोर यास इनाम दिली आहे. तरी ती देसाई मजकुराच्या ताब्यांत देणें व वंशपरंपरा चालविणें.

फा. सा. खं. २ ले. ६ } (२४७५) { श. १५६२ मार्गशीर्ष शुद्ध १२
हि. १०५१, शा. शु. १४ शाबान ११ } { इ. १६४० नोव्हेंबर १५

शाहजहान व औरंगजेब—भिकूजी [ मोहिते ].

दरबाराकडे पाठविलेली अर्दास नजरेखालून गेली व मजकूर ध्यानांत आला. हुकूम होतो कीं, तूं सरकार–कामाचे बाबतींत बागलाण सुभ्याच्या फौजदारीवर असलेल्या सय्यिद अब्दुल वहहाब याच्या आज्ञेनुसार सरकार चाकरी करावी व उपयुक्त सय्यिदाचें सहकार्य करून बंडखोरांस तंबी देण्याचा खूप प्रयत्न करावा. त्याची कृतज्ञता किंवा त्याची तक्रार परिणामकारी जाणावी. त्यानें तुझ्या सहकार्याबद्दल राजी व कृतज्ञ असावें. या बाबतींत खूप ताकीद जाणून फर्मानिल्याच्या विरुद्ध जाऊं नये.

सा. ३ ले. ६६० } (२४७६) { श. १५६२ फाल्गुन
सु. १०४१ } { इ. १६४१ फेब्रु.

महाल उलिया मरदेनी — कारकून देशमुख परगणे इंदापूर.

काजी अबन बिन काजी हाफीज सेकीन कसबे मजकूर यासी बद्दल खिजमत मसजीद कसबे मजकूर चावर २ दर सवाद आहे. हाली कसबे मजकूर साहेबासी अर्जानी जाला आहे. तरी सालगुदस्ता रुजू पाहोन दुबाला कीजे.

एपि. कर्ना. १०, कोलार ८६ } (२४७७) { श. १५६३
} { इ. १६४१

( पेमसेट्टिहल्ली ( Pemmasettiballi ) गांवांतलि गावकुसुंजवळील शिलालेख. )

इ. स. १६४१ सालीं श्रीरंग राय यांनीं नलान चक्रवर्ती व्यंकटाचार्य ( Nalān-Chakravarti ) यास पेमी सेट्टिहल्ली गाव बक्षिस दिला.

फा. सा. खं. १ ले. ७ सु. १०४१ } (२४७८) { श. १५६३ चैत्र शुद्ध ७
हि. १०५० जिल्हेज् ५ } { इ. १६४१ मार्च ८

मुहम्मुद आदिलशाह— देसाई परगणे कऱ्हाड.

या परगण्यांतील तांबवे कर्यातीपैकीं वेन्हे गांवचा कुळकर्णी नारो विश्वनाथ यानें बादशहास विनंति केली कीं “ वरील गांवचें कुलकर्ण पिढी दर पिढी मजकडे आहे. पूर्वी हा गाव सय्यद हुसेन ( =? ) मोकाशी याजकडे असतां त्यानें गांवावर जुलूम केल्यामुळें गांवचे पुढारी व रयतें गाव सोडून गेले. त्यांबरोबर माझा चुलता कल्लू हाहि गेला व त्यानें त्यांची समजूत काढून त्यांस पुष्कळ काळानें परत गावावर आणलें. त्या वेळीं कुळकर्ण्यांचें काम करण्यासाठीं आमच्यापैकीं

कोणी तेथें नसल्यानें गावकऱ्यांनीं तेथील जोशाकडून काम करून घेतलें. पण पुढें मी गावीं जाऊन माझें काम परत मागितलें असतां गावकऱ्यांनीं मला तें देऊन तशा प्रकारचा महजरहि करून दिला. आतां आपलें फर्मान पाहिजे आहे." तरी नारो विश्वनाथ यास त्याच्या इच्छेप्रमाणें फर्मान दिलें आहे.

फा. सा. खं. १ ले. ८ सु. १०४१, हि. १०५० जिल्हेज ६ } (२४७९) { श. १५६३ चैत्र शुद्ध ८ इ. १६४१ मार्च ९

मुहम्मद आदिलशाह—अधिकारी व देसाई परगणे वाई.

नारो विश्वनाथ, कुळकर्णी मौजे टाकळें, यानें विनविलें कीं, "टाकळें येथील कुळकर्ण पूर्वीपासून माझें आहे. पूर्वी एक विधवा आपल्या मुलाला घेऊन आमच्या पूर्वजांपाशीं आली. पूर्वजांनीं त्या मुलाचें पालनपोषण, मुंज, लग्न, वगैरे करून देऊन कुळकर्ण करण्यास सांगितलें. कांहीं दिवसांनीं माझे पूर्वज मेले. नंतर कित्येक दिवसांनीं तो मुलगाहि मेला, तेव्हां त्याचा मुलगा कुळकर्णाचें काम पाहूं लागला. मी माझ्या गावास येऊन त्यास दूर करून दुसऱ्यास नेमूं लागलों. तों तो मजपाशीं भांडूं लागला व दुसऱ्यास काम करूं देईना. नंतर गंगाजी देसाई [ व स्वतःचे वारस ? ] यांस ही गोष्ट समजून त्यांनीं त्यास दूर करून कुळकर्णाची मिरास माझे आधीन केली व महजर करून दिला. महजराप्रमाणें महाराजांचें फर्मान मिळावें." ही विनंति ध्यानांत घेऊन टाकळें येथील कुलकर्ण नारो विश्वनाथ यास देण्याचें ठरविलें आहे. तरी उपर्युक्त कुळकर्ण नारो विश्वनाथाच्या ताब्यांत द्यावें, कोणासहि हरकत करूं देऊं नये.

फा. सा. खं. २ ले. ७ शा. जु. १४ रवल अखेर } (२४८०) { श. १५६३ आषाढ शुद्ध १ इ. १६३९ जून २९

शाहजहान व त्याचा मुलगा औरंगजेब—भिकुजी मोहिते हंबीरराव.

तुझ्या दौलतखोहीची हकीकत विश्वासू चाकर अशा मुहम्मद ताहीर याच्या अर्दासीवरून ध्यानांत आली व कार्यज्ञातृत्व समजलें. तूं या वर्षाकाळांत उदाजीराम याजबरोबर हातगह ( हातगड ) किल्ल्याच्या जवळ छावणी करून मठमर्दांचा नाश व रयतेचा उपयोग या बाबतींत कमालीचा प्रयत्न करावास. असा प्रयत्न करावा कीं, मुठमर्द नेस्तनाबूद होऊन रयत व वतनदार मोकळेपणानें शेती व कामें करूं लागतील. चाकरीप्रमाणें परिणाम होण्याची उमेद बाळगावी.

फा. सा. खं. १ ले. ९ सु. १०४१ हि. १०५१ जवल ११ } (२४८१) { श. १५६३ श्रावण शुद्ध १४ इ. १६४१ आगष्ट ९

मुहम्मद आदिलशाह—देसाई परगणे कऱ्हाड.

नारो विश्वनाथ, कुळकर्णी व जोशी मौजे किरोली, यानें विनंति केली कीं, " किरोलीचें कुळकर्ण व जोशकी वाडवडिलांपासून माझी आहे, सध्यां मजकडे चालत आहे व इनाम, हकलवाजिमे वगैरे खात आलों आहे. आतां आपलें फर्मान मिळावें. " तरी नारो विश्वनाथाच्या विनंतीप्रमाणें सालाबाद जसें चाललें आहे त्याप्रमाणें त्याचे जोशकी व कुलकर्णकी हे हक्क वंशपरंपरा त्याजकडे चालूं ठेवावे.

फा. सा. खं. १ ले. १० सु. १०४१ } (२४८२) { श. १५६३ श्रावण शुद्ध १४
हि. १०५१ जवल ११ } { इ. १६४१ आगष्ट ९

मुहम्मद आदिल शाह—देसाई परगणे कऱ्हाड.

नारो विश्वनाथ यानें विनंति केली कीं, " वेल्हे येथील कुळकर्ण वाडवडिलांपासून माझी मिरास आहे. माझे वाडवडील सदरहू गांवच्या पाटलांवर नाराज होऊन गांव सोडून गेले. तेव्हां पाटील गांवच्या जोशाकडून कुळकर्णाचें काम करून घेऊं लागले. कांहीं वर्षांनीं मी गांवीं आलों. तेव्हां गावकऱ्यांनीं सांगितलें, ' कुळकर्ण तुझेंच आहे, तर तूं तें कर. ' असें सांगून महजरहि करून दिला. आपलें फर्मान पाहिजे आहे. " तरी वेल्हें येथील कुळकर्ण नारो विश्वनाथ यास दिलें आहे. कुळकर्ण त्याचे ताब्यांत देऊन त्याजकडे वंशपरंपरा चालविणें व सदरहू जोशास हरकत करूं देऊं नये.

एपि. कर्ना. १० कोलार २२५ } (२४८३) { श. १५६३ आश्वि. व. ३०
शक } संवत्सर { इ. १६४१ आक्टोबर२४

शके १५६२ आश्विन वद्य आमावास्या या दिवशीं श्रीरंगराज यांनी रघुनाथ सोमयाजी याचा पुत्र व्यंकटगिरी शास्त्री यास सूर्यग्रहणाचे वेळीं दान-धर्म-शासनासह जनपल्ली गाव बक्षिस दिला. ( जनपल्ली येथील गोपालस्वामीच्या मंदिराच्या दक्षिणेकडील शिलालेख. )

फा. सा. खं. २ ले. ८ } (२४८४) { श. १५६३ पौष शुद्ध ३
हि. १०५१, शा. ज. १५ शव्वाल १ } { इ. १६४१ डिसेंबर २४

शाहजहान व औरंगजेब—भिकुजी.

मुहम्मद ताहीरच्या अर्जावरून तुझी चाकरी व तरतूद याविषयींची माहिती कळली. मुठमर्दांना तंबी देण्यांत याप्रमाणेंच मशारनिल्हेच्या सल्ल्यानें वागावें. बातमी आली कीं, जंग्या भिल्ल अजून स्वस्थ झाला नसून जंगलांत हिंडत आहे. तरी तूं त्याला तंबी देण्याचा प्रयत्न करून जासूद नेमावे व छापा घालून त्यास दस्तगीर करावें. त्यास नेस्तनाबूद करण्याचा प्रयत्न करून नामशेष होईल असें करावें म्हणजे उत्कर्ष होण्यांत परिणाम होईल. या बाबतींत ताकीद जाणून विरुद्ध वागूं नये.

फा.सा. खं.१ ले. ११ सु. १०४२ | (२४८५) | श.१५६४ वैशाख शुद्ध ६
हि. १०५२ सफर ५ | | इ. १६४२ एप्रील २५

मुहम्मद आदिलशाह—अमलदार व देसाई परगणे वाई.

नारो विश्वनाथ वनपाळ यानें विनंति केली कीं, मौजे टाकळें व मौजे बोरगांव संमत कोरेगांव येथील कुळकर्ण व जोशकी वाडवडिलांपासून माझी मिरास आहे. माझ्या वाडवडिलांनीं मालो बल्लाळ व विठ्ठल हरी यांस ती चालविण्यासाठीं मुतालीक म्हणून ठेविलें होतें, पण त्यांनींच माझ्या मिरासींत हरकत मांडली. हाकीम शरा, अमलदार व इतर गावकरी यांनीं जमून न्याय करून. दोन्ही वतनें माझींच आहेत असें ठरविलें. त्याच वेळीं उपर्युक्त दोघांनीं सर्वांसमक्ष सांगितलें कीं, ' आमचा दोन्ही वतनांशीं कांहीं संबंध नाहीं. आम्हांस मुतालीक म्हणून ठेविलें होतें. ' तेव्हां त्यांना दूर करून दोन्ही वतनें माझ्या स्वाधीन केली. तीं मी रणदुल्लाखानाच्या खुर्दखतप्रमाणें भोगत आहे. आपलें फर्मान मिळावें. " तरी तीं वतनें त्यास द्यावीं असें फर्माविलें आहे. वरील दोन्हीं वतनें त्यांवरील हक्कांसह त्याचे ताब्यांत देऊन वंशपरंपरेनें त्याजकडे चालू ठेवावीं.

सां. ३ ले. ६३६ | (२४८६) | श. १५६४ ज्येष्ठ व. १४
शक व सु. १०४३ | | इ. १६४२ जून १६

सूर्याजी माहाद पाटील जरडे निमे व समस्त जरडे मौजे मजकूर —सूर्याजी बिन दादू पाटील बडवें मो कोढीत कर्यात सासवड.

तुम्ही आपण मिळोन पेशजी येकवटे गाऊ करून होतो. पुढें न पडेसे जाले म्हणून तर्फा दोन केल्या. तरी संचणी उगवणी न व्हेच. जमीन काळी, बरड, माळ वांटिता न ये. मग आपण गाव टाकून गेलों. तुम्हास साहेबाचा व देशमुखाचा कौल पाठविला तो तुम्ही नाझरे [ पा। सुपे ] स होते तेथें आलों. मग दोघे समजून एकवट होऊन गंगाजळ होऊन असावे. पेशजी तर्फाचे कागद जितुके असतील तितके रद्द असेती.

फा. सा. खं. १ ले. १२ सु. १०४२ | (२४८७) | श. १५६४ श्रावण वद्य ४
हि. १०५२ जवल १७ | | इ. १६४२ आगस्ट ४

मुहम्मद आदिलशहा—अमलदार व देसाई परगणे वाई.

नारो विश्वनाथ कुळकर्णी व जोशी मौजे टाकळे व बोरगाव यानें विनंति केली कीं, "बोरगांव व टाकळें या गांवीं अनुक्रमें ½ व चावर १ जमीन, प्रत पहिली रणदुल्लाखानाच्या खुर्दखतप्रमाणें मला इनाम चालूं आहे. आपलें फर्मान मिळावें. " तरी रणदुल्लाखानाच्या खुर्दखतप्रमाणें त्याजकडे चालू असलेली सदरहू जमीन तींवरील हकलवाजिमे व पट्ट्या यांसह त्याच्या ताब्यांत देऊन वंशपरंपरेनें त्याकडे चालू ठेवावी.

ओढेना. मग परांगदा होऊ देऊं नये वडीलभाऊ म्हणून जवळ ठेविला. पूर्वीपासून कस्त मेहनत माझी हें तुम्हास माहीत आहे. आतां तुमचे समस्ताचें म्हणणें कीं, त्यानें मुलखावर जावें कीं काय ? त्यास वागोजीनें कुल मोकदमीस व मानपानास संबंध नाहीं ऐसे येजीतखत लिहून द्यावें. मग वागोजीस इनामापैकीं हिस्सा मात्र देईन.

| | | |
|---|---|---|
| सा. ३ ले. ५१७<br>सु. १०४५ | (२४९१) | श. १५६६<br>इ. १६४४–४५ |

रा. दादाजी कोंडदेऊ सुभेदार नामजाद किले कोढाणा व महालानिहाये —बापूजी मुद्गल हवालदार व कारकून परगणे पुणें.

श्री मोरेश्वर गोसावि सेकीन वस्ती मोरगौ येहीं मालूम केले जे महाराजे आपणास मौजे मजकुरी इनाम दिल्हा आहे त्याचे खुर्दखत मजकूर जे, वज बदल धर्मादाऊ इनाम जमीन ॥ गजशरायेनी देखील नख्त खर्चपटी इ. तरी मौजे मजकुरीचे हुदेदार व मोकदम पटिया मागताती. तरी पटियाची तकसीम सालाबाद नेधणे म्हणोनु कागद देविला पाहिजे. तरी कडकासेवरी पटी करून गांवाची उगवणी करीत जाणे. सदरहु व नव्या पटिया यांसि माफ केल्या असेती. हे आपला इनाम घरवाहो अगर प्रजेसी लावितील तरी याचा उजूर न +करणें.

[+ याच मजकुराचीं व तारखेचीं रुस्तुमजमानें पत्रें लिहिलीं आहेत. त्यांत मुर्तजाबाद, मुरंजन, इसलामाबाद ह्या परगण्याच्या अधिकाऱ्यास चेऊल, ठाणे, कोरकोडा मुरबाड व देऊचे ह्या गावांपैकीं लारी २ व एक देण्याबद्दल लिहिलें आहे. ]

| | | |
|---|---|---|
| सा. ३ ले.५१८<br>सु. १०४५ | (२४९२) | श. १५६६<br>इ. १६४४–४५ |

मलजी साबाजी राजेवाटिगे–हुदेदार व मोकदम मौ नायेगांव पा पुणें. (ले. २४९२ प्रो.)

| | | |
|---|---|---|
| सा. ३ ले. ५१९<br>सु० १०४५ | (२४९४) | श. १५६६<br>इ. १६४४–४५ |

धारोजी राजे व शंकराजी राजे मोहिते —हुदेदार व मोकदम मौजे मायेवाडी तर्फ करेपठार परगणे पुणें.

मौजे मजकुरी नीम चावर अवल कीर्द दरबज बदल इनाम जमीन त्याजवरील ( १८ ] पटचांसद दिल्ही ती चालवणें.

सा. ४ ले. ७४३ }
सु. १०४५ }
( २४९५ )
खुर्दखत
{ श. १५६६–६७
{ इ. १६४४–४५

मजकूर खान अलीशान—कारकून परगणे वाई.

नाईकवाडी मजकूर वेश रसद व नाजूक कामास आपलिया जथाचा प्यादा जाईल त्यास सदरहूं टके तीनशें यावें. फाजील मसाला जालिया ठाणाहून खर्च घालून यावें. कमी जालिया सदरहूं बेरीज नख्त दुमाला करणें. ठाणा च्यावयासी निसबती नाहीं म्हणौनू गहदम चालत आहे तेणेंप्रमाणें व हजरतीं बडे खान-साहेबाचे खुर्दखत सादर आहे तेणेंप्रमाणें चालविणें.

एपि. कर्ना. १०, कोलार १६३ }
शक }
( २४९६ )
{ श. १५६६ चैत्र शु.१ ?
{ इ. १६४४ मार्च २९

चैत्रशुद्ध प्रतिपदा शुक्रवार १५६६ *चित्रभानु संवत्सरे या दिवशीं श्रीरंगदेव यांच्या कारकीर्दीत ओबी-राज ( Obi-Raja ) रामन् राजम्या देव यानें सूर्य-ग्रहणाचेवेळीं भास्कर सिद्धेश्वर भट यास होंगरी-चितनीपली हें गांव दान दिलें. सदरहू गांव कोलाल तालुक्यांतील असून तिरुपलीच्या जवळ आहे व तो श्रीरंग-देवांनीं ओबी राजास ( Amapanmbala ) म्हणून बक्षिस दिला होता. ( माधवगडचेनिहाळी येथील दक्षिणेकडील टेकडीवरील शिलालेख. )

फा. सा. खं. १, ले. १४ सु. १०४४ }
हि. १०५४ रखर १५ }
( २४९७ )
{ श. १५६६ ज्येष्ठ वद्य १
{ इ. १६४४ जून ११

मुहम्मद आदिल शाह–निअमतखान हवालदार व कारकून मामले विजापूर.

विजापूर येथील कोटाच्या ( =अराबह ? ) आंत असलेली बनाजी हरेश्वर याच्या मालकीचें *तिच्यावरील एक जागा इमारतीसह* अफ्जलखान मुहम्मदशाही याचा दूत ( हाजिब ) नारो पंडित यास इनाम दिली आहे. तरी ती त्याच्या ताब्यांत यावी.

फा. सा. खं. १ ले. ४८ }
सु. १०४४, हि. १०५४ जखर ७ }
२४९८
{ श. १५६६ श्रावण शुद्ध ८
{ इ. १६४४ आगस्ट १

मुहम्मद आदिलशाह—कान्होजी जेधे ?

ज्या अर्थी शहाजी भोंसले दरबारांतून निर्वासित व अपमानित झाला आहे व त्याचा मुतालिक दादाजी कोंडदेव कोंडाण्याच्या बाजूस आहे ( त्या अर्थी त्यास ) दफे करण्यासाठीं व ती विलायत ताब्यांत आणण्यासाठीं खंडोजी व बाजी घोरपडे

*श. १५६४ ला चित्रभानु आहे.

यांस तुमच्यासह नेमिलें आहे. तरी तुम्ही आपल्या हशमासह मशारनिल्हे जवळ जाऊन त्यांच्या संमतीनें दादाजी कोंडदेव व त्या हरामखोराचे संबंधीं यांना शिक्षा देऊन नेस्तनाबूद करा व ती विलायत ताब्यांत आणा. तें तुमच्या उत्कर्षाचें कारण आहे.

फा. सा. खं. १ ले. ३१ } ( २४९९ ) {श. १५६६ भाद्रपद शुद्ध १५
सु. १०४४, हि. १०५४ रजब १४} {इ. १६४४ सप्टेंबर ६

मुहम्मद आदिलशाह—

माल पाटील व इतर अधिकारी तपे वीरवाडी किल्ले राहेर ( रायगड ).

सध्यां स्वतःची निष्ठा, शेख इब्राहीम व सय्यिद कबीर लश्करी यांचा बद-अमल व मारिले जाणें, किले मजकूरचा माजी हवालदार शेख अली याची तारीफ आणि सध्यांचा हवालदार रहीमखान याची वाईट वागणूक यांविषयींचा तुझा अर्ज चंद्रावाचा हेजीब जाखो रुद्रो याचे मार्फत आला व मजकूर अवगत झाला. त्याप्रमाणें किले मजकूरची हवालदारी शेख अलीकडे दिली आहे. तो रवाना होऊन येत आहे. तूं जास्त एकनिष्ठा दाखविणें व हवालदाराच्या आज्ञेंत राहणें.

सा. ३ ले. ५१५ } ( २५०० ) {श. १५६६ कार्तिक शु. १२
सु. १०४५ रमजान ११} {इ. १६४४ नोव्हेंबर २

खंडोजी राजे घोरपडे—हुद्देदार व कारकून व मोकदम मौजे लोणी ( सुपे ).

मोरेश्वर गोसावी क्षेत्र मोरगांव यासी एक चावर गजशराइनी देखील नख्त माहासूल इत्यादि दिले. दुबाला कीजे.

पे. द. ३१ ले. १७ } ( २५०१ ) {श. १५६६ पौष शु. ७
सु.१०४५ जिलकाद ५} महजरनामा {इ. १६४४ डिसें. २५

दावल बिन शावदी औरंगाबादेस येऊन फिर्याद होत होता की कारकीर्दी मालिकअंबर परगणे पारनेरचे ठाणे अलाहिदा जाले तेपासून आपला बाप व बिरादर व आपण नाइकी सरबराह करीत होतों. दरम्यान रंभाजी नाइकवाडी कैफती करितो. गोणापासी येकदोनी वेळे सांगितले. मग आम्ही थांबऊन यासी महजर करून दिधला. दावल नाइकवाडी आहे. यासी कैफती करील तो गोताचा अन्याई व दिवाणाचा गुन्हेगार, हा महजर सही.

सा. ३ ले. ५१६ }
सु. १०४५ मोहरम १० } (२५०२) {श. १५६६ फा॥ व ४
{इ. १६४५ मार्च ६.

रुस्तुमजमा—कारकून देसमूख अधिकारी मूर्तजाबाद उर्फ चेऊल.

मोरेश्वर गोसावी सेकीन थानक मोरेश्वर ह्यास बरहुकूम खुर्दखत मलिक सैद दरोज लाहारी २ दरसवाद कसबे चेऊल महसूल, जरिबे, जकाती, व हरएक दस्तवाव प्रमाणें हुरमुजी लारी २ देणें.

सा ३ ले. ५२१ }
सु. १०४७ } (२५०३) {श. १५६७
{इ. १६४५-४६

दिवाण माहाल तपे पांच—

कारकून व अधिकारी तपे चोप कर्यात बदरापूर मामले मुरंजन.

मोरेश्वर गोसावी यांनी मालूम केल्यावरून त्यांस मलिक सैद ह्याच्या खुर्द-खतावरहुकूम तपे चोप येथील हरएक बाबे दस्तपैकी लारी १ हुरमुजी आदा करणे. सदरहूप्रमाणें तागाइत सालगुदस्ता चालत आले. अखेरसाली आपली पैवस्तगी जाली याकरता मोईन जागा करून दिधला नाही. हाली साल नवे जाले आहे. तरी हुरमुजी लारी १ वजा जकाती लारी नीम बाकी तपे मजकूर नख्त महसूल-पैकी नीम लारी देविली असे. दर लारीस ११२ एकूण २५०॥ यासी जागा मौजे साइ लारी ५० चोण १०० मौजे कान्हेर देखील पाडा लारी ५० मौजे सागावे लारी ५०॥ सदरहूप्रमाणें अवल सालापासून देविले असे आदा करीत जाइजे.

सा: ३ ले. ५५५ } (२५०४)
अर्जदास्त {श. १५६७
{इ. १६४५.

सेरीकर मायेवाडी तर्फ कन्हेपठार—

मोरेश्वर गोसावी याचा इनाम विलाकुसूर त्याजकडे चालवूं. तोशीस लागो नेदू.

फा. सा. खं. १ ले. ३२ }
सु. १०४६ } (२५०५) {श. १५६७-६८
{इ. १६४५-४६

—माल पाटील व अधिकारी तपे बीरवाडी किल्ले राहेर (रायगड).

मुस्तफाबादच्या हवालदाराच्या मुलाकडील या किल्ल्याची हवालदारी तगीर करून ती फत्तेहमुल्क याकडे दिली आहे. तुम्ही मात्र वसूल करण्याच्या बाबतीत कांहीं केलें नाहीं हें धाष्टर्य आहे. तरी वरील हवालदाराच्या हुकमांत राहावें. जर अडथळा होईल तर योग्य शिक्षा होईल हें ध्यानांत ठेवावें.

फा. सा. १ ले. १५ सु. १०४५ } हि. १०५५ रखर १५ }  (२५०६)  { श. १५६७ ज्येष्ठ वद्य १ { इ. १६४५ मे ३१

मुहम्मद आदिलशाह—

निअमतखान हवालदार व कारकून मामले पुरनूर मुहम्मदपूर.

कसबे नौरसपूर येथें शहराच्या कोटाजवळ (अराबह) असलेली मीर धनगर याच्या ताब्यांतील पाव चावर जमीन, बाग व पडिक (नाकिर्द) बिहीर यांसह, तीवरील हकांसुद्धां नारो विश्वनाथ पंडित यास इनाम दिली आहे. तरी ती त्यांच्या ताब्यांत देऊन वंशपरंपरेनें त्याजकडे चालवावी.

फा. सा. खं. १ ले. ६९ } सु. १०४५, हि. १०५५ रखर १६ }  (२५०७)  { श. १५६७ ज्येष्ठ वद्य २ { इ. १६४५ जून १

मुहम्मद आदिलशाह—

कृष्णाजी अप्पाजी (आवाजी) पंडित हवालदार व लतीफखान ठाणेदार किल्ले वंदन.

नारायणभट बिन विष्णुभट राहणार ———— यानें विनंति केली कीं, मजकडे पांचवड गांवांत खालसापैकीं पाव चावर जमीन मोकाशाच्या खुर्दखतांप्रमाणें चालूं आहे. आतां फर्मान मिळावें. तरी त्यास ती जमीन वंशपरंपरा इनाम म्हणून दिली आहे. चालवावी.

सा. ३ ले. ५२० } सु. १०४६ रखर ७ }  (२५०८)  { श. १५६७ आषाढ शु. { इ. १६४५ जून २२

दिवाण मामले इस्लमाबाद—हुद्देदार कर्याती मुरवाड देउपे.

मोरेश्वर गोसावी सेकीन स्थान मोरेश्वर यास मलिक सैद याजकडून खुर्दखताप्रमाणें भिऊडी, कोरकडा, मुरवाड येथील लारी प्रत्येकी १ येणेंप्रमाणें दिल्हे आहे. सवेंच ते कासीस गेले. त्याकरिता भोगवटा व तसरूफाती नाहीं. तरी त्याचा उजूर न कीजे. आदा करीत जाणे.

फा. सा. खं. १ ले १६ } हि. १०५५ जवल २१ }  (२५०९  { श. १५६७ आषाढ वद्य ८ { इ. १६४५ जुलै ६

मुहम्मद आदिलशाह—अंबरखान.

काफीर लोकांनीं सध्यां बाळापूरला हैराण केलें आहे असें समजतें. तरी हा हुकूम पोहोंचतांच बाळापुरास जाऊन शत्रूला दफे करण्याची खटपट करावी व

तेथील पीशजंगखान याच्या लोकांचा तुम्ही उपराळा करावा. ईश्वर न करो, कांहीं कमजास्त घडलें तर त्या किल्ल्याची जबाबदारी तुमच्यावर ( क ) आहे.

फा. सा. खं. १ ले. १७ } (२५१०) {श. १५६७ आषाढ वद्य ८
हि. १०५५ जवल २१ } {इ. १६४५ जुलै ६

मुहम्मद आदिलशाह—झुंजारराव घाटगे.
[ मजकूर मागील (२५०९) लेखाप्रमाणें. ]

एपि. कर्ना. १० मलबागल ता. ६० } (२५११) {श. १५६७
{इ. १६४५

इ……वंशोत्पत्ती व त्याची सविस्तर हकिगत (कीं,) इ. स. १६४५ या वर्षी श्रीरंगराय देव यानी विठ्ठलभारती स्वामी, यांचे शिष्य रामचंद्र भारती-स्वामी यांच्या मठाकरितां चिनानिकल्लु ( Chinânikallu ) गांव दिला. व त्या गावाचे नांव नरसिंहपूर असें ठेविलें. सदरील गाव कोलाल देशांपैकीं होता.

रंगरायांचें हें शासन सभापतीचा नातू, कामकोटीचा पुत्र, रामकवी यानें रचिलें. व राजाच्या आज्ञेवरून सोमनाथराय याने हे लिहिलें.

अवनी ( Avani ) येथील अवनी-मठामधील ताम्रपटावरील लेख.

सा. २ ले. ५२४ } (२५१२) {श. १५६८
सु. १०४७ } {इ. १६४६-४७.

सिवाजी राजे—हुदेदार मौजे लोणी बाराउ करडियाची परगणे सुपे.
मोरेश्वर गोसावी यासी मौजे मजकुरी चावर एक हाली व पेस्तर पटियाः देखील दिली. असे असतां तेजीपटी घातली आहे. ते त्याचे दुमाले करणें.

सं. सा. खं. १ ले. १३४ } (२५१३) {१५६८ अ. श्रावण शु. ४:
सु. १०४७ जखर २ } कौलसामा {१६४६ जुलै ६

दिवाण———येसाजी मोकदम मौजे ताडावी परगणे मजकूर,
तुझे बाबे देशमुख परगणे मजकूर मालूम केले जे, नफर मजकुरास रा. पंत साहेबाचा कौल आहे तेणेप्रमाणे नवीन दिधल्यास नफर मजकूर गावांस येउनु गावकीर्दी मामुर करील. तरी वराये मालुमाती खातिरेसी आणौउनु तुज कौलुनामा सादर केला असे. सुखे मौजे मजकुरास येउनु कीर्दी मामुरी करणें.

सं. सा. सं. १ ले १३५ } (२५१४) { १५६८ अ. श्राव. शु. ११.
सु० १०४७ जखर ९ } कौलनामा { इ. १६४६ जुलै १३

रा. दादजी कोंडदेव सुभेदार नामजाद कोंढाणा व महाला निहाये—
येसाजी मोकदम मौजे नाहावी किले परगणे पुणे.

तुझे वाबे मालूम जाले जे, नफर मजकुरामध्यें व नफर मजकुराचा बाप भाऊ नामाजी त्यामध्ये सेताचा कुसर होता. तो गोताने निवाडा केला आहे त्याप्रमाणे नाऊ वर्तेना म्हणौउनु नफर मजकूर बाहेर गेला. तरी साहेबी कौल दिधल्यास गावावरी येउनु गांव कीर्दी करील, तरी कौल मन्हामती केला पाहिजे. तरी बराये मालुमाती खातीरेसी आणौउनु तुज कौलनामा सादर केला असे. तुवा बेशक होउनु गांवावरी येउनु गांव कीर्दी करणे. मग गोतात तु व नाइ जाउनु गोत सांगेल त्याप्रमाणे वर्तणे.

सा. २ ले. ६६१ } (२५१५) {श. १५६८ आश्विन व.१२
सु. १०४७ रमजान २५} {इ. १६४५ आक्टोबर २५

शिवाजी राजे—कारकून देशमूख परगणे इंदापूर.

काजी सैद सेकीन कसबे मजकूर यास अदल खिजमती मसीद मुकाम मौजे कारी परगणे मजकूर चावर १ तेल रोज पावशेर इनाम दर सवाद मौजे मजकूर सन खमस चालत आले आहे सालगुदस्ता सन सीतमधे साहेबासी मुकासा अर्जानी जाला तो वख्ती फुरसती जाली नाहीं. तरी चालिले असेल तेणेप्रमाणें चालविजे.

सा. ३ ले. ५२६ } (२५१६) {श. १५६८ फाल्गुन
सु. १०४७ सफर } {इ. १६४७ मार्च

रणदुलाखान—

कारकून, देशमूख व अदिकारी तपे पांच मामले मुरंजन उर्फ कलियान मोरेश्वर गोसावी स्थानक मोरेश्वर यास रुस्तुमेजमा खमस आर्बैनपासून दररोज लारी १ हुरमुजी तपे चोण हरएक दस्त जागा दिधले असे तेणेप्रमाणें दुमाला करणें.

सा. ३ ले. ५२३} (२५१७) {श. १५६८
सु. १०४७ } {इ. १६४६–४७

रा. शिवाजी राजे—हुदेदार लोणी बाराऊ कडियाची परगणे सुपे.

मोरेश्वर गोसावी मालूम केले जे, आपणास मौजे मजकूर चावर १ गजशरायनी भज येसु भोव्ळी आहे. भोगवटियाची पत्रे फिरतीमधें गेली म्हणोनु हुदेदार ताजिया खुर्दखताचा उजूर करितात. तरी गोसावी मजकूर यासी सदर इनाम देखील कुल पटिया हाली मोजून,नख्त बाव मलियावर चाटुनु लागले ढेपच्या हिसेत्रे जे बैसली, ते व गला कमाविसीने येत जाईल ते चावर दुमाला करणें.

सा. ३ ले. ५२२ } सु. १०४७ (२५१८) { श. १५६८ इ. १६४६–४७

सैदसाहेब—कारकून कर्यात केलियाण व तर्फ अंबरनाथ मामले मुरंजन.

मशाहुरल अनाम मोरेश्वर गोसावी हुजूर मालुम केले की, आपणास बरहुकम फर्मान व खुर्दखत वजिरानी दरोज लारी १ चालत होती. त्यावरी चंदरी जागा दिघला. तेथें वाटणीच्या इनामदारास व मलाहि कांहीं पावत नाहीं. आपण फकीर-फकीरांवदले लंगर घातला आहे तरी इनाम देविला पाहिजे. त्यासी हुजरून लारीची पाऊ लारी चौथी तकसीम करार करून देविली आहे. एक रुका गैर आदा होने दीजे.

सा. ३ ले. ५३४ } सु. १०४८ (२५१९) { श. १५६९ इ. १६४७-४८

शिवाजी राजे—कारकून व देशमुख परगणे पुणें.

मोरेश्वर गोसावी यासी गाई दाहावीस आहेती. ब्राह्मण अतीत अभ्यागतास पावते. गाईस चारावयास रान नाहीं, अतीत ब्राह्मणास पावणार नाहीं. महाराज गोब्राह्मणाचे प्रतिपालक आहेती. येसियास दरसवाद मौजे मजकूर आहे त्यात सेजारी मुनसीलपटी कास रुके ८३ नाकीर्दी पडिली. सालमजकुराकारणे प्रतापेस उखते लाविले सदरहू पटि इनाम दिलिया कल्याण चिंतून. तरी दिली असे.

सा. ३ ले. ५३३ } सु. १०४८ (२५२०) { श. १५६९ इ. १६४७-४८

शिवाजी राजे—कारकून व देशमूख परगणे पुणें.

मोरेश्वर गोसावी क्षेत्र मोरेश्वर यास माहाराजे मौजे मजकूर पैकी ८७ रुके जमीन दिघली. तेथील धाने ब्राह्मणमुखी घालून महाराजास कल्याण चिंतून राहू. झाडझाडोरा बाग करून उत्पन्न येईल ते सर्वोत्तमास अर्पून महाराजास आशीर्वाद देऊं. तरी खुर्दखत दिघले असे. एक जरा तसवीस लागो न देणें ( अपूर्ण ).

एपि. कर्ना. ९ दोडबालापूर २८ } शक शिलालेख (२५२१) { शक १५६९ इ. १६४७

इ. स. १६४७ सालीं संभाजी राय यांनीं सजीव मठांतील चन्न बसापा वडेर याना हचीपूर गांव दिलें : ( हंचरहली ( Hancharahalli ) या गांवांतील मठद्य्या यांच्या शेतांतील शिलालेख. )

पे. द. ३ ले. १८ } (२५२२) {श. १५६९
सु. १०४८ } खुर्दखत {इ. १६४७

रा. सिवाजी राजे—कारकुन व देशमुख-परगणे पुणें.

मुला अली बिन मुला अवदुला मौजे भांबवडें परगणे मजकूर आपणास विदित केले कीं, आपणास इनाम...येणेंप्रमाणें मलिकाबराचा फर्मान व खुर्दखत व खुद महाराज साहेब बरहुकूम सनद...तसरुफाती चालिलें आहे. हाली साल मजकुराकारणें मशहुरल दादाजी कोंडदेव सुभेदार यांस देवाज्ञा जाली म्हणौन महाली कारकून ताज्या खुर्दखताचा उजूर करिताती. यास्तव कृपाळू होऊन सदरहू इनाम दुमाले करावया आज्ञा जाहाली. याजकारितां इलतिमास खातेरेसी आणून मुला अली बिन मुला अवदुला मौजे भांबोडे यासी इनाम दरसवाद बितपर्सील जैसे असल तेणेप्रमाणें चालविणें.

सा. ३ लें. ६३४ } (२५२३) {श. १५६९ ?
{इ. १६४७

मौजे वागणी येथून राहाटेड येथे चोरचे आपल्या सोयऱ्याच्या गावीं आले माहादाजी भणगा मोकदमास पत्र आले. त्यानें भाऊबंदास सांगितले वेदरास जाऊन जावसाल करणें. गावानी उत्तर केले, जात नाहीं. मग जावई रामजी चोरया लेक म्हणून पाठविला. त्याचे नांवें सनद जाली. रामजी चव्हाणाचाहि हिसा अनुभवीत होता तो कान्होजीस चार दिवस दिला. पुढें दादाजीपंतीं रामजी जिवे मारला. व सरकारात वतन घेऊन विहीर बाग सपाई केली. मग रामजीचा पुत्र चिरोजी शिवाजीकडे आला. शिवाजीनें रामजीचा लेक विटोजी याचे हवाली (अपूर्ण).

सा. ३ ले. ५५६ } (२५२४) {श. १५६९–७१ ?
{इ. १६४७–४९

शिवाजी राजे—देशमुख पुणें.

मोरेश्वर गोसावी मोरगावीं बाग गिर्हीबर साम धरून झाडझाडोरा करतील. ते उपज दुमाले केला असे. ते दुमाला करीत जाणे.

फा. सा. खं. १ ले. १८ } (२५२५) {श. १५६९ चैत्र शुद्ध १२
हि. १०५७ रबल १० } {इ. १६४७ एप्रील ६

मुहम्मद आदिलशाह—असदखान.

आम्हांस असें समजतें कीं; आपले मुतालीक सप्पा सैन्याच्या कोठींत धान्य व इतर जिन्नस यांचा भरणा करणाऱ्या व्यापाऱ्यांना तऱ्हेतऱ्हेनें त्रास देऊन त्यांपासून पैसा उकळतात. आपल्या खजिन्यांतून त्यांस तनखा व रतीब चालू

आहे त्या अर्थी त्यांचें हें करणें योग्य नाहीं. तेव्हां आपणांस फर्मावितों कीं, आपल्या मुतालिकांना योग्य शिक्षा व तंबी पोहोंचविल्याशिवाय राहूं नये व कोठाराच्या व्यापाऱ्यांना कोणताहि उपद्रव न देतां त्यांनीं व्यापाऱ्यांपासून जें कांहीं घेतलें असेल तें सर्व आतांच परत करावें. जर कोणी पुन्हां असला प्रयत्न करील तर त्याचा भयंकर परिणाम होईल.

सा. ३ ले. ५२५ } (२५२६) { श. १५६९ चैत्र व. १
सु. १०४७ रवल १४ } { इ. १६४७ एप्रील १०

—कारकून व देसमुख मुर्तजाबाद.

मोरेश्वर गोसावीं यास इनाम बदल लंगर आटारोटी फकीरफुकिराना दरोज लारी हुरमुजीं २ दोनीं जागा महसूल व जकाती कसबे मजकूर पैकी रुस्तुमेजमरा पासून चालत आहे तेणेप्रमाणे दुमाले कीजे. भोगवटा तुटलीं असेली त्याचा उजूर न कीजे.

सा. ३ ले. ५२७ } (२५२७) { श. १५६९ वैशाख शु. ४
सु. १०४७ रखर २ } { इ. १६४७ एप्रील २८

सिवाजीराजे—हुदेदार व मोकदम मौजे लोणी परगणे सुपे.

मोरेश्वरचे मोरेश्वर गोसावी यास मौजे मजकूरचे चावर १ सुलतानी देसोल तमाम पटिया द्खिलीं असे. ते कारकीर्दी दर कारकीर्दी जैसे चालिले असेल तैसें चालवीजे.

एपि. कर्ना. व्हाल्यु. ५ नं. १६५ } (२५२८) { श. १५६९ वैशाख शु. ५
{ इ. १६४७ एप्रील २९.

म्हैसूरच्या राजा कंठीरव नरसराज वोडेराय हा राज्य करीत असतां बेलीं-कुलाचा गौडराय याचा पुत्र दोडाय यास चेनरायपट्टण दिलें....या दोडायनें विजापूरच्या पादशाहाकरितां दगडी किल्ला बांधविला. ( चेनरायपट्टण येथील गडेरामेश्वराच्या देवालयांतील नवरंग मंडपामधील शिलालेख. )

सा. ३ ले. ५२८ } (२५२९) { श. १५६९ ज्येष्ठ शु. १
सु. १०४८ रखर २९ } { इ. १६४७ मे २७

रणदुलाखान—कारकून देशमुख अधिकारी तपे पांच मामलें मुरंजन.

क्षेत्रमोरेश्वरचे मोरेश्वर गोसावीं यास तपे चौण मामलें मजकूरपैकीं एक लारीं जागा सरस नेमून देऊनु लंगरखैरातीचें काम चालीं लाविलें नाहीं. बरहुकूम खुर्दखत सनद सादीर असता, एकदोनीं ताकीद सादर असता, सरंजाम होत नाहीं काय माना आहे? आतां खुर्दखत देखताच लंग पडो ने दीजे. येक रुका गैर आदा राहो नेदीजे. पेस्तर फिर्याद येऊ नेदीजे. हें देणें खुदा जरूर रजा आहे.

सा. ३ ले. ५२९ }
सु. १०४८ }

(२५३०)

{ श. १५६९ आषाढ
{ इ. १६४७ जून-जुलै

—कारकून मामले इसलमाबाद.

हजरती नबाब किबलगाही बुसादत जाले. मोरेश्वर गोसावी यास लारी ३ बरहुकूम फर्मान खान रुस्तुमेजमा मामले मजकूर असे. कसबे भिऊडी व तर्फ मुरबाड व परगणे कोरकोडा येथील इनाम असे. हजरत होनूपैकी सीस्तप्रमाणे आदा कीजे.

मु. घो. इ. प. अ ले. १३ }
हि. १०५७ साबान १९ }

(२५३१)

{ श. १५६९ भाद्रपद व. ५
{ इ. १६४७ सप्टेंबर ९

[ मुहम्मद आदिलशाह ]—बाजीराव घोरपडे.

दरबारांतील कांहीं लोकांच्या भांडणामध्यें तुमचे वडील राजा प्रतापराव बहादर घोरपडे मारले गेले. या प्रसंगाच्या अनुरोधानें आमच्या स्पष्ट ध्यानांत आलें कीं, तुमचे वडील, आजोबा व इतर यांनीं बहमनी बादशहांच्या वेळेपासून आतांपर्यंत प्राणाचीहि पर्वा न करतां राज्याची चाकरी केली आहे. यामुळें बक्षिसावर त्यांचा हक्क आहे हें जाणून सात हजारी मन्सब, सात हजार स्वार, तत्संबंधीं सर्व मुलूख आणि पर्गणे वेन (वाई) व कर्नाटक यांतील अर्धी जागीर—जी त्यांच्या कुळांत चालूं आहे—त्यांस बहाल करतों. तसेंच त्यांस वजिरीहि देतों. अनागुंदी व कंपली यांतलि जी जागीर त्यांजकडे आहे ती त्यांनीं आपल्याकडे ठेवावी. तिच्याभोवतीं त्यांच्या भाऊबंदास व हिस्सेदारांस जागीर देणार नाहीं. म्हणजे भांडणास कारण राहणार नाहीं.

सा. ३ ले. ५३० }
सु. १०४८ जिल्काद ६ }

(२५३२)

{ श. १५६९ मार्ग. शु. ७
{ इ. १६४७ नोव्हें. २३

सिवाजीराजे—कारकून तर्फ कन्हेपठार परगणे पुणें.

मोरेश्वर गोसावी यास मोरगांवपैकी नीमे चावर देखील पटिया इनाम असतां सन खमसा कारणे हुदेदारी व मोकदमी इस्कील करून सेलबैल वगैर १० पटिया मागत होते. सदरहू हकिकती दादाजीपंत सुभेदार त्यासी गोशगुजार केली. त्यावरून पंडित मशारइलेनी सनद दिधली कीं, अज कासेस सदरहू इनाम बाद देऊनु वरकड कासेवरी पटी करून गांवाची उगवणी करीत जाणे. हली व पेस्तर पटिया माफ केल्या असेती. सदरहूप्रमाणे चालिले असोन साल मजकुराकारणे इस्कील करणे काय माना आहे ? एक जरियाची तसवीस न देणे.

सा. ३ ले. ५३१ } (२५३३) { श. १५६९ पौष शु. १
शु. १०४८ जिल्काद २९ } { इ. १६४७ डिसें. १६

सिवाजीराजे—मोकदम मौजे मोरगौ तर्फे कन्हेपठार परगणे पुणा.

मोरेश्वर गोसावी यासी इनाम सेत नजीक वाट वडगौ थल थोपटियाचे कास रुके १ देखील नख्त गला व कडबा दुमाले केले असे. खुर्दखताप्रमाणें दुमाला करणें. (ह्याच तारखेचीं व मजकुराचीं व शिवाजीनेंच दिलेलीं दोन पत्रें आहेत. त्यांत मायेवाडी व नायगाव येथील अर्धीअर्धी चावर जमीन दिली आहे.)

सा. ३ ले. ५३२ } (२५३४) { श. १५६९ पौष शु. १
शु. १०४८ जिल्काद २९ } { इ. १६४७ डिसें. १६

सिवाजी राजे—कारकून तर्फ कन्हेपठार परगणे पुणा.

मोरेश्वर गोसावी यासी इनाम मौजे मोरगौ थोपटियाचे पटीपैकी जमीन कास ०७ मायेवाडी नीमचावर गजशरायनी प्रज मल्हारजी जगथापे थल वागर्टे-भीपैकीं जमीन पोलीज एकूण कास रुके ६ व मायगौपैकी परीटघुणे रुके ।१६ पैकेमर्धाल पाची चावर निमे; एकून कास रुके ६. सदरहू इनाम सेतावरी पटीची तकसीम नायगौ ४॥ ८॥, मायेवाडी ५॥।, एकूण टके १०॥ ८॥ टके १० व आठ बत्तीस रुके दुमाले केले.

सा. ३ ले. ६२७ } (२५३५) { श. १५६९ पौष व. ७
शु. १०४८ जिल्हेज २० } { इ. १६४८ जाने. ६

सिवाजी राजे—खेडेबारे देशमुख व देशकुलकर्णी भिकाजी विन सूर्याजी डिमले मोकदम मौजे सिवरे व कल्याण सेकिन तर्फ मजकूर यासी इनाम जमीन चिवे १२ दरसवाद मौजे कल्याण व तरफ मजकुरी गावगना हक दरसवाद रुका १ गला केली बरोल मण ०१ सालाबाद तसरुफाती चालिले असेल तेणेप्रमाणें दुमाले करणें. दरमियान परागदा जाला म्हणोन तसरुफाती तुटलियाचा उजूर न करणें.

फा. सा. खं. १ ले. १९ } (२५३६) { श. १५६९ पौष वद्य १२
हि. १०५७ जिल्हेज २५ } { इ. १६४८ जानेवारी ११

मुहम्मद आदिलशाह—यशवंतराव.

आमच्या हुकुमाप्रमाणें नवाब खानबाबा यांनीं तुम्हांस लिहिलें कीं, "तुम्ही आपले प्यादे व स्वार यांसह जंगमा खिंडीपाशीं जाऊन महाराज फर्जंद शहाजी भोसले यांच्याशीं एकदिल व एकरूप होऊन दौलतीच्या सदिच्छेचें चिन्ह प्रकट करावें." तरी नामदारांच्या लिहिण्याच्या विरुद्ध एक केंसभरहि न जातां महाराजांपाशीं (शहाजी) पोहोंचावें. यांतच तुमचा जास्त उत्कर्ष आहे असें समजावें.

फा. सा. खं १ ले.२० सु.१०४८ } (२५३७) { श. १५७० चैत्र शुद्ध १
हि. १०५८ रबल ७ } { इ. १६४८ मार्च २२

मुहम्मद आदिलशाह—हुद्देदार पेठ (बहुधा विजापुरांतील)

नारो विश्वनाथ पंडित याने विनंति केली कीं, "पेठेंतील पूलाजवी (पे, वाव, लाम, अलीफ, जीम, ते, हे, ये,) चें बावतींतील एक घर पूर्वी मला दिलें होतें. आतां मला फर्मान मिळावें." तरी उपर्युक्त घर नारो विश्वनाथ पंडित यास देऊन टाकावें.

सा. ३ ले. ४५४ } (२५३८) { श. १५७० वैशाख शु. २
फ.१०५७ व सु.१०४८रखर१ } महजर { इ. १६४८ एप्रील १५

नरसजी व येसाजी पानसारा माहाल आबदबोलावी कसबे व परगणे आकोले ह्यानीं हुजूर मालूम केले जे, देउजी व रतनजी नाइकवडी लाइनी. पाणसारगीसीं निसबती नाही. असा निवाडा होऊन नाइकवडी यानी आपली पानसारगी नाही असा आत्मखुसीचा कागद लेहोन घेतला. मिया राजियाचे कारकीर्दीस पानसारगीची जागा रिकामी म्हणून चालविली, मसमू नव्हे मिरासी नव्हे. यावरी नरसजी व येसाजी यासी पानसारगी मोकरर केली. देशपांडियाच्या दस्तुरें महजर लिहिला. यावरी शिवाजी बायेदेऊ कुलकर्णी कसबे आकोले ह्या मजलसीस बोलला की, सदरहू माहाल कसबे निसबतींचे आहेती. हे लिहिणे पिढी दर पिढी आपले आहे. बेहुकूम होतो, आपली मिरासी बुडते. यावरी हुजर निवाडा होऊन शिवाजी याज हाती महजर लेहविला.

फा. सा. खं. २ ले. २० } (२५३९) { श. १५७० श्रावण वद्य ३०
सु. १०४८ हि. १०५८ रजब २८ } { इ. १६४८ ऑगस्ट ८

मुहम्मद आदिलशाह—केदारजी खोपडे देसाई तर्फ भोर किले रोहिडा.

फतहखान खुदावंदखान यास कोंडाणा किल्ल्याच्या तर्फेस मसलत फर्मावली आहे. तरी हें फर्मान पोहोंचतांच त्यानें (= केदारजी) स्वार व प्यादे यांसह उपर्युक्त खानाच्या जवळ जाऊन त्याच्या आज्ञेत राहून दिवाणची मसलत (म्हणजे उपर्युक्त खानाच्या लिहिल्यानुसार निष्ठा व्यक्त होऊन तामिमाणें) होईल. या बाबतींत विसर करण्याच्या परिणाम चांगला होणार नाहीं. असे जाणून फर्मानाप्रमाणें अमल करावा.

सा. ३ ले. ५३५ } (२५४०) { श. १५७० भाद्र.
सु. १०४९ सावान १३ } { इ. १६४८ ऑगष्ट

सिवाजी राजे—तिमाजी बापूजी तरफदार कन्हेपठार परगणे पुणें.

मोरेश्वर गोसावी मौजे नायगों व मायेवाडी इनाम आहे. सालगुदस्ता पहिले असोन साल मजकुरी ही सिस्ती केली. याची तकसीम आली. तरी साल गुदस्ताप्रमाणे कुल याचे दुमाला करणे.

सा. ३ ले. ४५५ } (२५४१) {श. १५७० मार्ग. व. ७
सु. १०४९ जिल्काद २० } राजिनामा {इ. १६४८ नोवें. २६

येसाजी व बालोजी देशमुख ( परगणे आकोले ) कसबे राजूर—

आपली निमे देशमुखी. हली आपण नाकाम व नातुवणा, सबब तर्फ घसरली, साहेबी हुजूर बोलाऊन आपला वडील भाऊ नेऊजी त्यांचे हवाली समुदी देशमुखी केली. ते आपण खुसनुद दिधली, समस्त मायेवंता हुजूर दिधली.

फा. सा. खं. २ ले. १४ } (२५४२) {श. १५७० पौष शुद्ध ९
सु. १०४९ हि. १०५८ जिल्हेज ८ } {इ. १६४८ डिसेंबर १३

मुहम्मद आदिलशाह—हनुमन्त गौडा.

याबेळीं हुकूम सुटत आहे कीं, तुम्ही पादशाही मसलतीसाठीं मुबारिझ-उद-दीन ( खान मुहम्मद ) वझीरे हुकूमत यांजपाशीं जावें. तरी हा हुकूम पोहोंचतांच तुम्हीं आपल्या जमेतीसह मशारनिल्हेजवळ जाऊन राज्याची सदिच्छा व्यक्त करावी व उत्कर्षास पात्र व्हावें. या बाबतींत एक घडीचा दिरंग न करणें.

सा. ३ ले. ६६२ } (२५४३) {श. १५७० माघ शु. १२
सु. १०४९ मोहरम ११ } {इ. १६४९ जाने. १५

सरकार फैज असार फुलाद } —— { वापोजी बाबदेऊ ठाणदार व कारकून
जिलाल जलाल } { व देशमुख परगणे इंदापूर.

काजी अबन खिजमतगार मसजीद मौजे निबगाऊ केंकती परगणे मजकूर यास म्यावर १ व बदल रोशनाई मसीद तेल रोजिना पावशेर बमाहसुलेसी निजामशाहपासून इनाम आहे. माजी मोकासायानी व घोरपडे यानी सबा सलासीन व खमस अबैन अलफ रवा असे. तेणेप्रमाणें जिकीर सेहत शिरी करून चालवीजे.

सा. ३ ले. ५३७ } (२५४४) {श. १५७०
सु. १०४९ } {इ. १६४८–४९

सिवाजी राजे—कारकून व देशमुख परगणे पुणें.

मोरगांवी मोरेश्वर गोसावी यास सेत माहारुख कासरुके ८६ पडी आहे. ते इस्तावा माफ करुनु दिधला असे, ह्याचा मख्ता होनु १ मौजे मजकुरीं महसुलात नीवे धर्मादाऊ म्हणोन लिहीत जाणे. मौजे मजकुरीं गुरावरी पाल घालावयाची रवेसी आहे तरी गोसावियासी पाल माफ, याची गुरे पडीमध्यें चरतील. त्या क्षेत्री ब्राह्मण स्थाइक व आगतुक यापासी गुराचे पाल मागताती तरी पाल माफ असे. ब्राह्मणाचे वाटे नव जाणे. येक जरा फिर्यादी आलियानें तुम्ही जाणा.

सा. ३ ले. ५३६ } (२५४५) { श. १५७०
सु. १०४९ } { इ. १६४८–४९

सिवाजी राजे—कारकून देशमूख परगणे पुर्णे.

मोरेश्वर गोसावी यास चावर १ गजशरायेनी एकूण कास रुके १२ मायेवाडी व नायेगावची चालती कास दिधला. महाली कारकून नख्तबाब वाटणी कासेवरी खर्च लिहिला व बाकी काढली; तरी हे देणे महाराजाचें आहे. आपण सर्वोत्तमाचे (सेवा) करूनु, सर्वकाळ महाराजाचें कल्याण चिंतितो. महाराजे चालती कास सालाबाद लागवण जैसे जे गावामधे होत जाईल तैस उगवणी होत जाईल. पटिया आपले दुमाले करून माफ केली पाहिजे म्हणोनु मालूम केले. तरी खुर्दखती रजा असोनु हे तुम्हास कोणे फर्माविले ? तरी याचे प्रजेशी सेताशी तुम्हासी काही निसबती नाहीं. गावाखेरीज असे. इनाम दुमाले करणे.

एपि. कर्ना. व्हाल्यु. ५ नं. १५८ } (२५४६) { श. १५७०
१ } { इ.१६४८–१६४९

...दौडाय यानें चेनरायपट्टण मिळाल्यावर पादशाहाच्या राजकार्याकरितां दगडी किल्ला बांधविला ( चेनरायपट्टण येथील कोलाड मंडपामधील शिलालेख ).

सा. ३ ले. ५३८ } (२५४७) { श. १५७१ अ. आषाढ व. १३
सु. १०५० जखर २६ } { इ. १६४९ जून २७

अफजलखान महमदशाही—कारकून देशमूख अधिकारी पातशहाबाद चेऊल.

मोरेश्वर गोसावी स्थानक मोरेश्वर यास मलिक सैद वा माजी मोकासाइयानी रोजिना लारि २ कसबे चेऊल हरएक दस्तबाबैपैकी रवा अस्त. हाली मजकूर साहेबासी मोकासा आला. तरी इनाम दुवाला फर्माविले पाहिजे म्हणोनु मालूम जाले. तरी रुस्तुमजमाप्रमाणें दुवाली करून चालवीजे.

सा. ३ ले. ६६३ } (२५४८) { श. १५७१ आषाढ शु. १
सु. १०५० जखर २९ } { इ. १६४९ जून ३०

रा. त्रिंबक राजे—कारकून, देशमूख, हुदेदार, मुकासे, मोकदम कर्याती वायेवाडे परगणे इंदापूर.

काजी अबन काजी हाजीज इनामदार परगणे मजकूर यास मसीदीकरता चावर ३ व रोज तेल इनाम असे. ते चालवीजे.

राम. अं. १६६      (२५४९)      श. १५७१ आषाढ शु. १०
इ. १६४९ जुलै ९

धोंडोबा काले आमचे ववसीचे जे येतील त्याचे तीर्थगुर वीस्वरभट. शिवपुरे; पैठण.

राम. अं. १६६      (२५५०)      श. १५७१ आषाढ शु. १०
नोंद साह सदाशिव      इ. १६४९ जुलै ९

अंताजी गंगाधर प्रतीठानी तीर्थ पुरोहीत वीरेस्वर पाटक, आमचे वंसाचा जो येईल त्याचे तीर्थगुरु-शिवपुरे पैठण.

सा. ४ ले. ६८२      (२५५१)      श. १५७१ श्रावण शुद्ध १
सु. १०५० रजब २९      इ. १६४९ जुलै ३०

दिवाण तपे बंदर माहामदी—खोतानि, मिरासी व गावकरानी तपे मजकूर.

कृस्ण जोसी बिन गोपाल जोसी पोंबुर्लेकर यासी वरहुकूम सालाबाद व साल गुदस्ता चालिलेले इनाम तेणेप्रमाणे सालमजकुरासी आदा कीजे.

सा. ३ ले. ५३९      (२५५२)      श. १५७१ श्रावण शु. ९
सु. १०५० शावान ७      इ. १६४९ आगष्ट ६

आलीखान काजी—कारकून देशमुख अदिकारी कसबे कल्यांण व तपे अंबरनाथ मामले मुरंजन.

मोरेश्वर गोसावी क्षेत्र मोरेश्वर यास इनाम बदल आदारोटी धर्मादाऊ गरीबगुरबा दरसवाद कसबे मजकूर जागा जकाती बंदर वरहुकूम फर्मान व मुकासाई खुर्दखत सालाबाद लारी १ आहे. येसियासी हाली साहेबास मुकासा अर्जानी जाला. तरी सद्रहू इनामपैकी वरहुकूम मोईन काजी साहेब लारी ·।· पाउका दुबाला केली असे.

सा. ३ ले ५४१      (२५५३)      श. १५७१ भाद्र. व. ११
सु. १०५०      इ. १६४९ सप्टें. २२

सिवाजी राजे—हुदेदार मौजे लोणी वाराकर्डियाची परगणे पुर्णे.

मोरेश्वर गोसावी यास मौजे मजकुरी इनाम चावर १ आहे ते वरहुकूम भोगवटा तसरुफाती तागाइत सालगुदस्ता चालत आले असेल त्याप्रमाणे दुमाले करणे.

सा. ३ ले. ५४०      (२५५४)      श. १५७१ भाद्र. व. ११
सु. १०५० रमजान २४      इ. १६४९ सप्टें. २२

सिवाजी राजे—कारकून परगणे पुर्णे.

मोरेश्वर गोसावी यानी लिहिले जे हुजरुनु इनामदाराचे नावे माहालास खुर्दखत आले व त्यावरुनु ठाणाहुनु इनामती अनामत केले. आपल्या इनामती

सा. ३ ले. ५३६ } (२५४५) { श. १५७०
सु. १०४९ } { इ. १६४८-४९

सिवाजी राजे—कारकून देशमूख परगणे पुणें.

मोरेश्वर गोसावी यास चावर १ गजशरायेनी एकूण कास रुके १२ मायेवाडी व नायेगावची चालती कास दिधला. महाली कारकून नल्तबाब वाटणी कासेवरी खर्च लिहिला व बाकी काढली; तरी हे देणे महाराजाचें आहे. आपण सर्वोत्तमाचे (सेवा) करूनु, सर्वकाळ महाराजाचें कल्याण चिंतितो. महाराजे चालती कास सालाबाद लागवण जैसे जे गावामधे होत जाईल तैस उगवणी होत जाईल. पटिया आपले दुमाले करून माफ केली पाहिजे म्हणोनु माल्रुम केले. तरी खुर्दखती रजा असोनु हे तुम्हास कोणे फर्माविले ? तरी याचे प्रजेशी सेताशी तुम्हासी काही निसबती नाहीं. गावाखेरीज असे. इनाम दुमाले करणे.

एपि. कर्ना. व्हाल्यु. ५ नं. १५८ } (२५४६) { श. १५७०
१ } { इ.१६४८-१६४९

...दौडाय यानें चेनरायपट्टण मिळाल्यावर पादशाहाच्या राजकार्याकिरतां दगडी किल्ला बांधविला (चेनरायपट्टण येथील कोलाड मंडपामधील शिलालेख).

सा. ३ ले. ५३८ } (२५४७) { श. १५७१ अ. आषाढ व. १३
सु. १०५० जखर २६ } { इ. १६४९ जून २७

अफजलखान महमदशाही—कारकून देशमूख अधिकारी पातशहाबाद चेऊल.

मोरेश्वर गोसावी स्थानक मोरेश्वर यास मलिक सैद वा माजी मोकासाइयानी रोजिना लारी २ कसबे चेऊल हरएक दस्तबाबपैकी रवा अस्त. हाली मजकूर साहेबासी मोकासा आला. तरी इनाम दुवाला फर्माविले पाहिजे म्हणोनु मालूम जाले. तरी रुस्तुमजमाप्रमाणें दुवाली करून चालवीजे.

सा. ३ ले. ६६३ } (२५४८) { श. १५७१ आषाढ शु. १
सु. १०५० जखर २९ } { इ. १६४९ जून ३०

रा. त्रिंबक राजे—कारकून, देशमूख, हुदेदार, मुकासे, मोकदम कर्यातो वायेवाडे परगणे इंदापूर.

काजी अवन काजी हाजीज इनामदार परगणे मजकूर यास मसीदीकरता चीवर ३ व रोज तेल इनाम असे. ते चालवींजे.

राम. अं. १६६ (२५४९) श. १५७१ आषाढ शु. १०
इ. १६४९ जुलै ९

घोंडोबा काले आमचे ववंसींचे जे येतील त्याचे तीर्थगुर वीस्वरभट. शिवपुरे; पैठण.

राम. अं. १६६ (२५५०) श. १५७१ आषाढ शु. १०
नोंद साह सदाशिव इ. १६४९ जुलै ९

अंताजी गंगाधर प्रतीठानी तीर्थ पुरोहीत वीरेस्वर पाटक, आमचे वंसाचा जो येईल त्याचे तीर्थगुरु-शिवपुरे पैठण.

सा. ४ ले. ६८२ (२५५१) श. १५७१ श्रावण शुद्ध १
सु. १०५० रजव २९ इ. १६४९ जुलै ३०

दिवाण तपे बंदर माहामदी—खोतानि, मिरासी व गावकरानी तपे मजकूर.

कृस्ण जोसी बिन गोपाल जोसी पोंवुर्लेकर यासी वरहुकूम सालाबाद व साल गुदस्ता चालिलेले इनाम तेणेप्रमाणे सालमजकुरासी आदा कीजे.

सा. ३ ले. ५३९ (२५५२) श. १५७१ श्रावण शु. ९
सु. १०५० शावान ७ इ. १६४९ आगष्ट ६

आलीखान काजी—कारकून देशमूख अदिकारी कसवे कल्यांण व तपे अंबरनाथ मामले मुरंजन.

मोरेश्वर गोसावी क्षेत्र मोरेश्वर यास इनाम बदल आटारोटी धर्मादाऊ गरीबगुरबा दरसवाद कसवे मजकूर जागा जकाती वंदर वरहुकूम फर्मान व मुकासाई खुर्दखत सालाबाद लारी १ आहे. यैसियासी हाली साहेबास मुकासा अर्जानी जाला. तरी सदरहू इनामपैकी वरहुकूम मोईन काजी साहेब लारी ·।· पाउका दुबाला केली असे.

सा. ३ ले ५४१ (२५५३) श. १५७१ भाद्र. व. ११
सु. १०५० इ. १६४९ सप्टं. २२

सिवाजी राजे—हुदेदार मौजे लोणी बाराकर्डियाची परगणे पुर्णे.

मोरेश्वर गोसावी यास मौजे मजकुरी इनाम चावर १ आहे ते वरहुकूम भोगवटा तसरुफाती तागाइत सालगुदस्ता चालत आले असेल त्याप्रमाणे दुमाले करणे.

सा. ३ ले. ५४० (२५५४) श. १५७१ भाद्र. व. ११
सु. १०५० रमजान २४ इ. १६४९ सप्टं. २२

सिवाजी राजे—कारकून परगणे पुर्णे.

मोरेश्वर गोसावी यानी लिहिले जे हुजरुनु इनामदाराचे नावे खुर्दखत आले व त्यावरुनु ठाणाहूनू इनामती अनामत केले. आपण्या

शि. सा. सं. ३-८

सा. ४ ले. ७०८ }
सु: १०५१ }

(२५६२)
खुर्दखत

{ श. १५७१–७२
{ इ. १६५०–५१

—समस्त ब्राह्मण रुग्वेदी निवाडा कसबे नासीक रघुनाथाचे देवालयात व येजुर्वेदी माहास्तळ त्रींबक.

तुम्ही आपणामध्यें आपण पोहेकरी यानिमित्त करकसा करीत आहा. तरी याचा निवाडा ऐसा जे, समस्त ब्राह्मण, तीर्थानिमित्त येणारे ऋग्वेदी, यजुर्वेदी, च्यातुर्वेदी, काईत, रजपूत, शूद्र कदिकोळी येतील, ते समस्त ब्राह्मण ऋग्वेदी व येजुर्वेदी वाटून घेणें. जेवण जेवावयास जातील ती सुखे जेवो.

सा. ३ ले. ४१७ }
सु. १०५० रखर १२ }

(२५६३)
मिसली

{ श. १५७२ चैत्र शु. १३
{ इ. १६५० एप्रील ४

दिवाण तपे खारापाट उर्फ नागोठाणे—

देसाई व अदिकारी खोत सिलोतरी मढवी वाजे मिरासदार.

बावाजी कृस्ण कुलकर्णी याने अर्ज केला की, आपले कुलकर्णपणाचा निवाडा मलिकंबर, मन्हाटियाची कारकीर्दीत झाला. त्याप्रमाणें १०० सिरणी कबूल केलियावर महालीचे कारकुनानी मिरास सावाजी अनंत अताजी याचे हवाली केली. तरी माझी मिरास माझे हवाली करून निवाड्याप्रमाणें महजर करून देणें. आपण १५० लारी सिरणी देतो. ह्याप्रमाणें करणें.

सा. ३ ले. ५४५ }
सु. १०५१ रबिलाखर }

(२५६४)

{ श. १५७२ चैत्र
{ इ. १६५० मार्च एप्रील

रुस्तुमेजमा—कारकून, देशमूख व अधिकारी इसलामाबाद—

मोरेश्वर गोसावी यास दरोज लारी २ दिले (ले.२५५७) असतां कारकून अलम करीत नाहीं. तरी वडेखानसाहेबाचे वक्तीचा इनाम आमचे मन्हामती देणे येसे खुर्दखतचे खोलून लिहिले असता उजूर करता येसे नादान कारकून? आता रसीदिन खुर्दखत सीस्त इनामदार दीजे. ताकीद होईल.

सा. ३ ले. ४१८ }
सु. १०५१ रजब ७ }

(२५६५)
कौलनामा

{ शक १५७२ आषाढ शु. ८
{ इ. १६५० जून २७

तुझे बाबे तपे मजकूरचे देसाई व अदिकारी यानी मालूम केले कीं, कुलकर्णपणाची कमावीस व वाडवौही तकसीम तान्हाजींची पेसजींपासून आहे. त्यांत सिदी गेवान अबुतालीब ठाणदार याजकडून तान्हाजीचा चिचेराभाई सावाजी अनंत यानें कुलकर्ण मिळविलें. पण सावाजीचा कमाविसीसी निसबत नाहीं. तान्हाजी वडील आहे. तरी त्यासच १५० भुडे सिरणी घेऊन महजर करुन देऊन याचेच हाते कमावीस घेतली पाहिजे. म्हणून हा कौल तान्हाजीस दिला, सेरणी घेतली. खुसिहाल होऊन कमावीस करणें.

सा. ३ ले ४१९ | (२५६६) | श. १५७२ आषाढ शु. ८
सु. १०५१ रजब ७ | वाटणी | इ. १६५० जून २७

तान्हाजी कृष्ण व सावाजी अनंत यामधें तपे खारापाटणमधील कुलकर्णीपणाचे मिरासीबदल करकसा लागला. त्यांत तान्हाजी सांगतो...तपे मजकूर नागोजी भोसला यास मुकासा असतां मी नादान, अंताजी कुलकर्णपणाची कमावीस करीत असे. नागोजीचा कारकून रायाजी भोसला व ठाणदार व दत्ताजी त्रिमल मजमूदार तपे मजकूर अंताजीची पाठी राखोन आपणास हुकमी बैसवून मिरासीची वाटणी निमेनिमे आणि एका आड एक साल अंताजीनें कमावीस करावी असे लिहून आपले निशाण घेतले. यावरी येक साल आपण चालविले पुढे नाही. मग हवासखान मुकासी याने कुलकर्णपणाचा कारभार मजकडे दिला. त्यावरी सिदि अबर हवालदार कोट जंजिरे राजुरी यास मुकासा जाला. पुढें सावाजी अनंत सिदी रेहन अबुतालीब ठाणदार या नजीक उभा राहून मिरास वाटणी निमे कमाविस येक साल आपण व एक साल तान्हाजीनें करावी असें सांगून मान घेऊन कमावीस घेतली. यावरी मिरासदारांदिकांनीं तान्हाजीच्या हातें कमावीस घेतली पाहिजे व मराठियाचे वाटणीमधें वाटणी केली ते वातिल असे सांगितलें. मग निमे तकसीम व कमावीस कृष्णाजीस वडील म्हणून दिल्ही. तेण्हेच बारनीस बदल हाली वडिलाई तान्हाजीस दिली. असा निवाडा केला. यावरी सावाजीनें अर्ज केला की, तान्हाजी कमावीस करील आपण बेकार, आपला अवकात चालत नाही; तान्हाजीचे वाटणीमधून गाव दोन ज्याजती देविले.

सा. ३ ले ४२० | (२५६७) | श. १५७२ आषाढ शु. १४
सु. १०५१ रजब १२ | खुर्दखत | इ. १६५० जुलै २

सिदी अजम काजीअल्ली सेर हवालदार व कारकून—
कारकुनानी व देसाई आदिकरून खारापाट.

तान्हाजी कृष्ण व सावाजी अनंत यांचेमधे झालेल्या वाटणीपत्राप्रमाणें चालविजे. (ले. २५६६ चा घालून पहा).

फा. सा. खं. १ ले. २१ सु. १०५० | (२५६८) | श. १५७२ श्रावण शुद्ध ५
हि. १०६० साबान ३ | | इ. १६५० जुलै २३

मुहम्मद आदिलशाह—
माणकोजी नरसिंगराव हवालदार व कारकून किले सातारा.

आम्हांस असें समजतें कीं, मौजे सायगांव तपे मेढे किले वासोटा येथील कुणबी स्वतःकडून वासोटा किलेयाच्या तरतुदीस जात्रयाचे पैसे न देतां तुमच्या

सा ३ ले. ५४८ }
सु. १०५१ } (२५७५) { श. १५७२
{ इ. १६५०-५१

माहाराज राजश्री शाहाजी राजे—देशमुख परगणे पुणे.

मोरेश्वर गोसावी यांस मोरगौ जमीन चावर नीम देखील पटिया दिली. खमसैनामधें (श. १५७१) सदर जमीन नाकीर्द पडली सबब तसरुफाती जाली नाही. व साहेबाचे खुर्दखत महालास आले इनाम अनामतं करणें. तरी तिसा अर्बैन (श. १५७०) प्रमाणें चालिले तसे चालवणे. दुमाला करणें. परवानगी जैनाखान पीरजादे.

सा. ४ ले. ७०७ }
सु. १०५१ } (२५७६) { श. १५७२-७३
{ इ. १६५०-५१

—समस्त ब्राह्मण महास्तळ त्रींबक.

ऋग्वेदी व यजुर्वेदी आपणामध्ये भांडत होते. तरी हुजूर निवाडा केला ऐसा जे ऋग्वेदी यजमानाचे कृत्य ऋग्वेयाने, यजुर्वेदीचे यजुर्वेदीनेंच करावे. जो यजमान समाराधना करील ते सुखे ज्याच्या मनास येईल तेणे जेवावयास जावे. ऐशा निवाडा जाला आहे.

एपि. कर्ना. ५।१ }
चनरायपट्टण शिलालेख. } (२५७७) { श. १५७३ जेष्ठशु. १५
{ इ. १६५१ मे २४

कंठीर व नरसराज याच्या कारकीर्दीत कर्नीकरनहलीचा दोडाय चनरायपट्टणचा सुभेदार असतां नागभक्तानें मंडप बांधला व सदरहू मूर्तीची स्थापना शके १५७३ ज्येष्ठ शु. १५॰ या दिवशी केली. (दिंडगर येथील ईश्वराच्या देवालयांतील शिलालेख.)

एपि. कर्ना. ५।१ चन्नरायपट्टण }
शिलालेख. } (२५७८) { शं. १५७३ कार्तीक शु. ७
{ इ. १६५१ आक्टो. ११

( वागूर ( Bagur ) गावांतील वेणुगोपाळ देवालयांतील शिलालेख )

कंठीर व नरसराज याच्या कारकीर्दीत सतग्राम येथें कोतुराय ( Koturayya ) सुभेदार असतां कौतुरायानें गोपाळदेवाकरितां शके १५७३ कार्तिक शु. ७ या दिवशी अनि बागूर ( Ani-Bagur ) येथें 'नवरंग पाटशाला' बांधिली

याल वंदूर ( Yalavandur ) येथील लिंगप्पा यानें देवालयाचें काम सुरु केलें. नवरंग, भोवतालची भिंत, पाठशाला ( Pathasala ) वगैरे पवित्र कृत्यें कोटुरायाचा पुत्र नांजय ( Nanjaiya ) याने पुरे केलें.

फा. सा. खं. १ ले. २२ सु. १०५१ } (२५७९) { श. १५७३ पौष वद्य ३
हि. १०६२ मोहरम १३ } { इ. १६५१ डिसेंबर १७

मुहम्मद आदिलशाह—हुद्देदार पेठ शहापूर मामले मुहम्मदपूर. राव अमीनराव ठाणेदार पेठ शहापूर यांनीं विनंति केली कीं, "तोफांच्या वातेरी (कोट) नजीक थोरल्या हौदाच्या बाजूस बाहेरच्या अंगास एक उघडें खिंडार आहे. तेथें चोरांना आश्रय मिळतो. ही गोष्ट हुजुरास कळविल्यावर हुजूरच्या हुकमाप्रमाणें पूर्वीचा जीर्ण कोट बाजूस करून ती जागा आंत घेऊन त्याबाजूस कोट बांधून मोकळी जमीन लोकांस विकून टाकून कोटास दरवजा बांधला. त्या जमिनीवर लोकांनीं घरें बांधून ती जागा भरभराटीस आणली आणि ते लोक हुजुरांस दीर्घायुष्य चिंतून तेथें राहात आहेत. त्या ठिकाणीं मी एक घर बांधू इच्छितों. तेव्हां जुन्या कोटाच्या १५० गज लांबीच्या भिंतीचे धोंडे व माती आणि ७० गज लांब व ४० गज रुंद अशी जमीन बाक्षिस देण्याची कृपा करावी-" विनंतीप्रमाणें त्यास उपर्युक्त गोष्टी दिल्या आहेत. थोरला हौद व धर्मशाळा, वाडे व नबाबपूर यांच्या बाजूस असलेली मोकळी जागा, आणि जुना कोट व माळ जमीन यांवर कोट व दरवजा बांधून तेथील जमिनीवर घरें, दुकानें व बाजार बांधून पेठेची आबादानी करावी म्हणजे उपर्युक्त रावाची सदिच्छा व्यक्त होईल.

सा. ३ ले. ६३७' } (२५८०) { श. १५७३ माघ व. १२
सु. १०५२ सफर २५ } { इ. १६५२ जाने. २७

जाखो निलकंठ वा साबाजी माहादेऊ कुलकर्णी कसबे खानापूर, व मौजे पडे, मोह, कौलविरे, सुलतानगादे, वाजेखेडे कसबे मजकर यानी माल्हूम केले, आपले कुलकर्ण असता आपले भाऊ तमाजी नरसिह इ. यास आपली तकसीम मागितली, दिल्हे नाही. आपले वडील सदरेस माल्हूम केले वरी त्यानी निवाजी दत्ताजी पंडित नामजात कसबे भिलाडी तपे वालवेचे स्थलासी पाठविले. तकहिरा लेहून घेऊन तेथे महजर जाला व गावाच्या तकसिमा वाटल्या. तेणेप्रमाणें हकलाजिमेसह खाऊन असावे.

एपि. कर्ना. १२ सिरा. ६६ व } (२५८१) { श. १५७३
हिजरी १०६१ } { इ. १६५१-१६५२

(सिरा येथील मलिक रिहान खानाच्या कबरीवरील शिलालेख)

सिऱ्याचा सुभेदार मलिक रिहान याच्या मृत्युची व याची कबर बांधण्याची तारीख ज्यांत नमूद केलेली आहे असे पद्य.

हिजरी सन १०४७ (इ. स. १६३७) या साली तो (मलिक रिहान) येथें या देशाचे सौंदर्य वाढविण्यास आला. रिहान शक्तिवान व धनवान होता.

व तो अल्लाचा दूत होता. त्याच्या मृत्यतिथीबद्दल मी चौकशी केली. एका अदृश्य देवदूताने उच्च स्वरांत घोषणा केली व जहन्नम मधील देवदूतांनीं ह्याची साथ केली की रिहान अल्लाच्या मसनदी जवळ गेला.

एपि. कर्ना. १० मुळबागल १५४ शके कार्तिक वहुल ११ विजय संवत्सर } (२५८२) {श. १५७५ कार्तिक व. ११ इ. १६५३ नोव्हें. ५

( कोंडिपल्ली (Kondipalli) येथील दोड्डकेर (Doddakere) च्या पिछाडीचा शिलालेख )

-शके कार्तिक वद्य ११ विजय संवत्सर या दिवशीं राजाधिराज संभाजी राजा महाराज यांचा पुत्र कनरायजी (Kannarayaji) पंडित यानें कोंडिगनहली विकत घेतली व तें गाव सावती (Savati) यांस (Kathu-godagi) म्हणून बाक्षिस दिले ( यांतील कांहीं भाग त्रुटित आहे ).

सा. ३ ले. ६६४ सु. १०५४ मोहरम ९ } (२५८३) {श. १५७५ मार्ग. शु. १० इ. १६५३ नोव्हें. २०

रा. सिवाजी राजे—कारकून देसमूख परगणे इंदापूर.

हाली साहेबास मुकासा अर्जानी जाला. तरी काजी अवन बिन काजी हाफजि यास मसीद कसबे मजकूर करतां चावर १ व रोजिना तेल पाउसेर ०॥ जे इनाम सालाबाद चालत आहे ते दुबाले करणे.

सा. ३ ले. ६३८ सु. १०५४ सफर २१ } (२५८४) {श. १५७५ पौष व. ८ इ. १६५४ जाने. १

तुकोजी बिन हमराजी धणगर पटेल मौजे पेड मामले मुर्तजाबाद व केदारजी खलोजी झाबिरा पटेल डोंगरसोनी परगणे कागल मामध्यें पेडच पटेलगीबद्दल गरगसा खवासखानाचे मुदती तधी धरून लागला असे. कारकीर्द खान याकुतखान सर्जाखान सिलेहदार खानचे मोकासा जाहलेवरी झाबिरेसी निसबत नाहीं; सजा फर्माविले आहे. इतके होऊनहि मागुती गरगशा करू लागला मग मौजे पडेंचे मिरासी ४ आणाजी नेम चौगुला इ. यानी जरी आपली पटेलगी म्हणोन बोलिलियाने आपणासी पडचे पटेलगी देवे. जरी न व्हे म्हणतिया न व्हों. मग गोहीदारासी व उभयतायासी अदवखान १५ रोज ठेविले. मग ठाणेमधे निवाडा होत नाही म्हणोन साहबाच दरबारेसी आलो. यावरी तुकोजी बिन हमरोजी हा सही जाहाला.

सा. ३ ले. ६६५ } (२५८५) { श. १५७५
सु. १०५४ } { इ. १६५३-५४

रा. सिवाजीराजे—कारकून व देशमुख परगणे इंद्रापूर.

काजी हाफीज सेकीन कसबे मजकूर याचे (ले. २४७६) भो इनाम दुमाले करणे.

सा.३ले.५४१ } (२५८६) { श. १५७५
सु. १०५४ } { इ. १६५३

सिवाजीराजे—कारकुन व देशमुख व परगणे इंद्रापूर.

मोरेश्वर गोसावी यासी जमीन चावर २ मौजे फाकड व सेलगौ येथे इनाम आहे व रोजमुरा टांकसाली टके १०६ एक टका सा रुके प्रमाणे आहे तरी जमीन व नख ससगाणिया चालवणें.

सा.३ले.५५० } (२५८७) { श. १५७५
सु. १०५४ } { इ. १६५३

मुला अजम मुला आहमद—

कारकून देशमुख अधिकारी सरकार तलकोकण व महालानिहाये.

मोरेश्वर गोसावी यास दरोज हुरमुजी लारी ७ मामले व कसबे भिवडी, कलियाण, मुरंजन, कसबे कल्याण, मुरबाड, चेऊल, श्रोण येथे दिले आहे. तेणेप्रमाणे मोकरर करून दुमाले करणे.

एपि. कर्ना. व्हाल्यु. ७ चनगेरी } (२५८८) { श. १५७५
ता. नं. ४३ [?] } { इ. १६५३

महमद मुस्ताफाच्या आशीर्वादानें सुलतान महमद शहा इब्राहिमखान-ई-खानानच्या राज्यात सदरहू तलाव बांधावयाचा आहे. बादशहा पूर्ण बरा झाला म्हणजे मी तलाव खोदविण्यास आरंभ करीन.

सुभेदार बारी-मलीक, लारखानाचा पुत्र, यानें तलाव खोदविण्याचा निश्चय केला.

इ. स. १६५२ सालीं बादशहा आजारी होता. सुभेदारानें बादशहांबद्दल प्रार्थना केली. व या तलावाचा पाया खोदविला (वडे-सात्री तलावावरील शिलालेख.)

एपि. कर्ना. व्हाल्यु. ७ चन्नगिरी } (२५८९) { श. १५७५-७६
तालुका नं. ४४।१०६४ हिजरी } { इ. १६५३-५४

सुलतान महमदाच्या राज्यांत सुलतान नगरामध्यें लारखानाचा पुत्र बारी मलीक यानें वाली सुरुर नांवाचा तलाव बांधविला. बादशाहाची प्रकृति जरा

सुधारली म्हणून तलावाचीं बांधणी सुरू झाली. बादशहा पूर्णपणें बरा झाला म्हणजे तलावाचे काम पुरें केलें जाईल म्हणून सुभेदारानें शपथ घेतली त्याप्रमाणें बादशहा बरा झाल्यावर सदरहू तलावाचें काम पुरें करण्यांत आलें. वलीपूर तालुका या तलावाप्रीत्यर्थ सुभेदाराच्या नांवानें देण्यांत आला.

पुरं. द. ३ पृ. १३० }
फ. १०६३ } (२५९० ) {श. १५७५
{इ. १६५३

सखो भिकाजी सिवाजी राजे यापासी उभे राहून अर्ज केला कीं, आपला वाद आहे. आपणास आनंदराव याची मजमू आहे त्यास चार महिने निरोप दिला पाहिजे. खेड कसबा व सिवापूर हे दोन गाव आपले असता, साहेबापासी नारो बापूजी चाकरी करीत होता व साहेब आणि मातुश्री आईसाहेब कसबियामधे त्याच्या वाडियात सेजारीं रहात होतें; त्या वलखीनें साहेबी त्याची पाठी राखून आपल्या बापाच्या हातीचा कसबाचा रुमाल हिरून त्याचे हाती दिला. बापूजीपंती चाहाडी केली की, भिकाजी रुद्राने काही चोरीमारी केली ती साहेबी मनास आणिले. दिवाणबळे कसबाचा रुमाल घेतला. दिवाणात उभे राहून खटपट करावी तर भये उत्पन्न जाले की सिवाजी आवजीस जसा मार केला तो न्याय होईल. देशमुखापासी सागितले. त्यानी उत्तर केले तुमच्या बादियाची पाठी राजश्री राखीत आहेत ये प्रसगी आम्हास बोलता येत नाहीं...फतेखान विजापूरची नामजादी राजियावरी आली. ते वेळेस किले कोढाणा व शिरवळ खेडेबारे देऊन सला केला. राजे पुणियास गेले. आबाजी महादेव कारभारी जाले. यानी कुल मुलकावरी गुर, उटे व घोडी घातली. आपले बापापासी काही यावयास नव्हते तेधवा महादेव भट महाभास हे राजश्रीचे गुरु ते आपले माऊस चुलते. त्यास वरातदारी उपद्रव केला. मग राजेच कृपाळु होऊन व्हन पाच करार केले व येक टोणगा फिराऊन घेतला. ते व्हन घर भाडियाने देऊन दिवाणात दिघले. पुढे सामराजपंत पेसवे याही मुलकावरी मोहीमपटी घातली तीहि दिली...महाराज साहेबी मातुश्री आऊसाहेबास व तुम्हांस (शिवाजीस) खेडबारियास दादाजीपंतापासी पाठविले. ते वेळेस कसवियामधे वाणियाची व बाजे मोहतर्फा कुळे याची घरे मोडून तो जागा वाडियास केला. व त्या कुलासाठीं शिवापूर पेठ वसावयाचा तह केला. तेथील नव वरसे निपोटी चाकरी आपली वृत्ती म्हणाऊन केली. दहावे वरसी दादाजीपंत महाराजाचे भेटीस करनाटकात चालिले. तेथून आले तैसेच दुखन्य पडले व मेले. त्यावरी बापुजी मुद्गल व त्याचा लेक नारो याने साहेबाचा बदनिशा करून साहेबाकडून रुमाल बलात्कारे घेऊन आपले हाती घेतला. त्याहिसमधे बरेवाईट व नागवण सोसले. असे असोन हाली पेठेचे

कुलकर्णी साहेब बलात्कारे त्यास देतात. कुल दरबार त्याचाच जाला. मग सामराजपंत यानी पाव लोकाची फडनीस दिल्ही. पुढे वादप्रतिवाद करावा तो मोरोपंत पेशवेहि त्याचेच जाले. मग मोगलाचा व इदलशहाचा गलबल जाला व मुलुक उद्वस जाला...तिन्ही जुमले लोहोगडीहून नेतोजीचे सरनोबतीचे वेळेस सुरतेहून आलियावर लोहगडी लस्कर राहिले. तों वडगावाजवळ वडाखाले मुकुंदासिंग रजपूत होता त्यासी गाठ पडली. ते वेळेस चिमणाजी पुढे लुटीस गेला. नारो बापूजीस तीर थनसरीस लागला. तो घोडा गजरत्न आसनको होता, त्यावरी जीव गेला. ते घेऊन आपण सोनकियाचे आलंदीस चाललो. गनीम पाठीवर येत असे. ते वेळेस संक्राजी मोरदेव नारोपंताचे मजमदार होते, त्रिंबक लुने महाडिकाचा मुजुमदार. पुढे मोरोपंत पेसवेहि आपणास दाबदुब करून बोलों लागले की, खोटेपणाचा कागद (तूस) लेहून यावा लागेल. कारण गोहांचा कागद आला आहे. त्यास आपण म्हटले आपणापासून लेहून घेई असा कोण्ही नाहीं. ते बोलिले की आपण दिसत नाहीं की राजेहि दिसत नाहीं. मग आपण म्हटले की पण हे बरहक होत नाहीं. पुढे आपण वाडियात साहेबाकडे गेलो. तो बकी गोमाजी नाईक व कृष्णाजी नाईक सोकटी खेलत बसले होते. आपण राजे वगैरेस ऐकू जाईसे म्हटले. आपले वाटे यास पैका फार जाले. कैसे म्हणाल तर कोंढाणा निजामशापासून घेतला, सिदि अंबर धरिला ते वेळेस ५०१६० हजार व्हन लुटून आणिला, माहुलीस माहाराज निजामशाही दिवाण होऊन गेले होते ते वेळी मोगल व इदिलशाही नामजादी, त्यास सामान व खजना विज्यापुरी होऊन डोणज्याचे खिंडींतून जात होता तोहि लुटला. मुधाजी मायथा निजामशाही त्याचा लक्ष व्हनाचा वित ह्याच्या घरात गुप्तरुपे ठेविले; त्याचे बळें आणि साहेबींच्या बळे कागद लिहून घेऊ म्हणतात. पण ब्रह्महत्या केली तरी लिहून देणार नाहीं. राजियाने अनीत केली तरी मज येकास मारील. ब्रह्मराक्षस होऊन जे कोणी पाठी राखीत आहेत त्यांचा वंश नाहीसा करील. मग राजियाचे चिती वाटले, धर्मतेन बोलतो. तुम्ही आपले कार्य भागी म्हणऊन तुमचे भिडेने बरहाक करीत नाही. सारादिवस तैसेच टाकिले पुढे जे होणार ते सुखीच होये. कागद काही त्यापासून आमच्याने घ्यवत नाहीं. मग साहेबी आपणास बोलाऊन नेहून सांगितले की, तुझ्या निवाडिया करतां कुल आपले कार्यभागी दुःखी होत आहेत; आपल्या कार्यास धका देत आहेत; आपल्यावरी ये प्रसंगी राजकारन पडले आहे. तरी यास दुःखी करता येत नाही चार दिवस निवाडा राहू देणें. पुढे करकर आणीक करावी तो साहेब बारदेसचे स्वारीस गेले. पुढे गलबला फारच जाला, मुलुख वोस पडला, निवाडा तैसाचा राहिला.

सा. ४ ले. ६९१ } (२५९१) { श. १५७६ वै. वद्य १०
सु. १०५४ } महजर { इ. १६५४ मे १

तिमाजी नामाजी कुलकर्णी लोणी यांनी ४५ होन देऊन मौजे लोणीचे कुलकर्ण विकत घेतलें. २५ वर्षे खादलें. दरम्यान नरसो रवलदेऊ हा शहाजी याचे कारकीर्दीपासून बळेच कुळकर्ण खातो. तेवारी गोतनायेकी जमून व साहेबी मुनत्फी केली जे खरेदीदारांस व नरसो रवलदेवास समध नाही. मौजे लोणीचे कुळकर्ण तिमाजी नामाजीचे हुमाला करणें.

पे, द. ३१ ले. २० } (२५९२) { श. १५७६ ज्येष्ठ शु. ३
सु. १०५४ रजब २ } कौलनामा { इ. १६५४ मे ९

रा. शाहाजी राजे...बाळाजी हरी कुळकर्णी पेठ मलकापूर परगणे पुणे.

साहेब मेहेरबान होऊन पेठ मजकुरचे कुळकर्ण तुजला मन्हामत केलें असे. तुवा प्रजा आणून पेठ मजकूरची कीर्दी मामुरी करणें. तुझे सिरी सेरणी होन २० रास ठेविली आसेती.

पे, द. ३१ ले. २१ } (२५९३) { श. १५७६ ज्येष्ठ व. १२
सु. १०५५ रजब २६ } { इ. १६५४ जून २

मोजे कोंढे कर्यात मावळ तर्फ खडकवासले परगणे पुणा येथील हकदारांचे हक्क व गांव निमवत खर्च यांचा तपशील.

एपि. कर्ना. १० कोलार १९३ } (२५९४) { श. १५७६ आश्वीन व. ५.
जय संवत्सर अश्विन वद्य ५ } { १६५४ आक्टो. २०

(मुद्दुवाडी येथील मालसमुद्र (Mallasandra) तळ्याच्या मोरीवरील शिलालेख)

इ. स. १६५४ सालीं कोलाल (Kolala) येथील संभोजी राजे यांचे प्रतिनिधि कनय्याजपंत (Kanayajapant) यांनी चंदय्या तंवरहल्ली डेपगौडा यास मुद्दुवाडी मालसमुद्र तळ्या जवळील शेत बक्षिस दिले. व यास बाळाजी पंडितराव यांनीं तो तलाव बांधण्याची व जमीन देण्याबद्दल परवानगी दिली.

सं. सा. खं. १ ले. १३६ } (२५९५) { श. १५७६ मार्ग. शु. ७
सु. १०५५ सफर ६ } { इ. १६५४ डिसें. ६

महाराज शाहाजी राजे—कारकून परगणे पुणें.

मौजे न्हावी परगणे मजकूर मुकासा प्रचडराऊ रवा आहे. याचे हुदेदारे मशारइलेस लिहिले मौजे मजकुरामध्यें व मोजे पिंपरीमधे सिंवेचा करकसा.

होता. त्यास मौजे मजकुरी खान जैनखान पीरजादे यांच्या मुकाश्यात निवाडा केला तेणेंप्रमाणे हरदो मवाजाचे मोकदम व रयेती समजोनु कयला तोडला. हालीं मागती पिंपरीचा मोकदम न्हावींसी तसवीस देतो तरी हुजूर माहाराज साहेबास सांगोनु ताकीद पाठविली पाहिजे. तरी पेशजीचे सिवेचा अमल फारीक जाला असता हाली कैफती करावयास त्याची काये अंदाजा आहे. हरकती करील त्यास ताकीद करणें. पिंपरीच्या कजियाने न्हावी खराब पडली आहे तरी तुम्ही खुर्दखत पाहाताच हरदोजणास बोलाघुनु खान जैनाखान येहीं निवडिले प्रमाणे वर्तवणे. याउपरी फिर्यादी येऊं न देणे.

| | | |
|---|---|---|
| भा. मित्र. वर्ष ७ अं. १० | (२५९६)<br>गोवेंदसर | श. १५७६ पौष शु. ९<br>इ. १६५५ जाने. ६ |

सिनोर कपितान कोंट रेवदंडें माहावतस्यार असार सिनोर अजी अलीखान विरादर हवालदार समत तल कोकणे अज्याम मनुवेल मुराद अंकी कितावती पाठविली लिहिलें कीं गोवेहुनु पूर्वीजाहा पादरींने लेहेन पाठविले आहे कीं चेऊलचे हिंदुलोक दरियामधें अंघोली करितांती व नारळ टाकीतांती व अदमी सोल्तो करितांती ते. करूं न देणें म्हणौनु लिहिलें. तरी याचें उत्तर आम्ही गोवेयास लिहिलें आहे. तेथून जबावे येईतलगे लोकांस मना कर्णे म्हणौनु त्यात लिहिलें. तरी हे कोण गोस्टी आहे? तुम्ही आपले तर्फेस हरयेकसे अमल करिता. असा चेऊलींचें व × वाजे जागांचे हिंदू लोक कदीमपाद्दन दरियामधें अंघोली करितांती व नारळ टाकीतांती व अदमी सोल्त करितांती व ते सरहद्दी आमची चे(ऊलची) आहे. येसें असोनु हाली तुही नवीन किरच्या (गो)स्टी लिहिता हे दुरूस नाहीं. तुम्हास मालूम आहे कीं, आमचे पाचस्यामधें व गोवियामधें फितरत लागली हे × × × हजरती साहेबीं दिल घालून सला केला येसा जे तुम्ही आमचे तर्फेस येसा कसूर करिता तर याकारितां कुव्हर आसालिया कुलि वादनामी तुम्हावर येण्हार. आम्ही सालावाद्प्रमाणें चालवणार दराज लिहिण नलगे.

| | | |
|---|---|---|
| सा. ४ ले. ७२२<br>सु. १०५५ | (२५९७) | श. १५७६ माघ व. १२<br>इ. १६५५ फेब्रु. २३ |

अंबाजी राजे घोरपडे—खल्लोजी राजे तथा तुकोजी घोरपडे.

भाडलेचे पाटीलकी करितां काढलेले २०० होन व तपे वाल्वेची देशमुखी सोडविण्याकारितां काढलेले ६०० एकूण ८००. पैकी तिसरे वाटणीचे जें हिसेव होत असेल ते द्रव्य पाठवून देणें. तुम्हास मिरासीची जरूर नसलेस तसे लिहिणे. उभयतां बंधू पर मुलखांत जाऊन समाधाने असत नाही तरी तसे न करणें.

सा. ३ ले. ६३५ }
सु. १०५५ }

(२५९८)

{ श. १५७६
{ इ. १६५४-१६५५

मोजे राहाटवडे तर्फ खेडेबारे येथील मोकदमीच्या तर्फा दोन. चिटोजी व क़ान्होजी. कान्होजीतर्फेची लावणी होईना. मग दादाजीपंती ती तर्फ दिवाणात घातली. यामुळे चिटोजी परागंदा जाला होता. पुढें बापूजी मुद्गल देशकुलकर्णी यानी कौल देवबून चिटोजीस गावावरी आणिला व चिटोजीने कान्होजीचे कर्ज वारिले. त्याजबद्दल कान्होजीच्या दोन तकसिमापैकी एक चिटोजीस दिला. चिटोजीने एकूण तीन तक्सिमा खाव्या. वडीलपण चिटोजीकडे. हे मोडील तो दिवाणींचा गुन्हेगार व गोताचा खोटा.

सा. ५ ले. ७७१ }

(२५९९)

{ श. १५७६ ?
{ इ. १६५४

हतलोट व पारघाट या दोन्ही घाटी वतनदार डागी व पतकी व हतलोटकर यास रखवालीबदल हक दर बैलास रुका करून चंद्रराऊ यानी दिल्हा. डागी पतकी यांस हतलोट व पारघाट दर बैली हक रुके २ भुसाचे व मिठाचे गोनीस व दळचे गोनीस ३ व केणे, तबाखू गडींद यास ६ व कापडवगी रु. ·।· व काबळे बोझे ९ याखेरीज बाजे जिनस जकाती माफीक हक घावा. याखेरीज पारघाटी श्रीवरदाइनीस दर बैलास १ रुका घावी. मेटकरी पारघाटी ठेविले ते दिवानचे चाकर तेच तळयाचे मेटकरी दोघासहि हक नाहीं व गुघाडचे मेटकरी बहुळकर यानी रखवालीबदल दर बैली १ येणेप्रमाणे पुरातन चालत आले आहे या खेरीज कोन्ही हकदार नाही.

सा.४ले.७२३ }

२६००
कौलनामा

{ श. १५७६ नंतर ?
{ इ. १६५४

—रविल्लोजी राजे घोरपडे

तुम्ही सांगितल्याप्रमाणे आणखी फिरंगी व तुरा दिला. खलदेव व तुमचे भाऊ तुकोजी राजेसी अकरेहे घोडेसी मोकरर करून त्यास मोकासा व तश्रीफ सिरनावसीची २०० होनू दिले असा कौल मरहामत केला असे. तुमचे भाउसी समाधान करून सांवाती घेऊन येईजे.

सा.३ ले. ५५३ }
सु. १०५५ }

(२६०१)

{ श.१५७६
{ इ. १६५४

शिवाजी राजे—कारकून परगणे इंदापूर.

मोरेश्वर गोसावी यास चावर दोनी काझड व सेलगों येथील इनाम आहेत. हलीं त्यास त्याची कीर्दी सेवत नाही. तरी ते तुम्हीं कीर्दी करणे आणि दो

चावराचा सारा देहाये मजकूर जैसा आहे तेणेप्रमाणे नक्त व तूप, परगणे मजकुं-राहून देवणे, पुढच्या सालापासून जे त्या चावराचे येईल ते देणें. चावराचे रकमेचे बेरजेसी पुरवणी पाहिजे असेल ते महसूलपैकीं देवणें. ह्माडा करून देत जाणे.

पे.द. ३१ले.२२ } (२६०२) { श. १५७६
सु. १०५५ } { इ. १६५४।५५

रा. शाहाजाराजे...संभाजी मोहिते सरहवालदार व कारकून परगणे सुपे.

संभाजी काटे देशमुख परगणे सुपे हुजूर मालूम केले जे, साहेबी सामराजाचे व आमचे भाऊबद याच्या वतनाचे तह करून दिले होते तेणेप्रमाणें वर्तत नाहीत. सोइरी व इसफखान गरगशा करितात. तरी तेणे प्रमाणे न वर्तावयास काय अंदाज आहे.

सा. ३ ले. ५८० } (२६०३) { श. १५७७ चैत्र शु. १०
सु. १०५५ जखर ७ } { इ. १६५५ एप्रील ५

सर्जाराऊ कान्होजी राजे जेधे माहालीदार } —— { परसोजी पाटील मोकदम मौजे विंग परगणे पुणें.

मौजे मजकुरी आमची वरात होन ८८ आहे. पैकीं हवाला होन ५ केला. बाकी होन ३८ राहिले. तियाबद्दल मिया हवालदार पाठविला आहे. ह्माडा करुनिया यापासीं (देणें). आबासाहेब सुपा आहेती. एक वडेचे ढ्रिंग न कीजे.

पे.द. ३१ ले. २३ } (२६०४) { श. १५७७ वैशा.शु.११
स. १०५५ रजबु ९ } खुर्दखत { इ. १६५५ मे ६

जेनाखान पीरजादे सरहावालदार परगणे पुणे...हुदेदार मोकदम.

रा. मोरोबा गोसावी सेकीन चिंचवड यास इनाम दर सवाद देहाये परगणे मजकूर सदरहू प्रमाणे फर्माने, खुर्दखते ( निजामशहा, मलिकअंबर, हैबतखान, रुस्तमजमा ) कारकीर्दी दरकारकीर्दी चालत आले आहे. ते तमाम गुमशुद जाली. भोगवटा तसरुफाती जाली आहे व हालीहि चालते. आमा भोगवटियाबदल सदरहू कागदाचा उजूर दूर करून खुर्दखत मन्हामती केले पाहिजे; दरिवाब सरजाम होये मालूम जाले. तरी सदरहु इनाम देखलि महसूल व नख्तयाती व पायेपोसी व खर्चपटी (इ. ११ पट्या) व हाल पेस्तर नवी बाब होईल ते व पाडेवार व वेठी बेगारी व फर्मासी व सेवसवजे कुलबाब कुलेकानू दुमाले करणे.

फा. सा. खंड २ ले. २२ } (२६०५) { श.१५७७ कार्तिक व. १
सु. १०५६ हि. १०६६ मोहरम १५ } { इ. १६५५ नोव्हेंबर ४

—केदारजी खोपडा देसमुख तपे उत्रवली, किले रोहिडा.

तुमचे वेरीसदार खंडोजी [ पाठीवर* ] खोपडा हरामखोरी करुन विलायेती खराब करीत आहे व तुम्ही हकलवाजिमा व इनाम खाउनू विलायेती मामूर करणे बाबे तकसीर कर्णे बरे नव्हे. जरी दुसरेने विलायेतीचे फिर्याद हुजूर पावलिया तुमचे देशमुख ( खी ) दुसरेसी मऱ्हामत होईल. तुम्ही किले मजकुरीचे हवालदाराचे रजा व तलबेमधे असोन हरामखोरासी गोस्माल बवाजिबी दीजे. दरी बाब ताकीद: कुर्ली जाणिजे.

सा. ४ ले. ७२७ } (२६०६) { श. १५७७
{ इ. १६५५.

बाजीराव घोरपडे—चीरंजीवबा दादासाहेब.

आम्हास नवावसाहेबानी प्रगने राजनी, कंवसडी व बाळूर येथें जागिरा दिघल्या. सनदा घेऊन वासुदेवपंत येत आहेत व आम्हीही अनखी, जागिरीचे परवाने घेऊन सत्वर येतो.

फा. सा. खं. २ ले. २३ } (२६०७) { श. १५७७ ते ८१
{ इ.१६५५–५९

केदारजी बिन नरसोजी खोपडे देसाई तपे उत्रोली किले रोहिडा—खानसाहेब.

या नीच मनुष्यास ९ जण भाऊबंद आहेत. पैकीं मी थोरल्या घरचा वडील आहे. निशाणी नांगर माझा आहे. त्याप्रमाणें सालाबाद चालूं आहे. भाऊबंदांना त्यांची तकसीम दिलेली आहे. मजकडे वडीलकीची जी तकसीम आलेली आहे, ती खाऊन चाकरी करतों व विलायत मामूर करून कारभार चालूं ठेवतों. सध्यां सीदी अअजम सीदी हसन हवालदार हा अधिकारांत दखल करीत आहे. तो वरील नऊ भाऊबंदांपैकीं खंडोजी बिन धर्मोजी खोपडे याचा पाठ पुरावा करतो. आणि तो शहाजी भोसले याचा मुलगा शिवाजी याज़कडील नामझाद बरोबर घेऊन माझें इनाम गांव अंबेवडें याजवर चालून आला. तेव्हां त्यानें माझें घर व गांव तमाम ताराज केलें. रयतेपैकीं तिघांस जिवें मारून दहाबारांस जखमी केलें आणि अगणित लूट घेऊन तो गेला. गुरांचा चारा व सर्व गांव जळून गेलें. सर्व विलायत खराब झाली. हा बंदा स्वतः व आपले मुलगे यांना घेऊन जीव वाचविण्यासाठीं पळून गेला. इतका जुलूम झाला कीं, शेतकीचीं अवजारेंहि शिलक

उरली नाहींत. शिवाजी वझीरजवळ चार हजार स्वार आहेत. आणि हा गरीब गांवापाठीमागील दहावीस मनुष्यांनिशीं काय करणार? विलायतीमध्यें सर्वत्र जुलूम होत आहे. मी विनंति करतों कीं, सध्यां येथील हवालदारी नरसिंगराव सदोबा वजी यास मुकरर झाली आहे. या गरीबानें त्याची भेट घेतली आणि स्वतःचे मुतालीक कारभारासाठीं देऊन हा विलायत मामूर करीत आहे. मजकडून हैलालखोरी व मामूरी या बाबतींत कसूर होणार नाहीं. सध्यां खंडोजीनें स्वतःचीं दोन माणसें हुजूर पाठविलीं आहेत. तीं जो कांहीं गैरवाका मुखवचनें करून सांगतील तें सर्व खोटें आहे. खंडोजी जेथें जेथें हजर होईल तेथें तेथें हा गरीब हजर होईल व जो निकाल होईल त्यास हा गरीब राजी आहे. साहेब न्याय देणार समर्थ आहेत.

म्है. ऑ. रि. १९२३ पृ. ४५ } (२६०८) {
प्लव भाद्रपद वद्य ३ }

राजमान्य राजश्री संवाजीराज साहेब—च्यांलिसि: जाविरण तुम्हास १००३ खंडीची कोरड बाहू जमीन दिली आहे.

पे. द. ३१ ले. २५ } (२६०९) { श.१५७८ चैत्र शु. २
हि. १०३६ जसर १ } { इ. १६५६ मार्च १८

नवाब मुरसुतकुलीखान......मुतसद्दीयान मोकदम, माहाजन सेटे परगणे हवेली सरकार जुन्नर व पुरे व तरफा १७ देह तपशील जेल देहे ३५१८.

वस्तबेग फौजदार हुजूर जाहीर केले की जाखोजी वलद हरजी हाडे देसमुख दौलतखा व मर्दे तरतुदी आहे व राया हियासी रजाबंद आहे. जरी देसमुखी तर्फ हवेली वगैरे तर्फ १७ यास मोकरर होये तरी ज्याजती आबादानी व मामुरी व हासील करील म्हणौन जाखोजी मजकुराची दौलतख्वाईवरी व रयेतीचे रजामंदीवरी देसमुखी हवेली तर्फ १७ मशारनिलेस इस्तकबील बरोबर तपसील जमीन इस्तकबाल फसल खरिफ पेचील व रबी होईल सन १०६६ मशारनिले खजमतीस मुकेद होऊन आज करार वाके व रास्ती सरंजाम करीत जाणे.

[ ह्यांतील संवाजी हा शिवाजी राजांचा थोरला भाऊ जो संभाजी राजा तो मानिला तर त्याचा मृत्यु श. १५७८ ( इ. १६५६ ) शकांतील अनन्दामुळें हा पूर्वीचा प्लव संवत्सर धरून लेखाचें वर्ष काढलें पाहिजे. व तसें केल्यास श. १५२३ ( इ. १६०१ ) हें वर्ष येतें. पण तें मानणें कठीण आहे. ]

फा. सा. खं. १ ले. ६० } (२६१२) { श. १५७८ मार्गशीर्ष वद्य १०
हि. १०६७ सफर २४ } { इ. १६५६ डिसेंबर १

२ रा अली आदिलशाह—रौलोजी घोरपडे.

या वेळीं दरबाराच्या भेटीस येण्याच्या हेतूविषयींचा त्याचा अर्ज सिंहासनाच्या पायापाशीं उभे राहणाऱ्याकडून येऊन पोहोंचला. त्यांत लिहिलें आहे कीं, 'स्वतः दरबारचा जुना सेवक आहे व बेरोझगार आहे. तसेंच कोणत्याही ठिकाणचा मोकासा किंवा तालुका नाहीं.' हा अर्थ आम्हांस समजला. तेव्हां तो फार पसंत पडला. आतां तुम्ही सर्व बाजूंनीं संतुष्ट राहून तावडतोब कर्नाटकचा सुभेदार खान मुहंम्मद याचा मुलगा मुहंम्मद इख्लासखान यांजपाशीं जाऊन बादशाही मसलतींत शरीक ( सामील ) व्हावें. तेथें पोहोंचल्यावर जमेतीच्या अनुरूप अशा जागीरीच्या कृपेनें उत्कर्ष होईल.

फा. सा. खं. १ ले. २ } (२६१३) { श. १५७८ ?
जरुर ३ } { इ. १६५६

( ५ व ६ ) परेली किल्ल्याच्या इमारतीच्या दरवाजाचा पाया, ३ जमादिलाखर या तारखेस तयार झाला. आदिलशाही रेहान यानें काम केलें.

भो. ऐ. व. म. पृ. १५ ख } (२६१४) { श. १५७८
दुर्मुख संवत्सर शु. १०५६ } { इ. १६५६

सुलतान मुहम्मद याच्या कारकीर्दींत वरील सालीं विठल मुद्गल हा रोहिडा किल्ल्याचा हवालदार होता.

रौप्यपट श. } (२६१५) { श. १५७९ वैशाख शु. १२
} अनागोंदी रौप्यपट { इ. १६५७ एप्रील १५

राजेश्री तिरुमल राये गोसावी यासि श्री महाराजाधिराज राज परमेश्वर श्रीवीर प्रताप श्रीवीर-सिवाजी राजे कृतानेक विज्ञापना तुमचे वडील राजेश्री श्रीरंग राय्याणी राज्य अन्याक्रांत होऊन परस्थळी देवाधीन जाहल्याकडून पुढे तुमचे संवरक्षण व्हावें याबदल मातोश्री तिमाजेमा याणी तुम्हास व रामराये उभयेतास व्यंकट कृष्णापा वकील यास समागमे देऊन अम्हापासी पाठविले. त्याजवरून सर्व मार अवगत होऊन तद्नुसार तुमचे संवरक्षणबदल तालुक मार करुन दिल्हे ता.

१ संवस्थान विद्यानगर आनीगुंदी

| | |
|---|---|
| १ गंगावती पा | १ होसूर संमत |
| १ कपली समत | १ ब्रड समत |
| १ कामनापुर समत | १ दरोजी समत |
| १ तमलकोट पा | १ आणरावी अंतणेर लोक समत |

येणेप्रमाणे स्थल तुम्हास सुकूर्द करून देविल असे. तरी तुम्ही आचेंद्रार्क वंशपरंपर अनभव करून श्री स्वामीचे क्षत्री तुंगभद्रास्थान देव्रता सेवा धर्म इत्यादि करून घेऊन सुखरूप राहतेस करावे. या धर्मास कोणी अंतर केलिया अपले कुलस्वामी गुरूच शफत आहे जाणिजे छ १० माहे जमादिलावल सु॥ समान खमसैन अलफ हेमलंबी संवछर वैशाख सु॥ १२ शके शालीवाहन १५७९ रुजु.*

फरूकीकृत औरंगजेब चरित्र पृ. ३५४ आदबमधील उतारा. { (१६१६) {श. १५७९ वैशाख {इ. १६५७ एप्रील

औरंगजेब—(मोगल अधिकारी).

शाहूच्या मुलानें (शिवाजीनें) या दरबारकडे एका वकीलामार्फत असें विनंतिपत्र पाठविलें आहे कीं "विजापूरकरांच्या मुलखापैकीं जो मीत माझ्या ताब्यांत आहे तो मजकडे ठेऊन मला जर मनसब देण्यांत येईल तर राजनिष्ठा व आज्ञाधारकत्व यास अनुसरून तो मीत मी बादशाही राज्यांस देईन." या पत्रास मी जें उत्तर पाठविलें आहे त्यांत कांहीं अटी लिहिल्या आहेत व शाहूसहि (= शहाजीस) याविषयीं कळविलें आहे. (शिवाजीकडून) उत्तर आलें ह्मणजे मी तुम्हांस कळवीन. त्यानें माझ्या हुकमांतील अटी मान्य केल्या तर ठीक आहे. नाहींतर आमचीं सैन्यें त्याला तुडवून टाकतील (trample him).

शेडगांवकर बखर पृ. २ सु. १०६७ ? जिल्हेज १३ } (२६१७) {श. १५७९ भाद्र. शु. १५ {इ. १६५७ सप्टं. १२

रा. बाबाजी भोसले—

तुम्ही आपली खातरजमा राखोन जमीयत घेऊन आम्हापासी येणे. जे जमीयत आणाल त्या शिपाई स्वारास दोन हजार रुपये खर्चास देविले आहे. तेणेप्रमाणे तुमचे मनसुबीची सरंजामी करून सातारा येथे येणें.

सं. सा. खं. १ ले. ११६ सु. १०५८ जिल्हेज १४ { (२६१८) महजर {श. १५७९ भाद्रपद वद्य १ {इ. १६५७ सप्टेंबर १३

बोपदेवभट सेकीन जुनेर व काळंभट व नारायण भट गवादे येही लिहून दिघले ऐसीजे जुनरीचे उपाध्येपण आपले बाप व आजा व पणजा तोवरी उपाध्येपण खातो. ऐसियास त्रिंबकभट व हरभट गवादे आपणासी भांडताती. तरी

[*हा रोख्यपट, 'सोर्सेस ऑफ विजयनगर हिस्ट्री' या आपल्या ग्रंथांत श्री.कृष्ण-स्वामी आय्यंगार ह्यांनीं पृ. ३१२ वरील पाद टीपेंत जयन्ती रामय्या पंतलु या तेलंग सद्गृहस्थांच्या जवळील म्हणून म्हटलें आहे.]

दुकालापासुनी व राजिकापासुनी अलीकडे झगडताती परी आपले बापे व पणजे यानी यास वाटा दिधला नाहीं व याचे बापासीहि दिधलें नाहीं.

त्रिंबकभट गबादे इही लिहून दिधले जे जुनरीचे उपाध्येपण आपण व आपला बाप आजा व पणजा हाली आपण वरिसे चालीस ४० खाद आलो आहे [ यापुढें निरनिराळ्या साक्षीदारांच्या साक्षी आहेत. ]

| | | |
|---|---|---|
| सा. ३ ले. ४५७<br>सु. ३०५८ रुमाल २ | (२६१९) | श. १५७९ मार्ग. शु. ४<br>इ. १६५७ नोव्हें. २९ |

नबाब काहारतलबखान—सैद दाउद सेखदार व कारकून परगणे अकोले.

येकोजी मोकदम सोली मजकूर याचे बाबे देसपांडे यावरावरी लेहोन पाठऊनु तेणेप्रमाणे आमल करणे. व बाबींचे पैके रावोजी देसपांडियावरावरी पाठविले ती आपल्या हुजूर जाउजी देशमुख यांच्या हवाला करणे रु. २० करा होनु ६. देशपांडे याचा कथला आहे तरी ते शहरचा एक हक सालमजकूरचा अमानत करणे. पेस्तर अम्हीं येऊन खातिरेसी अणौउनू ज्याचा त्यास देऊं. रसमीं गुरवीन कसबे धारफलचे रु. २० व नूतन रु. ३ ह. सात त्याची ताकीद बहुत आहे. हारीफ व रबिपैकीं तहसील करून अमानत ठेवणे.

| | | |
|---|---|---|
| सा. ३ ले. ६३१<br>सु. १०५८ | (२६२०) | श. १५७९ मार्ग. व. १३<br>इ. १६५७ डिसें. २३ |

आलोजी बिन जसोजीराव मुसलमान कांदाटकर व तानाजी बिन चंद्रोजी. चंद्रोजी कांदाटकर व धारोजीराव कांदाटकर या उभयेतामध्यें मौजे सालोसीचे पटेलगीबाबे गरगसा बाव्हाजी, दौलतराव व येसाजी सुरराव चंद्राराव हे तीन कारकीर्द भांडत होते. यावर सिवाजीराजेसाहेबास जावली अर्जी झाली मग बामणोली येथें रव्याबदल सदर जाली. आलोजीराव जसोजीराव हा दिव्यीं उतरला. टाळी पिटली; तानाजीराव यानें सालोजी हारविली. लेकरालेकरी तुटली.

| | | |
|---|---|---|
| सनदापत्रें पृ. १४९-१५१<br>भा.इ.सं.मं.इ.१८३७पृ.१६७ | (२६२१) | श. १५७९<br>इ. १६५७ |

सत्यवचनीं शिवाजी—औरंगजेब.

प्रारब्धयोगानें हुजूरून निरोपाशिवाय आलों. परंतु यथायोग्य सेवेचे संप्रदायांत हजर आहे. ती चांगली सेवा व उत्तम प्रयत्न हिंदुस्थान व इराण व तुराण व रूम व शाम येथील बादशहा व उमराव मोगल व राजे लोक व राणे यांस व खेरीज सात मुलुखाचे रहाणार व खुषकी व तरी येथील मुशाफर यांस

जाहीर आहेत. त्यापेक्षां आपलें अंतःकरण समुद्राप्रमाणें आहे त्यासहि विदित जाहलेंच असेल. याजकरता कित्येक गोष्टी ज्यांत आबालवृद्धांचें कल्याण राही अशा लिहिल्या जातात. सांप्रत आम्ही इकडे आल्यावर पादशाही खजिना रिकामा जाहला व सारें द्रव्य खर्च जालें. याजकारितां हिंदु लोकांपासून जजिया पट्टीचें द्रव्य उत्पन्न करून पादशहातीचा क्रम चालविला आहे ऐसे ऐकण्यांत आलें. त्यांस पूर्वी अकबर बादशहा याणी न्यायानें बावन्न वर्षे राज्य केलें. याजमुळें इसवी व दाउदी व महमदी वगैरे याती खेरीज ब्राह्मण व शेवडे वगैरे हिंदु लोक यांचे धर्म चांगले चालले व त्यां धर्माचे संस्थांपनाविषयीं ते बादशाही मदत ठेवीत होते याजकरतां जगतगुरु अशी त्यांची प्रसिद्धी जाहली व अशा सद्वासनेच्या योगाने हरएक स्थळी त्यांची नजर पडत होती तेथे यश येत होतें व कित्येक मुलूख सर केले. त्याजवर नुरुद्दीन जहांगीर बादशहा याणी बावीस वर्षे बादशाही ईश्वरीं लक्ष ठेऊन केली नंतर स्वर्गास पोहोंचले. शहाजहानसाहेब किरान याणी बत्तीस वर्षे बादशहात करून उपरांत राहिले. आयुष्य चांगलेपणांत घालून निरंतर कीर्ति मिळविली. येविषयीं दृष्टान्त जो पुरुष जिवंत असतांना लौकिकवान व मागे ज्यांची चांगली कीर्ति असा जो त्यांजला अचल लक्ष्मी प्राप्त जाहली असें आहे. सदरी लिहिले पादशाहाचा प्रताप व पराक्रम असा त्याणी दस्तुर व वहिवाटी केल्या. त्यांचें रक्षण करण्यास अलमगीर फिकिरबंद जाहले. ते बादशाहाहि जजियापट्टी घेण्यास समर्थ होते. परंतु सारे लहानमोठ आपलाले धर्मावर आहेत ते सर्व ईश्वराचे आहेत, असें जाणून कोणावर जुलूम करावा हें त्यांनी मनांत आणिले नाहीं. त्यांचे उपकाराची कीर्ति अद्याप आहे व हरएक लहानमोठे यांचे मुखी त्यांची स्तुती व आशीर्वाद आहे. जशी नियेत तशी त्यास बरकत. त्या बादशाहांची दृष्टी लोकांचे कल्याणांत होती. हली आपले कारकीर्दीत कित्येक किले व मुलूख गेले व बाकी राहिले तेहि जातात. कारण जे खराबी करण्याविषयीं कमतर नाहीं. जे रयत लोक खराब आहेत. हरएक महालाचे उत्पन्न लाखास एक हजार येणे कठीण असें जाहलें. बादशहा व बादशहाजादे यांचे घरीं दारिद्र्याचा वास जाहला. तेव्हां पदरचे मनसबदार व उमराव यांची अवस्था कळतच आहे. सारांश, शिपाई लोक हैराण, व सवदागर पुकारा करतात व मुसलमान रडतात, हिंदुलोक मनांत जळतात आणि कित्येक लोकांस पोटास मिळत नाहीं असें आहे. तेव्हां राज्य चालविणें कसें? त्यांजवर जजिया पट्टीचा उपद्रव या प्रकारचा. तो पूर्व पश्चिमेपावेतों जाहीर जाहला आहे कीं, हिंदुस्थानचे पातशाहा फकीर व ब्राह्मण व शेवडे व जोगी व संन्यासी व वैरागी व अनाथ गरीब व थकलेले व पडलेले असे एकंदर लोकांपासून जजिया घेतात व यांतच पुरुषार्थ असे समजतात. व तेमुर पातशाहाचें नांव बुडवितात असें जाहलें आहे. अस्मानी किताब म्हणजे कुराण. ते ईश्वराची वाणी आहे. त्यांत आज्ञा केली तीं

ईश्वर जगाचा किंवा मुसलमानांचा आहे. वाईट अथवा चांगले असो, हे दोन्ही ईश्वराचे निर्मित आहेत. कोठें महजीद आहे त्याचें स्मरण करून बांग देतात कोठें देवालय आहे तेथें घंटा वाजवितात. त्यास कोणाचे धर्मास विरोध करणें हें आपले धर्मापासून सुटणें व ईश्वराचें लिहिले रद्द करून त्याजवर दोष ठेवणें आहे. याविषयीं चांगले अगर वाईट जें पाहावें त्यास रद्द करूं नये. पदार्थाची निंदा करणें हें पदार्थ करणारावर शब्द ठेवणें आहे. न्यायाचे मार्गानें पाहतां जजिया पट्टीचा कायदा केवळ गैर. पेशजी मुलतान अहमद गुजराथी हा असाच गैर-चालीनें वागला तो लवकरच बुडाला. त्यास या वृद्धापकाळीं असें बद्ध होणें हें पराक्रमास अगदीं योग्य नाहीं. येविषयीं दृष्टांत जुलूम ज्याजवर जाला त्याणे खेद करून हायहाय म्हणून मुखानें धूर काढल्यास त्या धुरानें जितके लवकर जळेल तितकें जलदीनें जळतां अग्नीहि संमधास जाळणार नाहीं. अंतकरण पातकानें मलिन जालें तें स्वच्छ करावें ही चांगली सल्ला आहे. याजवर हिंदु लोकांस पीडा करण्यांतच धर्म आहे असें मनामधें आलें असल्यास आधीं राजा राजसिंग यांजपासून जजिया घ्यावा म्हणजे इकडून कठीण नाहीं. उपरांत सेवेसी हजर आहे. परंतु गरीब अनाथ ते मुंग्याचिलटासारखे आहेत. त्यास उपसर्ग करण्यांत कांहीं मोठेपणा नाहीं. पदरची मंडळीहि पाहतां पाहतां अग्नी तृणानें झाकतात, याचेंहि आश्चर्य वाटतें. अस्तु. राज्याचा सूर्य हा प्रतापाचे उदयाचलापासून तेजस्वी असो. ( हें पत्र शेडगांवकर बखर पृ. १०१-०२ व सरस्वतीमंदीर व. ८ अं. २ मध्येंहि आलें आहे.)

एपि. कर्ना. ९ निळमंगळ ता. ६ ? (२६२२) श. १५७९ इ. १६५७

( लाक्कूर ( Lakkur ) येथील राजा हुसेनसाहेब याच्या शेतांतील शिलालेख. )

इ. स. १६५७ या वर्षी अजरकाखान ( Ajaraka ) [ व ] महाराज श्री शाहुजीराजेसाहेब यानीं लाक्कुर येथील बाहदुर अहमद यास त्याच्या गुणावद्दल जमिनी बक्षीस दिल्या.—चांदखानानें हुकमाप्रमाणें बक्षिसपत्र तयार केले.

फा. सा. खं. २ ले. २६ औरंगजेब जु. १ नंतर (२६२३) श. १५८० ज्येष्ठ शु. २ इ. १६५८ मे २४ नंतर

[ जयसिंग ? ]—केदारजी [ खोपडे ].

केदारजी यानें जाणावें कीं, त्याची चाकरी करणें, दौलतीची सदिच्छा व सेवा यांच्या इरायाची हकिकत नागो पंडित यांनीं समजाविली आणि त्यांनीं ज्या तऱ्हेचे कौल व करार मिळविण्याविषयीं विनविलें तसें लिहून त्यास फर्माविले आहेत. आतां त्यानें खातरजमा ठेवून अशा तऱ्हेनें बादशाही चाकरी करावी कीं, त्याजवर जास्त कृपा होईल. जास्त काय लिहिणे.

शि. सा. सं. ३-११

सा. ३ ले. ४५८ } (२६२४) { श. १५८० आश्वीन व. २
फ. १०६८ मोहरम १४ } { इ. १६५८ आक्टो. २

—मोकदमानी देहाये कसबे राजूर परगणें आकोले.

गोविंद देशपांडे कसबे मजकूर याचा हक फसली १०६८–१०६९ जो चालत आला आहे तेणेप्रमाणे त्याच्या दुमाला कीजे. घोडोबास अद्‌वखानी खाखिली होता फर्जंद हाजीर नव्हता म्हणून केसो त्रिमल लेहाया पाठविला होता. यावरी याच्या याचे दुमाला केले.

सा. ३ ले. ६४० } (२६२५) { श. १५८० आश्विन व. १२
सु. १०५९ मोहरम २५ } { इ. १६५८ आक्टो. १३

खंडोजी गरुड पाटील व मानजी जगथाप माली मोकदम मौजें बेलसर कर्यात सासवड यामधे भांडण होतें (अपूर्ण).

सा. ३ ले. ५८३ } (२६२६) { श. १५८० मार्ग. व.१३
शक } { इ. १६५८ डिसें. १२

मलजी करवर मुकाम दिवीची } —— { वाजी सर्जाराऊ देसमूख तर्फ
अठफाडकर कर्याती मानदेस } { रोहिडा.

अत्मसुखे परवतसमर्ध्ये अरवत केला मुदल होनु १० दर माहा दर होनास कलातर रुके ·॥· चोवीस जालिया दिवसा उगवणी करुनु इस्तकबिल भाद्रपद त्रयोदसीस उगवणी करुनु. मुदतीस उगवणी न करूं तरी हडागे देउनु हा कतबा सही.

भारतमित्र व. ८ अं. २ } (२६२७) { श. १५८० पौष व. ५
} उल्लेख { इ. १६५९ जाने. ३

"रामोजी शेणवी कोठारी त्यांची राजकारणांत फार जरूरी असल्यामुळें यांच्याकरतां बाटविण्याचा कायदा लागू नाहीं."

एपि. कर्ना. ५।। वेलूर १२२ } (२६२८) { श. १५८१ वैशाख शु. १५
शक } ताम्रपट { इ. १६५९ एप्रील २६

बेलापुरी येथे श्रीरंगराय राज्य करीत असतां त्यांनीं कुचाचार्य या नांवाच्या ब्राह्मणास कांहीं जमिनी दान दिल्या. ह्या जमिनी बेलूर तालुक्यांतील हलेबीडी गांवांतील होत्या. (बेलूर येथील तामय्याचा पुत्र सामन्ना च्या जवळील ताम्रपट.)

सा. ५ ले. ७६१ } (२६२९) { श. १५८१ आश्विन शु. १२
सु. १०६० मोहरम९ } { इ. १६५९ सप्टेंबर १७

सरसुभा अफजलखान महमदशाही—देशमुख व मोकदम किले रोहिडा. केदारजी खोपडा यास मौजे मोहये कुलबाब दिल्हे आहे. कुलबाब कुलकानू दुमाले कीजे. परवानगी हुजूर.

एपि. कर्ना. ५।१ बेलूर ८० } (२६३०) { श. १५८१ कार्तिक शु. १५
शक . } ताम्रपट { इ. १६५९ आक्टो. २०

गोपाळराज यांचे चिरंजीव, अर्वेती रामराज यांचे नातू, राजाधिराज श्रीरंगराय देव यांनीं कार्तिक पौर्णिमा श.१५८१ या दिवशीं रंगभट्ट व गिरीभट्ट या ब्राह्मणांना तगरनाड येथील कंद्रावर हें खेडें दान दिलें. श्रीरंगराय हे आत्रेय गोत्री, यजुस् शाखी व आपस्तंब सुत्री होते. बेलापुरांतील केशवाचे ते नित्य पूजा करीत असत. (बेलूर येथील कद्देदासाचार्य यांच्या ताब्यांतील ताम्रपट).

भारतमित्र व. २ अं. ८ } (२६३१) {
} उल्लेख {

"त्याचप्रमाणें रामोजी शेणवी कोठारी हे जात आहेत. त्यांच्या ठिकाणीं पोर्तुगीज साम्राज्याबद्दल अतिशय प्रेम असून ते विश्वास ठेवण्यास सर्वस्वी पात्र आहेत. त्यांना विजापूर दरबारांतील मोठमोठ्या अमीरउमरावांची ओळख असून ते आमच्या वतीनें तेथें दुभाष्याचें काम करतील. बहुतेक वेळां ते गेलेआले असल्यामुळें चालू कार्यांत त्यांचा फार उपयोग होईल. बिघडलेला तह कुशलतेनें पुनः जुळवून आणण्यास ते मदत करतील."

भारतमित्र व. ८ अं. २ } (२६३२) { श. १५८१ पौष शु. १५
} उल्लेख { इ. १६५९ डिसें. १८

व्हाइसराय, गोंवा—पोर्तुगालचा राजा.

रामोजी शेणवी कोठारी हे गेले आहेत. हा ब्राह्मण इतका विश्वासू आहे कीं, ज्या ज्या कामगिरीवर त्याची नेमणूक होईल ती ती सरकारची कामगिरी तो अतिशय कळकळीनें बजावीत असतो. तो डिचोलीसच राहात असतो. लढाईच्या वेळीं तर तो पाद्री गोंसालु मार्तिंश यांच्याबरोबर कर्नाटकांत गेला होता. तत्कालीन व्हाइसरायांनीं त्यांना विजापुरांत पाठविलें असतां त्यांनीं आपली कामगिरी फार चांगली बजाविलेली आहे.

सा. ५ ले. ७१७ } (२६३३) { श. १५८१ माघ शु. २
सु. १०६० जवल १ } { इ. १६६० जानेवारी ४

दिवाण कर्यातीहाये परगणे माण—मोकदम हिंगणवाडी संमत बारावाडी.

रताजी माने देसमुख कसबे मजकूर आम्हास मसलतीस शरीक जाले. म्हणौनु इनामवाडी मजकूर दिधली असे. देखील महसूल व नख्तयाती कुलबाब कुलकानू दुमाले कीजे, अवलाद अफलाद चालविजे.

सा. ४ ले. ६८८
शु. १०६० हि. १०७० जबल २ } (२६३४) फर्मान { श. १५८१ माघ शुद्ध ३
इ. १६६० जानेवारी ५

अली आदिलशाह—विठोजी हैबतराव देसाई किले मूरबगर ( राजगड ).

सय्यद् अबदुल्ला बिन सय्यद् मुहम्मद् देसाई किले रोहिडा यानें विनंती केली कीं, निजामशाही व इतर मुल्लूख शापित शिवाजी स्वतःच्या ताब्यांत आणून जबरदस्ती चालवीत आहे. आपण जुने मिरासदार आहो. कृपादृष्टी करून विठोजीकडे त्याचें जुनें इनाम व इतर चालूं ठेवावीं; म्हणजे तो जमाव करून शापितानें काबीज केलेली विलायत बादशाही कब्जात आणून दौलतीशीं निष्ठा दाखवील. विनंती मनास आणतां तांभारें, जांभळी, हतवें व मोहरी हीं गांवें व इतर इनाम पूर्वीप्रमाणें त्याजकडे व त्याच्या वंशजाकडे चालू ठेवण्याचा हुकूम दिला आहे. तरी त्यानें सर्व तऱ्हेनें विश्वास ठेवून जमाव करून शापितानें घेतलेला मुल्लूख बादशाही कबजांत आणावा आणि बादशाहावरील निष्ठा व सादिच्छा प्रत्ययास आणावी. त्यांची व्यक्तता झाल्यावर शाश्वत कृपा केली जाईल यांबाबत कौल आहे.

एपि. कर्ना. ९ चन्नपट्टण २६
शक विकारी } (२६३५) { श. १५८१ माघ शु. १०
इ. १६६० जानेवारी ११

( नागोहल्ली येथील गावाच्या कुसाजवळील शिलालेख. )

शक माघ शु. दशमी १५८१ या दिवशीं राजाधिराज खावन-साह-अय्या ( Khāvana-Sahōo-ayya ) यांनीं चन्नपट्टण तालुक्यांतील नागवल्ली हें गांव सिद्धलिंग गौड यास दिलें.

फा. सा. खं. २ ले. ११
शु. १०६० हि. १०७० जबल २१ } (२६३६) { श. १५८१ माघ वद्य ३०
इ. १६६० जानेवारी ३१

२ रा अली आदिलशाह—

मिन्जलह शाह हवालदार व कारकून मामले मुहम्मदपूर.

पारथन्दी, मुरगोर व कोन्वनाकम हीं गांवें पूर्वी कृष्णाजी बिन अंबाजी घोरफोडे आदिलशाही यांजकडे होतीं. सध्यां तीं सरसरे नौबत अअतबारखान याजकडे अमानत आहेत. आतां तीं मशारनिल्हेकडे पूर्वीप्रमाणें चालूं करावी.

इतिवृत्त १८३४ पृ. १३७ } २६३७ { श. १५८२ नंतर
इ. १६६०

अहमदाबाद उर्फ पाटोदे येथील देशपांडेपण मूळचे बयाजी नरसिंह यांचें. तो मयत जाहालियावरी तिमाजी बायदेऊ देशपांडेपण करीत असतां मुल्क खराब व वैरान जहाला. बहुत लोक मेले; दुकालामध्यें दौलताबादेस फत्तेखान, फर्जद मलिकंबर, राजे चालवीत असता सुरूखान परगणे मजकूर येऊन तिमाजीस कामाबद्दल धरून दौलताबादेस नेला, मारो लागले, मारांत मयत जाहाला. तिमाजीचा सापत्न भाऊ कृष्णाजी आगरियाकडे काकाजी दुतो मोहबतखानाकडे गेला तिकडे गेला. त्यावरी रंगोजी पटवारी चाटोरीकर परगणे गुलसनाबाद हा पैदा जाहला व म्हणो लागला कीं, आपणास कृष्णाजीनें निमे देशपांडेपण विकिले आहे. यावरी सैद अबदुल्लशाह याची जागीर तगीर होऊन कजीलबाशखान यास जागीर जाली. ते वेळीं कृष्णाजी आला. मग मगोराम अमीन सुबे दखन व मीर हुमीखान येही मुनसफी मनास आणिली. कृष्णाजी बोलिला आपणापासून कागद लेहून घेतला पण रुका दिधला नाहीं. मग रंगोजीस कैद करून कृष्णाजीस देशपांडेपण दिले. कृष्णाजी स. १०६५ मध्यें (श. १५७७ इ. १६५५) फौत जाहालियावरी रंगोजीनें साजीश करून देशपांडेगिरी चालवूं लागला. पण बिसाजीराम हा कृष्णाजीचा अफराद वारस हा खरा. रंगोजीचा भाऊ फतेखानाचा दिवाण होता. सोनाजी देशमूख म्हणतो आपण त्याचे बंदीत होतो तेव्हां आपण नागर करून दिला; नांगर न करतो तर तिमाजी बंदीखान्यांत मयत जाला तैसेंच आपण होतो. हे तकरीर.

फा. सा. खं. २ ले. २४ } (२६३८) { श. १५८२ चैत्र शु. ८
सु. १०६० हिं. १०७० रजब ७ } { इ. १६६० मार्च ९

२ रा अली आदिलशहा—देसाई किले रोहिडा.

केदारजी नायक खोपडे देसाई किले मजकूर यानें दरबारास विनंति केली कीं, मौजे नेर व पळसोसी हीं गांवें, भागवडी येथील कंकुमियांच्या बाबतींतील पांच बिघे (टांक?) व चार बिघे पासोडी आणि पालियान मौजांतील पांच बिघे कामत व किले मजकूरच्या वेगारीचा रावता येवढ्याची मजवर कृपा करावी. म्हणजे सलाबतखानाबरोबर पादशाही मसलत करीन. विनंति मनास आणून वरील गोष्टी हक्कांसुद्धां इनाम दिल्या आहेत. त्यानें योग्य चाकरी करून दाखवावी.

फा. सा. खं. २ ले. ३४ } (२६३९) { श. १५८२ चैत्र शुद्ध
सु. १०६० हि. १०७० रजब ७ } { इ. १६६० मार्च ९

२ रा अली आदिलशाह—देसाई परगणे पुणें.

गोंदाजी पासलकर देसाई तपे मुसेखोरे परगणे मजकूर यानें दरबारास विनंति केली कीं, मौजे सायतन हा गांव आणि मौजे वरसगाव व मौजे जांबळ तपे मजकूर येथील अनुक्रमें शंभर व ऐंशी बिघे शेरी जमीन मजकडे पूर्वीच्य भोगोट्याप्रमाणें इनाम मिळण्याची कृपा व्हावी. म्हणजे स्वतः सलाबतखानाबरोब खरी मसलत व चाकरी करीन. विनंति मनास आणून वरील बाबी देसाई मजकुरास वंशपरेनें इनाम दिल्या आहेत. त्या चालवाव्या.

सा. ५ ले. ७८६ } (२६४०) { श. १५८२ चैत्र वद्य ६
सु. १०६० रजब २० } { इ. १६६० मार्च २२

मोरो त्रिमल—नागोजी नाईक जेधे देशमूख तर्फ रोहिडखोरे.

सिवजी नाईक जेधे याचा व तुमचा तह गुढेदुर्गी साहेबी निवाडा करून दिधला तेणेप्रमाणें हे व तुम्ही वर्तणूक करीत जाणे. जोवरी सर्जाराऊ येत तोवरी तुम्हीं काही करकर न वाढविणे.

फा. सा. खं. २ ले. २५ } (२६४१) { श. १५८२ चैत्र वद्य ६
सु. १०६० रजब २० } कौलनामा { इ. १६६० मार्च २२

? —केदारजी नाईक खोपडे देसाई किले रोहिडा आणि महालोमहालींचे इतर देशमूख.

दरी वक्त सैद अबदुला मालूम करिता तुमचे हलालखोरी रोशन जाहले. गनिमाचे निसबतीचे लोक विलायेतीमधे जागा जागा असतील त्यासी अवघे दस्त करून हुजूर पाठविजे. त्याचे जिणजितरुब तुम्हासी जे सांपडेल ते तुम्हासी माफ असे. तुम्हासी हे कामावरून बहुत सरफराजी होईल.

सा. ४ ले. ७१२ } (२६४२) { श. १५८२ वैशाख शु. ७
सु. १०६० शाबान ५ } खुर्दखत { इ. १६६० एप्रील ६

दिवाण ठाणा कर्यातीहाये परगणे माण दाहिगाऊ—

कारकुनानि व देसमुखानी कर्याती म्हेसवड व संमत बारा वाडिया परगणे मजकूर.

सिवाजी भोसले फितरतीमधे पातशाही मसलहत शेरीग होऊन गनिमासी ग्ताजी माने देसाई यांनी गोशमाल (शिक्षा) दिल्ही. अर्जी सबब देसाई यास दरबज इनाम मौजे हिंगणी बदल तैनाती पालखी मरहामत केले असे. कुलबाब व कुलकानू चालविजे.

फा. सा. खं. १ } (२६४३) { श. १५८२ अ. ज्येष्ठ शु. १५
ले. २३ सु. १०६० } { इ. १६६० मे १४
हि. १०७० रमजान १४ }

२ रा अली आदिलशाह—अधिकारी व देसाई परगणे कोल्हापूर.

रामकृष्ण नारायण यानें दरबारास विनंति केली कीं "कोल्हापूर परगण्याचा देशकुलकर्णी मयत झाला व त्याला कोणी वारस राहिले नाहींत. बऱ्याच दिवसांपासून रुद्राजी कोन्हेरी अंबेटकर व चौंडो नरसिंह कुळकर्णी कसबे कोल्हापूर यांनीं गैरवारस असून देशकुलकर्णाचा तावा घेतला आहे. कृपादृष्टी करून सदरहू कुळकर्ण त्यावरील हक्कांसह मला बहाल करावी व शिवाय वेवळूज येथील पाऊण विवा जमीनीच्या बक्षिशीचें फर्मान करून यावें. म्हणजे मी रयतेस दिलासा देऊन या परगण्याची लावणी संचणी करण्याची खटपट करीन." तरी सदरहू परगण्याच्या देशकुळकर्णाची मिरास वर सांगितलेल्या अटींवर रामकृष्ण नारायण यास इनाम देण्याची कृपा केली आहे. तेव्हां सदरहू कुळकर्ण रामकृष्ण नारायण याच्या ताब्यांत यावें व चालूं ठेवावें. तसेंच देशकुळकर्ण दिल्याबद्दल घ्यावयाची शेरणीहि माफ केली आहे.

एपि. कर्ना. वेलूर १९६ ५।१ } (२६४४) { श. १५८२ ज्येष्ठ शु. १५
शक } ताम्रपट { इ. १६६० जून १३

घानगिरी ( Ghanagiri ) येथें श्रीरंगराय राज्य करीत असताना त्यांनीं ज्येष्ट शु. १५ श. १५८२ या दिवशीं एकंबर सोमयाजी या नांवाच्या ब्राह्मणास कचिहल्ली गाव दिले. सदरहू गाव वेलूर तालुक्यांतील बदरनाड गावाजवळ आहे. ( लिंगपूर येथील सुर्यनारायणावधानी यांच्याजवळील ताम्रपट )

फा. सा. खं. १ ले. ६७ } २६४५ { श. १५८२ आषाढ वद्य २
सु. १०६१ जिल्काद १५ } { इ. १६६० जुलै १४

सय्यद मख्दूम शर्झाखान—कारकून व देशमूख पर्गणे वाई.

वाई येथील रायाजी नरसिंह थिटे याच्या बाबतींत मालोजी राजे घोरपडे यांनीं माहीत केलें कीं, हा जुना वतनदार असल्यामुळें यास या ठाण्याची हशमनवीसी यावी म्हणजे तो स्वतःचा निर्वाह करील. तरी या ठाण्याच्या पूर्वीच्या हशमनविसास दूर करून रायाजी नरसिंह थिटे यास मुकरर करावें. हल्लींचे मिरासी नायकवाडी व हशमांची कचेरी यांसह १० माणसें आणि एक मशालजी नेमून देऊन पूर्वीच्या हशमनविसाची तैनात यास यावी. यापुढें नेहमीं नोकरी करून घेऊन रोजमुरा देत जावा. तसेंच तैनातीचे हशम नेमणें व त्यांच्या गरजा भागविणें हें काम करवून घेऊन वंशपरंपरेनें या ठाण्याची नौकरी घेत जावी.

एपि. कर्ना. ९ चन्नपट्टण ६८ | (२६४६) | श. १५८२ भाद्रपद शु. २
शक १५८२ प्लव | | इ. १६६० आगस्ट २७

( बेव्हुर ( Bevûru ) येथील तिमप्पान्ना ( Timmappana beetta ) मधील डोंगरावरील शिलालेख. )

भाद्रपद शु. द्वितीया श. १५८२ या दिवशीं दुंडोजी हैपतीराय, बाळोजी हैपतीराय याचा मुलगा, यानें बेहूर ( Bevur ) डोंगरावरील व्यंकटेश्वराच्या सेवेकरितां हा स्तंभ उभारिला. ( बांधविला ). [शकाचा आंकडा गत आहे. १५८२ स शार्वरी सं येतो.]

सा. ५ ले. ७६१ | (२६४७) | श. १५८२ भाद्र. शु.८
सु. १०६१ मोहरम ६ | | इ. १६६० सप्टेंबर २

रा. सिवाजी राजे—कान्होजी जेधे देशमुख तर्फ भोर किले रोहिडा. दिसाचे व रात्रीचेहि तैसेच १५।२० वेग होतात लिहिले तरी औसध घेऊन शरिरासी आरोग्य होई ते करणे. ईश्वराचे कृपेकरून बरेच होईल. तुम्ही लिहिले की आपले मूल ६ जन व देशमुखी साहेवाच्या पायापासी आहे साभाल केला पाहिजे. तरी आता नवे लिहिणे काय लागले. पहिलेच पासून तुम्हा आम्हात घरोबा आहे. बेथा वरी जालियावरी मूल व स्वार पाठविणे. बेथा वरी होय तोवरी आपल्याजवळ असो देणे. बेथा वरी होये ते करणे.

एपि. कर्ना. ५।१ बेलूर ८१ | (२६४८) ताम्रपट | श. १५८२ कार्तिक शु. १५
शक | | इ. १६६० नोवें. ६

( बेलूर येथील कट्टेदासाचार्य यांच्याजवळील ताम्रपट. )

वेलापुरी येथे श्रीरंगराय राज्य करीत असताना त्यांनीं शके १५८२ कार्तिक शु. १५ या दिवशी रघुनाथाचार्य या ब्राह्मणास एक जमीन दान दिली. ही जमीन बेलूर तालुक्यांतील तगरनाड गावांतील होती.

एपि. कर्ना. ५।१ बेलूर ८२ | २६४९ | श. १५८२ कार्तिक शु. १५
शक | | इ. १६६० नवंबर ६

कार्तिक पौर्णिमा श. १५८२ या दिवशीं चंद्रग्रहणाचे वेळीं राजाधिराज श्रीरंगराय यांनीं व्यंकटाचार्य नांवाच्या ब्राह्मणाला नौलिहाली या गांवांतील एक जमीन दान दिली. (बेलूर येथील कट्टेदासाचार्य यांच्याजवळील ताम्रपट.)

सा. ३ ले. ५८४ } २६५० { श. १५८२ मार्ग व. ७
सु. १०६१ रवर २० } { इ. १६६० डिसें. १४

रावो बलाल नामजाद महालनिहाय—

सोमाजी विष्णू हवालदार व कारकून तपे रोहिडखोरे.

कान्होजी जेधे निमे देशमुख रोहिडे याचे देसील इनामती व किरकोळ हक्क व गावखडी मिळोनु मोजना टके ५ हजार आहे. येसियास यापासून इनामती खडणी पेशजी गडकरी दरसाल होनु ३० घेत होते. साहेबाचे कारकीर्दीसहि जैसे काही सालाबाद चालले असेल तेणेप्रमाणें चालवणें नवे न करणें. ते साहेबाचेच चाकर लोक आहेती. बरकड त्याचा हुमाला करणें.

फा. सा. खं. १ ले. ४ } (२६५१) { श. १५८२ फाल्गुन शुद्ध ३
औ. ज़ु. ३ रजब १ } { इ. १६६१ फेब्रुवारी २१

औरंगजेब—जबाबदार अधिकारी.

खानदेश सुभ्यांतील रावेर व आदिलाबाद परगण्याची देशमुखी, देशपांडकी व कानूनगोई या बाबी दत्ताजी गोपाळ नायक आणि महादेव त्रिलोचनपाल यांजकडे मुकर्रर होती. पैकीं महादेव मेला. त्यास वारस नव्हता. फक्त २।३ विधवा होत्या. महादेवाच्या हिश्शाची अदिलबाद परगण्यांतील वरील कामें अमीरुल उमराच्या विनंतीप्रमाणें नारोजी यशवंतराव याजकडे फर्माविलीं आहेत. आणि त्याच्या हिश्याचीं रावेर परगण्यांतील वरील कामें, गावोगावचे लाजिमे व इनामें, आणि असीरगढ परगण्यांतील वडोदें गांवीं असलेली त्याची बाग या बाबी दत्ताजी गोपाळ याजकडे दिल्या आहेत. दोघांनींहि याबद्दल पेशकश देण्याचें कबूल केलें असल्यानें विधवांकडून (महादेवाकडून) यावयाचे ३५४३॥ रु. त्यांस माफ केले आहेत.

फा. सा. खं. १ ले. २४ सु. १०६१ } (२६५२) { श. १५८२ फाल्गुन शुद्ध ७
हि. १०७१ रजब ५ } { इ. १६६१ फेब्रुवारी २५

२ रा अली आदिलशाह—

वर्तमान व भावी अधिकारी व देसाई परगणे कोल्हापूर.

रामकृष्ण नारायण, देशकुळकर्णी परगणे कोल्हापूर, यानें विनंति केली कीं, "या परगण्याचें देशकुळकर्ण त्यावरील हक्कांसह व अर्धा चावर जमीन इनाम म्हणून मजकडे चालूं आहे. हल्लीं या परगण्याचे मोकाशी अडथळा करून हक्क-लवाजिम्यांचा वसूल करूं देत नाहींत. हक्क वसूल करण्याबद्दल मला फर्मान मिळावें." तरी रामकृष्ण नारायण यास अर्धा चावर जमीन व इतर हक्क व लवाजिमे इनाम दिले आहेत. त्यास ते भोगूं यावे.

शि. सा सं. ३-१२

एपि. कर्ना. १० कोलार १७६ } (२६५३) { श. १५८२ / इ. १६६०

( गोतेहल्ली ( Gottehalli ) येथील सोनेगौडाच्या शेतांतील शिलालेख ).

इ. स. १६६० सालीं संभाजी राजे यांनीं अकलडरस (Akaladarasa) च्या अंत्राजी पंडीत यास शेत बक्षिस दिलें.

सा. ३ ले. ४५९ / फ. १०७१ सावान २५ } (२६५४) { श. १५८३ चैत्र व. ११ / इ. १६६१ एप्रिल १५

चत्रोजी राजे—कारकून व देशमुख परगणे अकोले.

तुबाजी गंगाधर देसपांडिया परगणे मजकूर हुजूर मालूम केले जे आपले देसपांडेपण करोसी दर करोसी चालत आहे. हली धोंडो गोविंद नाहक करकशा करतो. तरी पेसजी धोंडो येऊन खुर्दखत नेले आहे. त्यावरी नव जाणे तुम्ही आपणा हुजूर रयेता बोलाऊनू खातिरेसीं आणुनू ज्यास रयेती राजी असेली व जो वेतनदार असेली त्याचे दुमाले करणे.

फा. सा. खं. १ ले. २५ सु. १०७१ / हि. १०७१ जिल्हेज २३ } (२६५५) { श. १५८३ श्रावण वद्य १० / इ. १६६१ आगष्ट ९

२ रा अली आदिल शाह—

वर्तमान व भावी अधिकारी व देसाई परगणे कोल्हापूर.

रामकृष्ण नारायण, देशकुलकर्णी परगणे मजकूर, यानें विनंति केली कीं, " या परगण्याच्या देशकुकलर्णाची मिरास आपल्या फर्मानाप्रमाणें मजकडे चालू आहे. हक्कलवाजिमे व इतर इनाम या विषयीं फर्मान मिळवा. " तरी त्यास हक्कलवाजिमे व इतर बाबी वंशपरंपरेनें भोगूं याव्या.

सा. ५ ले. ७६२ / सु. १०६२ मोहरम २० } (२६५६) { श. १५८३ भाद्र. व. ७ / इ. १६६१ सप्टेंबर ५

रा. शिवाजी राजे–केदारजी नाईक खोपडे देशमुख उतरवली तर्फ रोहिडखोरे.

जे वस्ती अफजलखा साहेबांचे तरफेस आला होता ते वस्ती तुम्ही पेक चजा समजोन गनिमास मिळाले. तयावरी गनिमाचा अमल बरतरफ जाला. याकरिता तुम्ही शक अंदेशा धरून तर्फ मजकुरास न येऊनू आपल्या हकाबदल गावगनास आजार देत आहा. तरी यामधे तुम्ही आपला काये फायेदा समजले आहा. साहेबासीं गैररुजू असावें, हकास खलल करून घ्यावे हे अकल तुम्हास कोणे दिधली. तरी याउपरी कोणे बाबे शक अंदेशा न करून आपल्या वतनास येणे आणि आपले देसमुखीचा इनाम व हक खाऊन खुश हालीनें राहणें.

सा. ३ ले. ४६० } (२६५७) {श. १५८३ पौष शु. १४
फ. १०७१ जवल ११ } दसखत {इ. १६६१ डिसें. २४

रेउजी देशमुख कर्याती राजोरु परगणे आकोले—

तुबाजी गंगाधर व धोंडो गोविंद हे देशपांडेपणावद्दल करकसा करितातीं. सदरहूची हकिकती खातिरेसीं आणिली सनदापत्राहि मनासि आणिलिया. यावरी आपणास बोलाउनु फर्माविले कीं, देशपांडेपण कोणाचें ? तरी बेदरी पातशाही होती तधी बालाजी माडका त्याची मिरासीचें कुलकर्ण, तो निपुत्रिक होता. तो आपल्या दादियाचा सासरा तेणें आपलिया आजीपासी दिल्हे. यावरी आपलिया वडिलास नागवण पडली. दिवाणातून खंड जाला त्यानिमित्य लखोजीस देशपांडेपण विकलें.

सा. ३ ले. ४६१ } (२६५८) {श. १५८३ पौष शुद्ध १५
फ. १०७१ जवल १२ } {इ. १६६१ डिसेंबर २५

—सेख अली फत्ते परगणे अकोले.

तुबाजी गंगाधर व धोंडो गोविंद देशपांडेपणाबद्दल करकसा करितात. तुम्ही बुढे पिरीमर्द आहा. तुम्हास सवगद आहे जे हकहिसाबी जे ते जाहीर करने. तरी माजी अमल दक्षनी जागीर याकुद्खानास होती. त्याचा सेरदार दत्ताजी माहाली होता. तव याचा झगडा पाहिले रगोजी धोंडोजीचा चुलता देशपांडेपण करीत होता त्यामधे कान्होजी तुबाजीच्या भावामधे करकसा जाला. रगोजीचे कुल कागद हुजूर आनिले. त्या सनदात गफलत केलिया रगोजी मजकुरास अदबखानास राखिले. मोगलाईमधे कारतलबखान तेहीं अमानत....

फा. सा. खं. १ ले. २६ सु. १०६२ } (२६५९) {श. १५८३ फाल्गुन वद्य २
हि. १०७२ रजब १५ } {इ. १६६२ फेब्रुवारी २५

२ रा अली आदिलशाह—फाजल अफजलखान मुहम्मदशाही हवालदार व मुहम्मद मुलकी ठाणेदार व कारकून किले परळी.

मौजे बोरगांव परगणे बार्ड येथील कुळकर्णी नारो विश्वनाथ, यानें दरबारास विनंति केली कीं, “ मौजे कामेरी किल्ले परळी येथील अर्धा चावर जमीन आदिलशाही अंबाजी घोरपडे याच्या खुर्दखताप्रमाणें इनाम म्हणून मजकडे चालूं आहे. आपलें फर्मान मिळावें. ” तरी सदरहू जमीन तीवरील हक्कांसुद्धां उपर्युक्त गृहस्थास इनाम देण्याची कृपा केली आहे. ती जमीन त्याचे ताब्यांत देऊन त्याजकडे चालूं ठेवावी.

एपि. कर्ना. अर्कलगड ५।११८३ } (२६६०) } श. १५८३ फाल्गुन व. ३०
शक } शिलालेख } इ. १६६२ मार्च १०

राजाधिराज श्रीरंगरायांच्या कारकीर्दींत त्यांचे प्रतिनिधी वेंकटाद्री नायक-कृष्णाप्पा नायकाचा पुत्र, वेंकटाद्री नायकाचा नातु, कृष्णाप्पाचा पणतु-यांनीं कांहीं ब्राह्मणांना जमीन दिल्याबद्दल शिलालेख लिहून दिला. वरील दान सूर्य-ग्रहणाचे वेळीं देण्यांत आले. गांवाचे नांव विजयाट होतें. विजिगट्ट येथील अंजनेयाच्या देवालयांतील शिलालेख.

सा. ३ ले. ४६२ { (२६६१) { श. १५८३
फ. १०७१ } } इ. १६६१-६२

रखमाजी जाखदेऊ कुलकर्णी मौजे भोजापूर परगणे आकोलें—
तुंबाजीपंत देसपांडे संत.

तुम्ही मौजे मजकूर अमिनाबराबरी आले यावरी तुम्ही आपले कागद भेंडाले १ व गाथोडे लहान १ त्यात तुमचे मिरासीचे कागद होते ते गोविंद धोंडो येऊन आपले सुणेपासून नेले. तुमचे तुम्हास दिधले.

एपि. कर्ना. १० सिद्लघाट ४७ } (२६६२) { श. १५८४ चैत्र शुद्ध ५
शुभकृत संवत्सर चैत्र शु. ५ } { इ. १६६२ मार्च १४

शुभकृत संवत्सरे चैत्र शुद्ध पंचमी या दिवशीं व्यंकोजी राजे यांच्या कारकीर्दींत राहदुर्ग ( Rahadurga ) चा हवालदार बारणजी-राय ( Baranaji-Raia ) यानें तिमाप्पा सिमंगल चिकदेवाचा पुत्र यास ( Nettera-kodige ) बक्षिस दिले. (तालदुमनहल्ली ( Taladumanahalli ) येथील अंदल्ली ( Andaralli ) मराप्पा याच्या शेतातील शिलालेख ).

फा. सा. सं. १ ले. ११९ } (२६६३) { श. १५८४ श्रावण शुद्ध ६
सु. १०६३ जिल्हेज ५ } { इ. १६६२ जुलै १३

—रजपुतानी देशमुख तर्फ रोहिडखोरे.

पंताजी पंडित अंबोडा आहेत. तेथे रायाजी देशमुख व पंडित मशारइलमधे कलागती जाली ते वख्तीं त्या पोराने मशारइलेवर चालोन येऊन बेअदबी केली. तरी हे तुम्हास कैसे सहले? तुम्ही लाहान लोकीं त्यासी बेअदबी केली. तरी साहेबांची खेशी ठावकीच आहे. साहेब तमाम रजपुतांचे पायी बेडिया घालुन गलां तोग घालुन किलें राजगडा वरी ठेउनू धोंडे वाहवितील. पंडित मशारइले साहेबाचे जागी समजोनू अदब बरखुद राखत जाणे.

फा. सा. खं. २ ले. १२ } (२६६४) { श. १५८४ पौष वद्य २
सु. १०६३ हि. १०७३ जवल १५ } { इ. १६६२ डिसेंबर १७

२ रा अली आदिलशाह—फाजिल अफजलखान मुहम्मदशाही हवालदार अहमदखान ठाणेदार व कारकून किल्ले चंदन.

मौजे आरवाडें व मौजे अनेवाडी किल्ले चंदन हीं गांवें खंडोजी व बाजी व अंबाजी व कृष्णाजी घोरफोडे आदिलशाही यांजकडे किल्ले मजकूरच्या हशमांची व्यवस्था, डागडुजी व दारूगोळा यासाठीं चालू होतीं. आतां तीं त्यांस इनाम दिलीं आहेत. चालवावीं.

सा. ३ ले. ४६३ } (२६६५) { श. १५८४ माघ शु. ८
सु. १०७२ जखर ७ } { इ. १६६३ जाने. ७

जसजी, माणकोजी, कृष्णाजी देसमूख—

तुवाजी गंगाधर देसपांडिये कर्याती राजोरु परगणे अकोले.

तुमचे देसपांडियेपण कर्याती राजोरीचें मिरासी आहे. येसियासी तुम्हास देसमुखी व मोकदमी व रयेतीनें राजिनामा लेहोनु दिधला. यावरी गोविंद धोंडो दरबारास जाउनु परवाना घेऊन आला तरी हाली रयेतीनें आपणास राजिनामा लेहोनु दिधला आहे. यावरी गोही करणे असें म्हटले म्हणून आपण गोही केली. पण तेणे आपली अकल चोरून राजिनामेयावरी आपली सही घेतली ती रद असे.

फा. सा. खं. १ ले. ६८ } (२६६६) { श. १५८४ माघ वद्य १२
सु. १०६३ जखर २५ } { इ. १६६३ जानेवारी २५

२ रा अली आदिलशाह—.........

या वेळीं काजी शाह अबू तुराब बिन शाह अबुल हसन, वाई व कुडाळ या परगण्यांचा धर्माधिकारी यानें दरबारास विनंति केली कीं, 'अफजलखान मर्हूम........यांनीं तजवीज केली कीं, शहराच्या कोटा जवळ धर्माधिकाऱ्याचीं घरें आहेत तीं तेथून उठवून दूर करावीं. घरें बांधण्यासाठीं शहरांतील जमिनीचा एक तुकडा व शिवाय शक्करबिर्वाजवळ असलेली १५ बिघे बागायत जमीन, आंबा, डाळिंब व इतर झाडें यासह हदमहदूद करून दिली होती. उपर्युक्त खानांनीं स्वतः त्या जमीनीवर...बांधिली आणि कोणीही कधींहि अडथळा करणार नाहीं असें केलें. उपर्युक्त जमीन काजीच्या हवाला केली आहे. उपर्युक्त काजीनें घरें बांधून खुशाल रहावें अशी व्यवस्था केली. तशा प्रकारचें खुर्दखत आहे. तेव्हां फर्मान मिळावें' तरी मरहूम अफजलखान याच्या खुर्दखताप्रमाणें काजी शाह अबू तराब यास वरील जमीन आंबा, डाळिंब व इतर झाडें आणि पाटाचें पाणी यासह दिली आहे. ताब्यांत यावी.

सा. ४ ले. ७१७ (२६६७) श. १५८४ ? इ. १६६२

चंद्रराउ मारून सिवाजीने जाउली घेतली. कृष्णाजी बाबाजी सुभेदार नेमिला व विरो राम यांस मजमू दिल्ही. त्यानें डागी पतकी यावरी सालसमधी पासोडी १ कावळ १ येकून दोन सणगे व हकदार हक घाटी दर बैली श्री वरदाईनी रुका ०१ व डागीपतकी रुके ०२ दोन, व हतलोटकर यास दर बैली रुका ०१ व गुथाडी बहुलेकर यास दर बैली रुका येक सालाबाज चालत आहे. त्याप्रमाणें चाकरी करून हक घेत जाणे येसे हुकूम केला. सुभेदार मजकूर कोकणात नामदार खान मोगलाकडून आला त्यावरी हशमबराबरी देऊन राजेसाहेबी रवाना केले. मिरी डोगरी युध्य जाले तेथे कृस्णाजी सुभेदार पडिले...

सा. ३ ले. ५५२ (२६६८) श. १५८४ ? इ. १६६२

शिवाजी राजे———वे. रा. मोरेश्वर गोसावी.

दंडवत. तुम्ही पत्र पाठविले ते आसीर्वादपूर्वक वचन लिहिली ते कलो समाधान जाले. वृत्तीस कांहीं विक्षेप पडिला म्हणोन लिहिले. तरी येथें वर्तमान कळले नाहीं. मोरोपंत प्रधान यासी पत्र लिहिले असे. ते चालवितील अंतर पडणार नाहीं. जाणिजे.

सा. ३ ले. ६७४ सु. १०६३ रमजान ५ (२६६९) श. १५८५ चैत्र शु. ७ इ. १६६३ एप्रील ४

आनंदराव मुतालीक देशमुख व विसाजी रंगनाथ कुलकर्णी व समस्त माहानाड पेठ इंदापूर ———रताजी माने देशमुख व समस्त मोकदम कसबे म्हसवड.

आमच्या थलास तिमाजी विठल व सिवाजी हिरदेऊ केसकर व बेजाजी बापजी येजुरवेदी परगणे माण आठा कर्यातीच्या देस-कुलकर्णाच्या वादाबदल आले. उभयताबद्दल सडी मागविल्या. करिने घेतले. केसकर खरे, माधेजन यासी मिरासीसी संबंध नाही. यजुरवेदी मुतालीक. असे असता होनाजी बाबाजी व उद्धाजीपंत येलापुरकर येजुरवेदी येऊन हाकीमखान द्रव्य खर्चून गोतास नेऊन यजुरवेदी याने कागद करून घेतला कळोंव.

सा. ५ ले. ७४४ } शक } (२६७०) { श. १५८५ चैत्र { इ. १६६३ एप्रील

......शास्ताखान दिल्लीहून स्वारी करून आले. खासा राजमहालात येऊन राहिले. ते समयी थोरले महाराज जातीनशी राजगडाहून रात्रीस धारकरी लोक पायउतारा घेऊन रंगमहालात प्रवेश करून गर्दी केली. तेवेळेस कोयाजी बांदल याणे मोगलाचे लोकावर वार केले; त्यासही चार वार लागले. याकरिता महाराज कृपाळू होऊन मौजे आलंदेस नूतन इनाम जमीन रकम कास टके १७॥ दिल्हे.

एपि. कर्ना. १० कोलार २१९ } शक } (२६७१) { श. १५८५ वैशाख शु. ५ { इ. १६६३ मे १

शके १५८५ वैशाख शु. पंचमी दिवशी राजाधिराज राजश्री संभाजी राजेसाहेब यांनीं अलमबिगिरी टिप्पीसेट्टी ( Alambigri, Tippi Setti ) व वारनासी चेनगौडा यांस त्यांनीं कोलाल तालुक्यातील होलारचा जुना तलाव दुरुस्त केला म्हणून त्या तळ्याजवळील भाताची ६ ( Khandugas ) जमीन बक्षिस दिली.

( होलूर येथील बंड ( Bund ) तळ्याखालील पंचागी नांवाच्या पाणथळ जमिनीच्या जवळचा शिलालेख. )

एपि. कर्ना. ५।१ हसन ४० } शक } (२६७२) ताम्रपट { श. १५८५ वैशाख शु. १५ { इ. १६६३ मे १२

( वन्नुरपुरा येथील दोड्डा भल्लारीभट्ट यांचा पुत्र शामभट्ट यांच्या जवळील ताम्रपट. )

घानगिरी ( Ghangiri ) येथें श्रीरंगराय राज्य करीत असतां त्यांनीं वैशाख शु. १५ श. १५८५ या दिवशी श्रीनिवासय्या याचा पुत्र अनय, श्रीवत्सगोत्री या ब्राह्मणास वासुदेव नाहल्ली नांवाचे गाव दिलें. सदरहू गांव बेलूर तालुक्यांतील होते. बेलापुरी येथील विष्णु समुद्राच्या तीरावर भगवान चन्नकेशवाच्या समोर वेंकट चलपतीच्या भक्तीकरितां सदरहू दान देण्यांत आले.

फा. सा. खं. १ ले. २७ } हि. १०७४ मोहरम ८ } (२६७३) { श. १५८५ श्रावण शुद्ध ९ { इ. १६६३ आगस्ट २

२ रा अली आदिलशाह—राव अमीनराव.

अमीनराव यांनीं जाणावें कीं, शर्जाखान सरहद्दार शहर अहसनाबाद ( कुलवर्गा ) याच्या सांगण्यावरून शहराची तयारी ( इस्तअदाद ) व मौप (=

यासाठीं हुजूरकडून ८५० होनांची थैली पाठविली आहे. तरी हा पैसा व पूर्वी त्या खात्यावर जमा असलेला पैसा, तसेंच मदत व मौप या निमित्त या शहराकडे लावून दिलेल्या दोन गावांमधून झालेला वसूल यांचा अहवाल अब्दुल मुहम्मद याजकडे पाठवून द्यावा.

सा. ३ ले. ६६७ } सु. १०६४ }      (२६७४)      { श. १५८५ { इ. १६६३–६४

दिवाण ठाणा इंदापूर—मोकदम व रया मौजे वायेवडे परगणे मजकूर

काजी अबन वलद काजी हाफीज यास इनाम मलिक अंबरपासून मसीदी-बद्दल इनाम ( ले. २४७६ प्रो ) असे. मलिक अंबर फौत जाहाल्यावरी आपणास भोगवटा जाहला नाही. तरी साहिवी मेहरबान होऊन इनाम दुमाला केले असे चालविजे.

सा. ३ ले. ६६८ } सु. १०६४ }      (२६७५)      { श. १५८५ { इ. १६६३–६४

नबाब हिलालखान—कारकून परगणे इंदापूर.

काजी अबन हाफीज सेकीन कसबे मजकूर यास इनाम ले. २४७६ प्रो आहे. दरम्यान सिवाजी भोसल्याचे कारकीर्दीत भोगवटा जाला नाही. हाली परगणे मजकूर साहेवास जागीर अर्जानी जाला आहे. तरी ग्जा की उजूर न करता चालवीजे.

सा. ४ ले. ६८७ जिल्काद } सु. १०६४ }      (२६७६)      { श. १६८५।८६ ज्येष्ठ { इ.१६६३।६४ मे–जून

कृष्णाजी काळभोर देशमुख परगणे पुणा—राजेश्री चिंतामण गोसावी देवस्वामी.

परगणे मजकूरची देशमुखी श. १५८४ मधे आपणास स्वामीच्या चरण प्रसादेकरून प्राप्त झाली. नबाबसाहेबी फर्मानहि करून दिधला. मौजे चिंचवडी व रायेवेती व गावखडी येथील देशमुखीचा हक दुमाला पडतो. तेणेप्रमाणें दो गावच्या मोकदमास कागद दिल्हे.

सा. ३ ले. ६६६ } (२६७७) { श. १५८५ माघ शु. १
सु. १०६४ जमर २९ } { इ. १६६४ जाने. १९

दिवाण ठाणे कसबा इंदापूर—मोकदम कसबे इंदापूर परगणे मजकूर. सेतखास फरास मुजावर मशीद कसबे मजकूर यास चावर १ व मोईन चौत्रे जोरी ८८॥॰ व रोजिना तेल आडसेरी इनाम असे. दरम्यान सिवाजी राजे भोसलियाचे कारकीर्दीस भोगवटा झाला नाही. हली परगणे मजकूर साहेबास जागीर अर्जानी जाली आहे. तरी खुर्दखत की, भोगवटा जाला नाहीं याचा उज्र न करतां सदरहू इनाम चालवणे.

इपि. कर्ना. ५।१ मांजराबाद २१ } (२६७८) { श. १५८६ आषाढ शु. ५
शक } { इ. १६६४ जून १८

शके १५८६ आशाढ शु. ५ या दिवशीं श्रीरंगराय यांनीं मलालींचे गौड परुव (Paruve) गौड व इतर याना बसवनाहली दिली. (बसवनहळ्ळी येथील बसव देवालयाजवळील शिलालेख.)

सा. ३ ले. ४६४ } (२६७९) { श. १५८६ श्रावण शु. १
शक } { इ. १६६४ जुलै १४

भिउजी देशमुख व मुधाजी नायक लोणेकर—?

नाउजी देसमुखास तुबाजीपंती जहर देऊनु उमेद खोजा सेकदार होता त्याचे अमली मारिले असे. सवबाजी व येसाजी सात्वरचोर्लीस बोलले. ते तहकीक करता सवबाजी बोलिले हिरोजी आपणासी बोलला. हिरोजसि पुसता उत्तर दिधिले आपण काही या गोस्टी बोललो नाही.

सा. ३ ले. ४३९ } (२६८०) { श. १५८६ श्रावण शु. १०
सु. १०६५ मोहरम ८ व शक } महजर { इ. १६६४ आगष्ट २२

बाबूजी पाटील बिन रतनोजी नाईक देसमूख—
सूर्याजी बिन तुबाजी नाईक देसमूख परगणे कुडाळ.

आम्हास महाराज रा. सिवाजी राजे भोसले यानी दस्त करून वासिटिया किल्यावर केदसा ठेविले. मग आपले बावामुलेलोकीं मध्यौवर्ती पडून करारती बाधले. त्यास कसबे बाउधाणचे हरसेटी सेटिया व आणिक तिघ जण जमान जाहले. दिवाणनफराई करावे म्हणऊन गावास आलो. करारतीचे पैसे जबर, उगुलातीस जागा नाही, म्हणऊन आपले बापभावास आपली तकसीम विकितो म्हणऊन पुसिले. त्यावरी ज्यासी टाकले तो घेणे नेटके. तरी कसबे कुडालास येऊन तुम्हास दर बिघेस एक होनुप्रमाणें माझी १५ बिघे जमीन विकत दिल्हे कसबे मजकुरीचे मिलगाचे व पेठेचा व बाजे आमचे तकसिमेचे हककानु घेऊन तुम्हास जमीन दिल्हे. लेकराचे लेकरी सुखे खाणें.

सा. ३ ले. ४६६ }
फ. १०७४ रखर १ } (२६८१) { श. १५८६ कार्तिक शु. २
{ इ. १६६४ आक्टो. ११

—तर्फदार व देसमूख व देसपांडिये परगणे अकोले व मोकदम रया देहाये मजकूर.

इजारदारासी इजारा सायेर आहे. हजारा पथक कसबे राजूर वेरीज ४०८ हरबाजी तुवाजीस इजारदारी गुता केला आहे. तो वसूल करील. तरी कसबे मजकुरीची कमावीस हरबाजीचे हवाले करणे. पेशजीप्रमाणे अमल करणे.

फा. सा. खं. १ ले. ७४ }
सु. १०६५ हि. १०७५ रखर ९ } (२६८२) {श. १५८६ कार्तिक शुद्ध १०
{इ. १६६४ आक्टोबर १९

२ रा अली आदिलशाह—राय नायक देसाई ठाणें बीदरी.

मौजे नागनूर हा गांव खुर्शीद खानुम साहिबा इजकडे चालूं आहे. तुम्ही या गांवास प्रत्येक बावतींत त्रास देतां व ८ गाई बैल घेऊन गेला. यामुळें या गांवची रयत परागंदा झाली आहे व होत आहे. हा गांव खुर्शीद खानुम साहिबाच्या ताब्यांत असतां तुम्हीं असें करावें हें केवढें धार्ष्ट्य ? तरी जे गाईबैल या गांवांतून घेऊन गेला ते याच वेळीं परत करा व दुसऱ्या कोणत्याहि तऱ्हेनें थोडासाहि त्रास देऊं नका. जर पुन्हां त्रास घाल तर खात्री असूं द्या कीं, त्याचा परिणाम चांगला होणार नाहीं.

सा. ३ ले. ३९८ } (२६८३) {श. १५८६
{इ. १६६४

बापाजी नरसिंगराऊ व येसवंतराऊ सितोले देशमूख आणि मोरो विठल, रामाजी गोविंद व मुकुंद कान्हो देशपांडे प्रगणे पुणा }—नीलोजी नीलकंठराऊ व सेकराजी नीलकंठराऊ व विसाजी नीलकंठराऊ. व त्रिंबक नीलकंठराऊ इनामदार

तुमचा इनाम कऱ्हेपठार व निरथडी ह्या दोन्ही तर्फेतील मौजे चांबली कोढतखुर्द, पूर, किकवी, जेऊरी येथें आहे. त्याची दिवाणीचे फर्मान व खुर्दखते तुम्हापासी होती, त्या सनदा तुमचा भाऊ सकराजी नीलकंठराऊ चांबळी येथें असतां सन आर्बामध्यें पेडिगावीहून मोगलाची जी दौड आली व त्यावेळेस संकराजी नीलकंठराऊ खेडेबाराचे डोंगरी गेला; तेथे त्या दौडेंत सांपडले व तेव्हां हे सनदा गेल्या म्हणोनु तुम्ही सांगून सनदा मागितल्या. तरी तुम्ही व तुमचे वडील देहाये मजकुरांतील जमिनी त्यावरील पटीसह खात आहां. तुमचा इनाम मलिकअंबर, हैबतखान, महाराजसाहेबू व हाली रा. राजेसाहेबाचे कारकीर्दीमध्यें चालिला आहे तेणेमाफिक खाणें. यासी आपणासी अंतर पडो ने इ. कुलस्वामीची व पूर्वजाची आण असे.

फा. सा. खं. २ ले. १० } (२६८४) { श.
औ. जु.—जखर १ } { इ.

औरंगजेब—अधिकारी व रयत.

एल्होजीनें आमच्या कानावर घातलें कीं, परगणे धारवारा सुभे वऱ्हाड यांची देशमुखी बादशाही फर्मानाप्रमाणें त्याचा बाप भिकूजी चौहान याजकडे मुकरर होती. भिकूजीच्या मरणानंतर ती चाकरी एल्होजीकडे चालू आहे. तरी हुकूम होतो कीं, उपर्युक्त देशमुखी एलोजीच्या बापाप्रमाणें त्याजकडे चालू ठेवावी. म्हणजे तो दौलतीची सदिच्छा बाळगून राहील. तरी अधिकाऱ्यांनीं व रयतेनें यास देशमूख समजावें व त्याच्या सल्ल्याबाहेर जाऊं नये. त्यानें या परगण्यांतील रयतेची सुस्थिति, शेतीचा उत्कर्ष, आबादानीची वाढ वगैरे बाबतींत खूप झटावें व हाताखालील लोकांस राजी ठेवावें. या बाबतींत ताकीद जाणावी. ता. २१ माहे जमादिलाखर सन २२७ (= ?)

एपि. कर्ना. ५।१ हसन ३९ } (२६८५) { श. १५८६ माघ शु. १५
श. } { इ. १६६५ जाने. २१

( होनावलीचे जोदिदर ( Jodidar ) सुभाण्णा यांच्या जवळील ताम्रपट )

या दिवशीं श्रीरंगराय यांनीं कुचाचाय्या ( Kuchchayya ) यांना जमीन दान दिली. सदरहूची जमीन बेलूर तालुक्यांतील पालेम ( Palem ) (Plyeàm) गावांतील होती.

फा. सा. खं. १ ले. २९ सु. १०६६ } (२६८६) { श. १५८६ फाल्गुन शुद्ध १
हि. १०७५ रजब सलख } { इ. १६६५ फेब्रुवारी ६

२ रा अली आदिलशाह—अधिकारी व देसाई प्ररगणे वाई.

जयरामभट बिन हरिभट, राहणार कसबे वाई, यानें विनंति केली कीं. "वाई येथें पाटस्थळ १० बिघे व मौजे सिहली संमत कोरेगाव येथें गावाजवळ पाटस्थळ १० बिघे व थोरल्या न्हावीच्या सीमेजवळ अर्धा चावर अशी एकंदर अर्धा चावर २० बिघे जमीन मोकाशाच्या खुर्दखताप्रमाणें मजकडे इनाम चालू आहे. कृपेचें फर्मान मिळावें." तरी विनंतीप्रमाणें वरील जमीन तीवरील हक्कांसुद्धां सदरहू गृहस्थास इनाम दिली आहे.

फा. सा. खं. १ ले. २८ सु. १०६५ } (२६८७) {श. १५८६ फाल्गुन शु. १
हि. १०७५ रजब सल्ख } {इ. १६६५ फेब्रुवारी ६

२ रा अली आदिलशाह—

वर्तमान व भावी अधिकारी आणि देसाई परगणे कोल्हापूर.

रामकृष्ण नारायण देशकुळकर्णी कर्यात हवाले परगणे कोल्हापूर, यानें विनंति केली कीं, " वरील कर्यातीच्या देशकुळकर्णाची मिरास तविरील हकांसह हुजूरच्या फर्मानाप्रमाणें मजकडे चालू आहे. कोष्टयाच्या दर मागामागें दरसाल पाव टका घेण्याची वहिवाट असतां ६ चितलच मिळतात. ( पूर्वीप्रमाणें दर मागामागें पाव टका मिळण्याची ) कृपा व्हावी. " तरी उपर्युक्त रामकृष्ण नारायण यास दरसाल दर मागामागें पाव टका मिळण्याची व्यवस्था करावी.

भारत-मित्र व. ८ अं. २ } (२६८८) उल्लेख {श. १५८६ फा. शु. ६
{इ. १६६५ फे. १२

रामोजी सांतु शेणवी—गोंव्याचे व्हॉइसराय.

' इ. १६६५ सालापर्यंत पोर्तुगीज सरकारांत बजावलेल्या आपल्या कामगिरीबद्दलचें पारितोषिक म्हणून गोव्याच्या जकातखात्याच्या मुख्य तपासनीसाच्या जागेवर फक्त तीन वर्षांपुरती आपली नेमणूक व्हावी अशी विनंती. '

सा. ३ ले. ५८५ } (२६८९) {श. १५८७ वैशाख शु. ६
सु. १०६५ सवाल ५ } {इ. १६६५ एप्रील ११

भिकनाक येसनाक विर्तकारी
मौजे नाटिंबी तर्फ भोर } —— दिवाण ठाणे तपे रोहिडखोरें.

खोपडे व नाटिंबे आपणाआपणामधे भांडिले हा समाचार मिनवान असा—हिरोजी नाटिंबाचे परी सिकिलगर असतां आपले व रामाजी खोपडा याचे लोंगंड आणावयास गेलो असता हिरोजी आपणास बोलिला तुम्हा आम्हास करांजेचल्या काये कराव्या ? मीं म्हटलें कीं मी वाजी न व्हाव्या. नाटिंबे कोठे झगडले आहेती. त्यावरी हिरोजीचा पुतन्या कोडजी बोलला रामजी तुज ग्वग्वव मोठीं; तरी तूं मज कोंडजीसी भांड. रामजी बोलला; तूं साहेबा सरेकर, मी साहेबाचा पाटील तुज मज भाडण करावयासी निसबत नाहीं. यावर कोडजी बोलला तूं पाटील काये चोटाचा, यावरी रामजी कराचली ओढली, हरदोजण करचलीनें भाडो लागले. यास कमपेश होयतर साहेबाचा गुन्हेगार. मग याचेयाचे दाइभाऊ मिळून तोडातोडी केली.

इतिवृत्त १८३४ } (२६९४) { श. १५८८
पृ. १४१–१४३ } { इ. १६६६

पाटोयाचे देशपांडे विसाजीराम पोट भरावयास हिंदुस्थानांत गेले. मग देसमुखे कृष्णाजी बाबा देव यास बोलाऊन काम सोपिले. पण रंगाजी चटोरीकर याणे कृष्णाजीस जेर केले. म्हणून ये हालापासून सुटावें म्हणोन त्यानें मागितले तसे त्यास लेहून दिल्हे. मग चंद रोज गुदरलियावरी रयतिसी रंगोजीनें वदसलूख केला. कतलबाजखानास जागीर होती. तमाम रयेती अहमदनगरास जाऊन फिर्याद जाली. १४ ह. रु. रंगोजीवरी तकरीर साबूत जाहाली. त्यावरी कृष्णाजी हिंदुस्थानिहून आला. विसाजीराम रुस्तुमखानाचे सरकारांत चाकर होते. रंगोजीनें कृष्णाजीस आपली लेकी गला पडोन दिली. मग कृष्णाजीस मेहमानीस बोलवून जहर हरताळ घातला. नियत धरला की, कृष्णाजी मेलियावरी वतन दरोबस्त लेकीचे होईल व मग ते आपल्या हातास येईल. त्यावरी विसाजी रामे चाकरी टाकून हुकूम बुरुन नबाब शाइस्ताखान व अमानतखान दिवाण यांचे नांवे घेऊन परगणे मजकुरास आला. मग चौकशी हकीकत होऊन विसाजीरामाचे हवाली वतन केले. अवरंगाबादेस बाजी सर्फीखान दिवाण यापासी रंगोजी फिर्याद गेला. पण त्यास धके देऊन दूर केले. विसाजीरामाचे देसपांडिपण केले. यावद्दल विसाजीराम मुसलमान जाला. आणि तकरीर दिवाणसाहेबी माफ केली. अबदुल सलाम ऊर्फ विसाजीराम यास सिरपाव व परवाना देऊन विदा केले. मग विसाजीरामे दोघा फर्जंदास कारभार देऊन मकेस जावे ऐसी तजवीज केली. वकसीसनामा करून पैसे घेऊन मलजी रयोजीचे हवाला वतन केलें.

प. द. ३१ ले. २६ } (२६९५) { श. १५८८ श्रावण व. ३
सु. १०६७ सफर १५ } खुर्दखत { इ. १६६६ ऑग. ७

महाराज रा. नेताजी राजे—कारकून व देशमुख परगणे सुपे.

रामजोसी बिन धनजोसी कसबे मांडोगण मालूम केले जे, आपणास इनाम महाराजसाहेब रवाना छ ७ सौवालसन (खमसैन श. १५५१) ४ स्येते तागायत सालगुदस्त चालत आले आहे. हाली साल मजकुराकारणे साहेबास मुकासा अर्जानी जाला. माहाली कारकून ताजे खुर्दखताचा उजूर करिताती. तरी ये बाबे मेहेरबान होऊन ताजे खुर्दखत मन्हामती केले पाहिजे. तरी सालमजकुरा कारणे इनामदार याचे दुमाले करणे.

सा. ४ ले. ७१३ } (२६९६) { श. १५८८ भाद्रपद वद्य १२
सु. १०६७ रवल २५ } खुर्दखत { इ. १६६६ सप्टेंबर १५

मलीक अजम सुदर कदीम नामजाद महालनिहाये परगणे कराड–

कारकून व देशमुख कर्यात भालवणी परगणे माण दहिगाउ.

रताजी माने देशमुख कर्यात म्हेसवड परगणे माण यानी पातशाही कामावरी सावीत राहोन दौलतखोहि जाहीर केली. यावरी साहेब मेहेरवान होऊन देसाई मजकुरासी वरतना इनाम मौजे कन्हर कर्यात दहिगाऊ व मौजे राजापूर कर्यात अकलूज दिल्हे. सवव मजकुरी जमावंदीस दरसदे होन ५० पांच फर्मान मन्हामत केले असे.

| | | |
|---|---|---|
| सा. ४ ले. ७१४<br>सु. १०६७ रखर ४ | (२६९७)<br>खुर्दखत | श. १५८८ आश्विन शुद्ध ६<br>इ. १६६६ सप्टेंबर २३ |

दिवाण ठाणे कर्यात वेलापूर—

मौजे निंबगाउ कर्यात मोकदमानी मजकूर.

रताजी राजे माने देसाई कर्यात म्हेसवड व माहालानिहाय परगणे माण. येही खान अलीशान रफी अलमलकान या वरावरी सरीख होऊन मेहनत केली. तरी देसाई मजकूर यासी निवाला व पालखी तैनाती मोजे निंबगाऊ अजरामरहमती करून दिल्हे.

| | | |
|---|---|---|
| सा. ४ ले. ७४४<br>स. १०६७ जबल १४ | (२६९८)<br>मिसेली | श. १५८८ कार्तिक वद्य १<br>इ. १६६६ नोवें. २ |

खान सर्जाखान—कारकून परगणे वाई.

किले केळंजा येथील सरगुन्हो व नाइकवाडियान यानी मालूम केले की, आपणांस देह व गावगना तनखा व ठिकणे आहेती. यैसियासी गनिमाचे तहवेलीकरता तमाम पडले. हकास जागा नाहीं, रात्रींदिवस किल्यावरी असावे. पोटास न पावतां लोक कैसे राहतील. किले मजकूर सरहदेचा हमशा लडाइया पडताती. यैसियासी देह व ठिकणे येथे जे दस्त होईल ते आपले हुमाले करून पुरवणी पाहिजेल ते ठाणाहून देविले पाहिजे, म्हणौउनू मालूम केले. यैसियासी देहाये मजकूरचे व ठिकणे तनखा व वाजे याचे जे दस्त होईल ते वजा करून पुरवणी पाहिजेल ते ठाणाहून देऊनु याचा हक झाडा करून यापासुनु खिजमती घेणे.

| | | |
|---|---|---|
| *एपि. कर्ना. १० कोलार २२७*<br>शक. | *(२६९९)* | *श. १५८८ पौष व. १०*<br>इ. १६६७ जाने. ९ |

( हुदुर ( Huttur ) येथील गांवकुसाजवळील शिलालेख )

ह्या दिवशी शिवाजी राजे भोसले, गोत्र कौशिक यांचे पुत्र संभाजी राजे यांची पत्नी जैताबाई यांनीं विरुपाक्ष–शंकर वाचा पुत्र भाऊजीपंत यास कोलार तालुक्यांतील उत्तूर गांव बक्षिस दिला.

सा. ४ ले. ६९
पे. द. ३१ ले. २७
सु. १०६७ रमजान ७

(२७००)

श. १५८८ फाल्गु. शु. ८
इ. १६६७ फेब्रु. २१

दिवाण ठाणे परगणे खटाव—मोकदमानी परगणे मजकूर.

केदारजी देशमूख व कासीराम देसकुलकर्णी परगणे मजकूर मालूम केले की, साल गुदस्ता आपणास सेरणी घेऊन इनाम सिदी जौहार लष्कर सरहाविलदारियानी दिले. यावरून हुजरून अमानत फर्माविले. तरी आपण साहेबाचे दौलतखाह आहो, आपले अवकात चालिले पाहिजे. तरी बराये मालुमाती देसमुख देसकुळकरणी खातिरेसी आणौनु सदरहू पधरा बिघे मऱ्हामती केले असे आजरामऱ्हामत दुमाला करणे.

सा. ४ ले. ६९८
सु. १०३७ रमजान ९

(२७०१)
खुर्दखत

श. १५८८ फा. शु. १०
इ. १६६७ फेब्रुआरी २३

दिवाण ठाणे परगणे खटाऊ—मोकदम मौजे तडवले परगणे मजकूर.

केदारजी देसमूख व कासीराम देसकुलकर्णी परगणे मजकूर मालूम केले की सालगुदस्ता सिद्दीजोहारानें दिलेले इनाम अनामत केले. आपण साहेबांचे दौलतखाहा (हितेच्छु)-तरी मौजे मजकूर इनामदेह कुलकर्णी जमीन ८७॥ मऱ्हामत केली पाहिजे. सदरहूप्रमाणें मराहमत केलें असे अजरामराहमत करणें.

सा. ३ ले. ५४०
सु. १०६८

(२७०२)

श. १५८९-९०
इ. १६६७-६८

दिवाण किले चंदन-मोकदम वरयानी देहाये परगणे कुडाल.

किले मजकुरीचे विलायती सिवाजी भोसलेचे तसविसीकरता कुल खराब पडिले. देसाई, देसकुलकर्णी, रयत परागदा होऊन दिवेलागण नाही. किले नाजुक सरहदेचा पाहून विलायतीचे मामुरीबदल सूर्याजी बिन तुवाजी नाईक देसाई यास बदल निवाला इनाम चावर १ कसबे कुडाल व मौजे सरताळे पैकी कुलबाब कुलकानु दिले असे. सूर्याजी म्हणतो सिवाजी भोसलेने आपले घर लुटले, गुरे घोडी नेली, आपले वहीण अदुवखानेत ठेऊन दंड ३०० होन व सिलकावणी होन ६० घेतले. ग्यावया नाही ऐसे केले. त्यावरून सरगुन्हो, जमायती, नाइकवाडी यांचे इलतमासेकरितां सूर्याजीस जमीन दिल्ही.

सा. ५ ले. ७५८
सु. १०६७ जिल्काद ११

(२७०३)
कौलनामा

श. १५८९ वैशाख शु. १२
इ. १६६७ एप्रील २५

रयतवान—सिदोजी फरताजी मान्य देशमुख कसबे भैसवाड व संमत वारावाड परगणे माण दहिगाऊ.

रताजी मान्या हलालखोर होता त्यावर थोताड करुन किदरखानाचे लोकानी कसबे भालवणीहून धावणी करून गहजब जिवे मारिला. तुम्ही परंगदा होउनु बहेर गेलेसी. तरी अता त्याची द्वाही घेउनू फर्जद हती धरुन सरफराज केले पाहिजे व वतन देसगती कसबे मजकूर व साल मजकूर हुवाला केले पाहिजे. म्हणऊन तरी बराये मालुमाती खातिरेसी अणऊन तुज सरफराज करुनू कौल सदरहूप्रमाणे दिल्हे आहे. सुखे तुवा असणे तुझे नाव सवाई रताजी ठेविले असे. येकजरेचा अंदेशा न करता कसबे मजकुरासी येउनू देणे.

| | | |
|---|---|---|
| सा. ४ ले. ७३२<br>सु. १०६७ जिलकाद १७ | (२७०४) | श. १५८९ वैशाख वद्य ४<br>इ. १६६७ मे १ |

निलो सोनदेऊ व अनाजी दतो व केसो त्रिमल—

सिवाजी जेधे देसमुख तर्फ रोहिडखोरे.

तुम्ही राजेश्रीसाहेब येती तोवरी आपले वतनी असणे. साहेब आलियावरी सर्जारायाचा व तुमचा, तुमची घेरे व सेते मिरासीची 'अहित ते बाबत निवाडा होईल. त्याचे लोक धिंगाई करीत आहेत, तेहि वावे सर्जारायास लिहिले आहे.

| | | |
|---|---|---|
| सा. ४ ले. ७४५<br>सु १०६८ रजब ४ | (२७०५)<br>आज्ञापत्र | श. १५८९ पौष शुद्ध ६<br>इ. १६६७ डिसेंबर १० |

इजतमाव सरगुन्हो नाईकवाडी किले केलजा परगणे वाई.

धलिईच्या दरवाजियाचे वादिस्तीबदल ठाणाच्या कारकुनास हुकूम सादर करून रोजिना येक देविले असत. गत रास व बड गाडे व वाजे एकून-कोट सारवण लोक व धेणारी या हाती काम घेणे. वादिस्त खूब मजबूत मावोल दरवाजा लाउनू वरती भांडी माडून धलईचा दरवाजा राखाव्या. हाशम यास मौजे अभेपुरी दिली आहे. किले मजकूर इस्तादबदल जर्वीरा गला खडी १०००दाहा कारकुना करून देविला असे तो घेऊन घेणे.

| | | |
|---|---|---|
| सा. ३ ले. ४२६<br>सु. १०६८ जिल्काद ११ | (२७०६)<br>आज्ञापत्र | श. १५९० वैशाख शु.१२<br>इ. १६६८ एप्रील १३ |

रा. सिवाजी राजे—रायाजी भोसले हवालदार जंजिरे सिंधुदुर्ग.

रामचंद्र नीलकंठ यास जंजिरे मजकूरची सबनिसी वतन दिल्ही आहे. त्यास १०० पातशाही होनु सिरस्ता केला आहे. तेणेप्रमाणे आदा करणे. यारेदी व कागदवाव मागीलप्रमाणे लिहिणियास देत जाणे. मशारइले आपला मुतालीक जंजिरे मजकुरास पाठवितील त्याचे हाती सबनिसीचा कारभार घेत जाणे.

सा. ४ ले. ७५५ }  (२७०७)  {श. १५९० वैशाख शुद्ध १५
सु. १०६८ जिल्काद १४}  कौलनामा  {इ. १६६८ एप्रील १६

सिवाजी राजे—बाबाजी जुझारराउ मरल देशमूख तर्फ कानदखोरे.

बाबाजी येसवंतराव यास हरामखोरीचा नतिचा पावला या धास्तीनें बाजे देसमुखावरावरी वतन सोडून बाहेर गेले असे कळले. तरी कोणे बावे शक नधरितां आपल्या वतनावरी येऊन सुखे असणे. तुमच्या पोटाची विलि करून. कौल असे.

प्रो. पां. पिसुर्लेकर भा. मित्र {  (२७०८)  { श. १५९० कार्तीक व. ८
सु. १०६९ जमर २२  { इ. १६६८ नोवें. १७

रा. सिवाजी राजे—कौलनामा.

राजश्री सिवाजी राजे साहेब रवल सेणवी सुरेराऊ देसाई व नारायेण रवल सेणवी सुरेराव देसाई पनेलीकर व बाजे देसाई तर्फ भतग्राम ऊर्फ डिचोली. तुम्ही येऊन राजश्री दत्ताजीपंत वाकेनिवीस यांची भेट घेतली त्याणीं साहेबांस भेटविले व तुमचे बाबे बोलिले कीं रवल सेणवी पुरातन वैकुंठवासी राजश्री-महाराज साहेबांपासून साहेबांचा स्थापित म्हणून साहेबांचे पांयांस येकसान होऊन येऊन भेट घेतली कीं साहबांचे पाये पाहिलेयाने सर्फराज होईन म्हणूम व मल सणवेयानें बेईमानीची राहाट केली याबदल तपे मजकुरचे देसगत समंधीं कुसूर झालों देखोन साहेबांचे शेवेस येऊन दाखल केला असे. तर साहेबीं मेहरबान होऊन देसगतबरहुकूम सालाबाद दुवाले करून कौल मरहमत केला पाहिजे म्हणून. त्या वरून मनास आणून तुम्हांस कौल मरहमत केला असे. आजी तागायत तुमचे बाबेचा खिलाफ साहेबांचे मनी दूर करून साहेब मेहरबान होऊन तुमची देसगत तपे मजकूर देखील हक वतन कुलबाब इनामत व तेनात व जिरायेत व बागायेत व पटी पछी दुबार हुकूम सालाबाद दुवाले केले असे. बरहुकूम भोगवटा तसरुफात कमाबेश करून खाऊन सुखें असणे व तुमचे बारीसदार असतील त्यांस बरहुकूम सालाबाद देत आले असाल तेणेप्रमाणें देत जाणे. कोणहि हरकत केलिया त्याची साजीस साहेब मनावर धरणार नाहीं व मल सणवें याने हरामखोरी केली आहे तोहि आपला नतिजा पावेल. तुम्ही देसगत खाऊन खुशाल साहेबाचे पायांसी येकाग्रतेने ईमाने राहाट करून असणें. राजश्री दत्ताजीपंतीं कौल दिल्हे असे तो कौल साहेबांचास समजोन तेणेप्रमाणे तपे मजकूरचा रमूल करणे कौल असे.

पुरं. भा. ३ ले. १५४ }
सु. १०६९ रजब २२ }
(२७०९)
{ श. १५९० मार्ग. व. ९.
{ इ. १६६८ डिसें. १०

शिवाजी राजे—

विसाजी बलाळ सुभेदार व कारकून महाल सरदेशमुखी सरकार महाल.

पंताजी गोपिनाथ येहि हुजूर सांगितले परगणे सुपे व कर्याती बारामतीचे देसकुलकर्णी पूर्वापार आपले आहे. हल्ली बुचके खातात व मुतालिकासी भांडतात. मलिकंबरी निवाडा तो फर्मान बादशाही व मलिकाच्या शिक्यानिसी आहे. रणदुलाखान, राजेश्री महाराज, शास्ताखान, जसवंतसिंग यांचे महजर व पत्रें आहेत. परंतु पैकियाच्या बळे वादियानी आपल्या मुतालिकास मिरासीवरी बसो दिले नाही. तरी साहेबी पुणे अमीन आहेत त्यास लेखोन बरहक निवाडा करणे. तरी तुम्ही तेथें आहां. कुलकर्ण दिवाणात अमानत ठेवून हर एक बाबे या कामांत मन घालून कार्यभाग सिद्धी पावे ते करणे.

सा. ४ ले. ७२४ }
(२७१०)
{ श. १५९०
{ इ. १६६८

आबाजी राजे घोरपडे——गगांसमान विंबाई तथा निराई.

येणारा समवेत होन पंचेवीस पाठविले असे, त्याचे कुणबिणी बऱ्या गोरिया, जातविंत चौघी पाचजणी तुमचे मुकासे पावेतो दोन स्वार बरोबरी देऊन पाठविणे. निराईस आशिर्वाद. तुमचे मातेस ५।६ महिनेपूर्वी देवाज्ञा झाली. मरताना तिने आपली तकसीम अपेले लेकीचे लेकास दिल्ही. तरी तुम्ही धाकटा मूल सांगाते घेऊन येणे. भेटी होईल व पाटीलगीची विल्हे होईल.

सा. ३ ले. ५८६ }
सु. १०६९ }
(२७११)
{ श. १५९०
{ इ. १६६८

सिवाजी राजे—कारकून व देशमूख तर्फ रोहिडखोरे.

येसजी विन इंद्रोजी जेधा मालूम केले जे, तर्फ मजकूरचे देशमुखास इनाम च्यार गाव व हकलाजिमा सारा दुबाला होता. ते वखती मौजे आंबवडे तर्फ मजकूर देसमुखीपैकी आपणास सेत टके ३ चे इनाम चालवीत होते. हाली देशमुखास एक गाव व हाकलाजिमा दुमाले करुन बाकी अमानत जाले आहे. तरी येसजी मजकूरचे सेत दर सवाद मौजे आबवडे टके ३ पेशजी देशमुखाचे तर्फेने चालत होते तेणेप्रमाणे हाली दुबाला केले. माहासूल कुल दुबाले करणें.

सा. ५ ले. ७७० }
सु. १०६९ }　　　(२७१२)　　　{ श. १५९०।९१
{ इ. १६६८।६९

रा. सिवाजी राजे—कारकून तर्फ रोहिडखोरे.

सर्जेराऊ व सिवजी व चांदजी व नाइकजी व रायाजी व संभाजी बिन कान्होजी जेधे देशमुख तर्फ मजकूर या भावा भावामध्ये वाटियाचा गर्गशा लागला होता याबदल सिवाजी हुजूर येऊन मालूम केले. त्यावरून सर्जेरायासहि आनले वरकडहि भाऊ आले. हकीकत मणास आणिता निवाडा होत नाही. तरी बापानें तकासिमा वाटून कागद करून दिला असे तेणेप्रमाणें वर्तावे. असा निवाडा जाला असे. तेणेप्रमाणे तुम्ही यास वर्तवणे.

सा. ५ ले. ७८७ }
सु. १०६९ जिल्काद ७ }　　　( २७१३ )　　　{ श. १५९१ चैत्र शु. ९
{ इ. १६६९ मार्च ३०

मोरो त्रिमल—सर्जाराव जेधे देशमुख तर्फ रोहिडखोर.

तुमचे भाऊ येथे एक महिनाभर येऊन बसले आहेत. निवाड्याबदल तुम्हास आम्ही येकदोन कागद व साहेबाचा रोखा पाठविला; आले नाहींत. यावर तुम्हास निर्गत करणे नाही येसे दिसोन आले. तरी नायेकजी व सिवजी व सुभानजी मौजे कारीस घरे व सेते करितात तेसेच त्यांचे दुमाले केले असेती. त्यास सुखे राहू देणे. आता पुढले साली कारीच अमानत करू म्हणजे निवाडा कराल.

सं. सा. १ ले. ३२ }
शक }　　　( २७१४　　　{ श. १५९१ ज्येष्ठ शुद्ध ५
{ इ. १६६९ मे २४

मोरो त्रिमल अत्रे पाजूरकर—कृपारामभट सेकीन अवंतिकापुरी.

तुम्हीं आपले तीर्थपुरोहीत आहां.

सा. ५ ले. ७८८ }
सु. १०७० मोहरम २३ }　　　( २७१५ )　　　{ श. १५९१ ज्येष्ट व. १०
{ इ. १६७० जून १३

—येसजी जेधे, निवाजी बांदल, बापुजी घोलप, सोमाजी आवाळा वगैरे मौजे कारी तर्फ रोहिडखोरे.

सर्जाराऊ व सिवाजी जेधे याजकडे देशमुखीचा कथला लागला होता. येसियास साहेबी निवाडा केला कीं, कान्होजी जेधे याही वाटून दिल्हेप्रमाणें वर्तावे, ऐसे असता तुम्ही सिवाजी जेधे यासी नसती बसघस करीत आहा. तरी भाऊभाऊ समजले आणि तुम्ही घसवसा करता तुमचियेनि काय होईल, साहेब ताकीद करतील, दुसरा जालियावरी साहेब तुम्हासहि दुसरे जागा ठेवितील.

पे. द. ३१ ले. २८
स. १०७८
औ. शु. १२ सफर १०

(२७१६)
कौलनामा

श. १५९१ आषा. शु. ११
इ. १६६९ जून २९

—मोरो विठल देसपाडिये परगणे पुणे.

अनाजी विठल परगणे मजकूरचे बाकीबदल कैदेत होता. त्याणे आपल्या हिशाची कितेक गावीची बाकी वसूल केली. त्यास सिरोगाव देऊन खलास केले व देशमुख त्याचे गुमास्ते पातशाही कामाप्रमाणें फिसादी करून पळाले. त्यास नारो तुकदेव गुमास्ते देसमूख त्याची माय व भाऊ सापडली ते कैदेत होती की नारो तुकदेव हाजीर होये व हे फिसादी दूर होये. त्यास नारो तुकयानें जमयत खुब मेलऊन आमची हवेली ताराज केली. बदीखाना फोडून आपले माये व भाऊ नेली. त्या बराबरी तमाम बदखानीची कुळे त्याजवरी बाकी बाजीवी होती तेहि खलास करून नेली. येसी ख्यानत नारो तुकयाने केली. हे तमाम आलम जाणते. तुमचे कोण्ही त्याज बरोबरी नव्हते. तुम्हापासून काही पातशाही कामात हरकती व ख्यानत जाली नाहीं.

बँबे अँड सीदीज पृ. ३५५
शक

(२७१७)
मुंबई-सुरत

श. १५९१ कार्तिक व. २
इ. १६६९ आक्टोबर १६

शिवाजीला दंडाराजपुरी किल्ला हल्ला करून घेतां येत नाहीं तथापि आंतील लोकांची उपासमार करण्याचा त्याचा विचार असल्यानें सिद्दी टेकीस आला आहे. शिवाजीनें वेढा काढावा असा मोंगलांचा हुकूम तो मानीत नाहीं. तेव्हां शेवटपर्यंत टिकाव धरून कल्याण जवळ लोदीखानाचे हाताखालीं मोंगलांचें सैन्य आहे त्याचे हवाली किल्ला करावा असा सिद्दीनें बेत केला.

चौलचे पोर्तुगीज अधिकाऱ्यानें विश्वास देऊन त्याचे एक गलबत पकडले. त्यामुळें सिद्दी आतां त्यांचेवर विश्वास न ठेवितां आमचे मित्रत्वाची इच्छा करीत आहे. त्यामुळें आपल्याला किफायत असून नकार देण्यांत भितरेपणा दिसतो. खुद्द सिद्दीच आला तरीहि कांहीं धोका नाहीं अशी आमची समजूत आहे. व तो कांहीं येथें फार दिवस राहाणार नाहीं व तेव्हां त्याला जर आपण अशी कांहीं परवानगी दिली तर साहजिकच तो आपला मिंदा होईल व ही गोष्ट आपल्याला पुढचा कांहीं कार्यभाग साधण्यास उपयोगी पडेल.

( दंडा राजपुरी ) हें ठिकाण फार महत्वाचे असून जिंकण्यास दुर्घट असें आहे. त्यावर ५७२ तोफा आहेत असें कळतें. कांहीं पोर्तुगीज लोक पदरीं ठेवतां आले तर या जागेला विशेष महत्व प्राप्त होईल. या जागेवर कंपनीचा आधीपासून डोळा आहे. दोन तीन गलबतें येथें येऊं शकलीं आणि आपली परवानगी मिळाली तर ती घेऊन दंडाराजपुरीच्या पुढें जावें असें मनांत येतें कांहीं नाही तरी त्या ठिकाणची माहिती मिळेल.

सा. ५ ले. ७५६
सु. १०७० साबान १७

(२७१८)
कौल

श. १५९१ पौष वद्य ४
इ. १६६९ डिसेंबर ३१

सिवाजी राजे—बाबाजी झुझार राऊमरल देशमूख तर्फ कानदखोरे.

मोरोपंत पेशवे यानी मालूम केलें कीं, तुह्मी शक जादा होउनु परागंदा झाला. तरी परागंदा जहालेस हा गुन्हा माफ केला असे. याउपरी शक व अंदेशा न करितां सुखे असणें. कौल मरहमत केला असे.

एपि. कर्ना. १० कोलार २२४
साधारण संवत्सर चैत्र शु. १०

(२७१९)

श. १५९२ चैत्र शु. १०
इ. १६७० मार्च २०

इ. स. १६७० या सालीं मातोश्री जैताबाई यांच्या आज्ञेवरून ( Sugatur Kopbali ) हवालदार, विठ्ठल पंडितराय व अग्रहाराचे ब्राह्मण यांनीं शंकरय्या अनेहल्ली यास शेत दान दिलें. ( अननह्ली ( Annenahalli ) या गांवांतील पटेल याच्या शेतांतील शिलालेख )

पे. द. ३१ ले. २९
सु. १०७१ सफर ७

(२७२०)

श. १५९२ आषाढ शु. ८
इ. १६७० जून १५

निलो सोनदेव—

त्रिंबक वासुदेव हवालदार व कारकून तर्फ कडेपठार प्रांत पुणें.

मौजे बोपगाव, भिवरी देहाये तर्फ मजकूर आत्रियाचे कुलकर्ण असोन दरम्यान येसावा आत्रीयानी बाप बिसावा पांचकुडवी मुतालिक ठेविला होता. तो मयत जाला. त्याच्या लेकाने लाइनी कथळा करून कुलकर्णास खलेल घातले. यावर त्यास व आत्रियास परस्परास निवाडियाबद्दल पाठवावयाचा तह केला होता. हली येसावा गैरहाजीर जाला आहे. तरी दोन्ही गांव जैसे पहिले अत्रे कुलकर्ण चालवीत होते तैसे चालविणे.

राम. अं. १६८
सु. १०७१ सफर १०

(२७२१)

श. १५९२ आषाढ शु. १०
इ. १६७० जून १८

सीवाजी राजे भोसले. वे. आपदेभट ढेर्गे वास्तव्य त्र्यंबकेश्वर—

श्रींचे तीर्थ उपाध्यपण तुम्हास पूर्वीपासून दिलें आहे ऐसीयास श्रींची पूजा नैवेद्य व ब्राह्मण भोजण + दक्षणा मोइन सालिना होनु पातशाही ६० श्रींची पूजा व नैवेद्य व नित्य दक्षणा ४० दक्षणा ब्राह्मण अभिषेक असे १०० केले असेत.

पे. द. ३१ ले. ३० } (२७२२) { श. १५९२ आश्वी. शु. ९
सु. १०७१ जवल ७} { इ. १६७० सप्टें. १३

सिवाजी राजे—रा. कृष्णाजी भास्कर सुबेदार कारकून सुबा तर्फ मावळे.

यादवभट विन अंतभट व विनायेकभट विन नारायेणभट घोडे सेकीन कसबे पुणे यास. इनाम जमीन हाली प्रगणे पुणा मोगलास जाले. मौजे मजकूर साहेबास वतन अर्जानी जाले त्यापासून चालत नाहीं. ये बाबे भट नेऊन बोलिले की, दुमाले केले पाहिजे. पेसजी प्रगणे मजकूर साहेबास अर्जानी होते आणि मौजे मजकूर प्रगण्याखालीं कमाविस होत होते ते वख्ती सदरहू इनाम जमीन कास ३ -ससगाणी चालिले असेल तेणेप्रमाणें दुमाले करून चालवणे.

मु. घो. इ. प. अ १५-१९ } (२७२३) {श. १५९२ कार्तिक वद्य २
हि. १०८१ जखर १५ } {इ. १६७० आक्टोबर २०

[ २ रा अली आदिलशाह ]—देशमुख, देशपांडे व नाडगीर परगणे मुधोळ.

तुमचा परगणा बाजीराव राजे बहादुर घोरपडे आदिलशाही यांस इनाम होता. त्यांनीं पुष्कळ काळपर्यंत सरकारचाकरी विश्वासानें केली आणि शिवाजी राजे भोसले यांच्याबरोबरच्या लढाईत शौर्य दाखवून ते मेले. यानंतर त्यांचे मुलगे मालोजी राजे बहादुर घोरपडे हे या सरकारचें धोरण चालूं ठेवतील असें मनांत आणून त्यांना नोकरी माफ करून इनामाच्या रूपानें पाच परगणे बक्षीस देऊन त्यांचे फर्मान अलाहिदा दिले आहेत. तेव्हां तुम्हांस हुकूम देतों कीं, हक्कदार सोडून देऊन दरोबस्त परगणा सर्व हक्कांसह त्यांस इनाम दिला आहे.

मु. घो. इ. प. अ ले. १३ } (२७२४) { श. १५९२ कार्तिक वद्य २
हि. १०८१ जखर १५ } { इ. १६७० आक्टोबर २०

[ २ रा अली आदिलशाह ]—मालोजी राजे घोरपडे.

यावेळीं दरबारास माहीत झालें कीं, तुमचे वडील बाजी राजे घोरपडे आदिलशाही यांनीं फार दिवसपर्यंत उत्तम तऱ्हेनें सरकार चाकरी केली. राव सिवाजी राजे भोसले यांशीं युद्ध झालें त्यांत तुमच्या वडिलांनीं शौर्य दाखवून ते सरकार कामास आले. यासाठीं तुम्हांवर उत्कृष्ट कृपा करून व पूर्वीच्या चाकरीवर नजर देऊन तुम्हांस नोकरी माफ केली आहे आणि इनाम म्हणून मुधोळ, जमगह, ढवळेश्वर, माचकनूर, व लोकापूर हे पांच परगणे देत आहों. मात्र पूर्वीच्या हक्कदारांचे हक्क शिल्लक ठेविले आहेत. तुम्ही हें वतन पिढ्यानुपिढ्या भोगत रहावें.

सा. ३ ले. ४२७ } (२७२५) { श. १५९२ मार्ग शु. ८
फ. १०८० शक } महजर मिरासी पत्र खरीदी { इ. १६७० नोवें. १०

सिउजी विन जैत व माणकोजी बिन बेबोजी घोस मोकदम मौजे तांदली नजीक टाकली तर्फ राजणगाऊ परगणे जुन्नर व समस्त बाप भाऊ, बारा बलुते व मिरासी कुणबी— यानी नीलो व आबाजी सोनदेऊ यास.

कुलकर्णी व जोसी कुमाजी हा मिरासदार होता त्याचे वर कुल बुडाले. यावरी आम्ही गावकरी मुतालीक ठेऊन गावकुलकर्ण व जोसपण चालवीत असे व भटपट गावलोक घेत असो पण आम्ही कुककर्ण व जोसपण विकावे टकाभरी घ्यावा आणि मिरासभाऊ करावा ऐसा तह करून रायेरीहून तुम्हास आणून मौजे मजकूरचा घरवाडा., मला विघे १० देऊन तुम्हापासून १५० होन घेऊन तुम्हास जोस व कुलकर्णपण दिल्हे. लेकराचे लेकरी ग्याणे.

फा. सा. खं. १ ले. ६१ } (२७२६) { श. १५९२ मार्गशीर्ष शुद्ध १२
हि. १०८१ रजब १० } { इ. १६७० डिसेंबर १४

कुतुबशाह—विठोजी तुकोजी घोरपडे.

मुहम्मदानगर समतेपैकीं चरपवेली हा गांव-देशमुखीच्या पेशकशीसह... तुमच्या स्वारांचा तनखा म्हणून ४५५ होनास तुम्हांकडे चालूं होता तो अमानत करून त्या ऐवजीं कतेकुंदा परगण्यापैकीं वेलेर हा गांव दिला आहे. या गांवाच्या उत्पन्नापैकीं खासखैलीची तक्सीम, दिवाणची तलब व बाकी याबद्दलची एकंदर रकम ३६६ होन ३ दुगल इतकी तुम्हाकडून दरसाल यावयाची बाकी ८८ होन व पाऊण दुगल येवढी राहिली. तसेंच तुमच्या गावांतून मीठ, पान व तंबाकू या हक्कांबद्दल तुमच्याकडून यावयाची रकम ११५ होन व......इतकी आहे. पैकीं दरसाल ८८ होन ¾ दुगल याप्रमाणें हि. १०७१ पासून जमलेली रकम दफ्तरीं चालूं केली आहे ( दाखल केली आहे ? ). तरी लिहिल्याप्रमाणे अमल करावा.

फा. सा. खं. १ ले. ६२ } (२७२७) { श. १५९२ मार्गशीर्ष शुद्ध १२
हि. १०८१ रजब १० } { इ. १६७० डिसेंबर १४

कुतुबशाह—पुढारी, रयत व कुलकर्णी मौजे वेलेर परगणे कतेकुंदा.

१३६६ होन ३ दुगल उत्पन्नाचा हा गांव विठोजी तुकोजी घोरपडे यांजकडे पगाराबद्दल चालूं आहे. पैकीं १००० होन पगार. बाकी राहिले ३६६ होन ३ दुगल. पैकीं ११९ होन ३॥ दुगल हा खासखैलीचा वाटा. ९३॥ होन दिवाण तलब. बाकी १५३ होन खैरुद्दीन मुहम्मद घेतो. ४५५ होनांच्या अटीवर विठोजीस कामाबद्दल दिलेला गांव चरपवेली-संमत मुहम्मदानगर-अमानत करून त्याऐवजी वेलेर हा गाव हि. १०७१ पासून दप्तरीं त्याजकडे चालूं केला आहे. तरी गाव त्याचें ताब्यांत आहे असें जाणून फर्मानाप्रमाणें वागावें.

राम. अं. १६६ पृ. २२७ } (२७२८) {श. १५९२ माघ
शक. } नोंद {इ. १६७१ जाने.

विश्वनाथ—त्रिंबकभट शीवपुरे पैठण.

प्रतिष्ठानिचे तिर्थपुरोहितपण मि जंपर्यंत एथें आहे अथवा घरि होन मा त्यान येईन तेव्हां देणें.

राम. अं. १६६ पृ. २२७ } (२७२९) {श. १५९२ माघ व.
शक. } नोंद {इ. १६७१ जानेवारी

वामन खारेपाटणकर—त्रिंबक भट शिवपुरे पैठण.

आम्हि तुमास प्रतिष्ठानचे तिर्थपुरोहितपण दिलें.

सा. २ ले. ५५४ } (२७३०) {श. १५९२ फा. शु. ९
सु. १०७१ सवाल ७ } {इ. १६७१ फे. ७

शिवाजी राजे—विठ्ठल सोमनाथ हवालदार व कारकून परगणे इंदापूर.

मोरेश्वर गोसावी मौजे मोरगाऊ यास इनाम व रोजमुरा आहे तो पेशजी अफजलखानाचे गलबीलया पहिले चालिले असेल तैसे चालवणे.

सा. ४ ले. ७२५ } (२७३१) {श. १५९२ ?
} {इ. १६७०–७१

संताजी राजे घोरपडे—नेगोजी व मुकुंदजी व विठोजी व रखलोजी घोरपडे.
तुम्ही लिहिलेप्रमाणे जे वेव्हेस तकसीम होईल ते तुमचेहि तकसीमेचे विले होईल. फुंइजी अवास ठाणेचे तसवीज होत असे म्हणोन कारकुनास खाने आजमाचे ताकीद कराविली पाहिजे. तरी येथें हाली खाने अजमाचे पेसजी सारिखे येकमुखे चालत नाही. आम्ही चिरंजीव संडोजी व ब्रह्माजी वऱ्हाड मारून हाली शहरास येऊन एक महिना झाला.

राम. अं. १६६ } (२७३२) {श. १५९२
} नोंद ? {इ. १६७०–७१

सूर्याजीपंत गंगाधरपंत—शिवपुरे पैठण.

गंगाधरपंत पिते सूर्याजीपंत आजे लक्ष्मण कुळकर्णी गोत्र जामदग्नी गाव जाम परगणे अंबड.

राम. अं. १६८ } (२७३३) {श. १५९२
} (उल्लेख) कौलनामा {इ. १६७०–७१

शिवाजी राजे—

अवदे दुर्ग यानी मालूम केले कीं, साहेबाचे लोक येता-जाता तसवीस देतात. तरी ते देणार नाहींत.

पे. द. ३१ ले. ३१ }
सु. १०७२ रजब १ }
(२७३४)
{श. १५९३ कार्ति. शु. ३
{इ. १६७१ आक्टो. २५

सिवाजी राजे—देशमूख देशपांडे व मोकदम प्रांत चाकण.

श्रीज्ञानदेव याचे इनाम मौजे आळंदी परगणे मजकुरी सालाबाद निसबत जमीन मुजेरी सेत १०॥ येक खंडी अडीच मण देवाचे देवास दिधले असे. कुळबाव कुलकानू दुमाले केले असे. तालीक घेऊन असल फिराऊन रामानंद गोसावी तपस्वी यापासी देणे.

सा. ३ ले. ४४१ }
सु. १०७२ जिल्काद २५ }
(२७३५)
{ श. १५९३ फा. व. ११
{ इ. १६७२ मार्च १५

विठल पीलदेऊ सुबेदार मावल—कारकून परगणे सिरवल.

परगणे मजकूर मौजे एलके येथील कुलकर्ण व जोतीस निमे यमाजी रंगनाथ बोकील याणी खरीदी केले आहे. त्याबद्दल परगणे मजकूरच्या देसकाचा महजराहि आहे. हली निमे कुलकर्ण व जोतीस मशारइलेच्या दुमाल करणें.

फा. सा. खं. १ ले. ६३ }
हि. १०८४ रवल २३ }
(२७३६)
{ श. १५९५ आषाढ व. १०
{ इ. १६७३ जून २९

कुतुबशाह—मुकुंदजी घोरपडे.

मुकुंदजी घोरपडे यानें जाणावें कीं, यावेळीं कर्नाटकाचा सुभा व सर लष्करी मूसाखान याजकडून दूर करून मिया मुश्क यास दिली आहे. तरी त्याच्या हुकुमांच्या बाहेर न जातां पाठविलेल्या त्याची चाकरी व दिवाणची सदिच्छा यासाठीं प्रयत्न करावा व फर्मानाप्रमाणें अमल करावा.

(थोड्या शब्दभेदानें याच मजकुराचें व तारखेचें एक फर्मान नेगोजी घोरपडे यास धाडलेलें आहे.)

सा. ४ ले. ६८६ }
सु. १०७४ जखर २६ }
(२७३७)
{ श. १५९५ भाद्र. वद्य. १३
{ इ. १६७३ सप्टेंबर २२

शिवाजी राजे—यसाजी गणेश हवालदार व कारकून परगणे पुणें.

श्री-देवस्वामी चिंचवड हे इनाम जमीन घरवाहो करताती व यास आलाहिदा सरदेशमुखी परगणे मजकूरपैकीं होनु २९ येकुणतीस खर्च पडोन पावताती. सनद तरी इनामाची नाहीं. ये बाबे नवा इनाम सरदेसमुखी देविला नाहीं. जे जमीन देवास इनाम असे त्यावरी सरदेसमुखी होती. ते दुबाले केली. सरदेसमुखी इनाम देविला नाही. सनद यैसीच असे. तुम्ही अलाहिदा आदा करायची गरज नाहीं. त्याचा इनाम आहे त्यावरी सरदेसमुखी जे होईल ते त्याचे नांवे खर्च लिहीत जाणें. हुजूर हुकुमावरून तुम्ही येकुणतीस होनु पावावया खलेल केले, तरी नवे खलेल कांहीं न करणें. तागायत गुदस्ता पाच साले येकुणतीस होन सरदेसमुखी पैकी श्री-देवास पावताती तेसेंच साल मजकुरापासून पावबीत जाणे.

बाँबे अँड सीदीज } (२७३८) { श. १५९५ आश्वीन वद्य ८
पृ. ४६२ } मुंबई-सुरत { इ. १६७३ आक्टोबर २३

राजपूरबद्दल जो आपण चांगला अभिप्राय दिला त्यामुळे आम्हाला जास्त उत्साह प्राप्त होत आहे. आणि कदाचित् पुढील सालपर्यंत आमचा तेथें पाय शिरकवण्याची संधी पहात आहोत. रिव्हेंज फ्रिगॉट येथे आल्यापासून कारवारचे वृत्त आम्हास कांहींच कळले नाहीं. पण कारवार येथें फार अशांतता माजून ते जास्ती जास्ती वेढले जात आहेत असें कळतें.

सा. ३ ले. ६२८ } (२७३९) { श. १५९५ पौष शु. ९
सु. १०७४ सवाल ७ } { इ. १६७४ जाने. ६

सिवाजी राजे—माहादाजी सामराज सुभेदार व कारकून प्रांत मावळे.

सूर्याजी बिन भिकाजी सिवरे पाटील याचा तर्फ मजकुरी सर पाटिलकीचा हक पुरातन आहे. खुर्दाटके १ गलाकैली १ तूप ००१ कोंबडे १ येणेप्रो सुदामत पावे ते गोष्ट करणे.

पे. द. ३१ ले. ३२ } (२७४०) { श. १५९५ फाल्गुन व. ८
सु. १०७४ जिल्हेज २० } { इ. १६७४ मार्च १९

अनाजी दत्तो—रा. महादाजी अनंत सुभेदार कारकून मामले दाभोळ.

विसो हरी महाजन व दादो कृष्ण कुलकर्णी व रयेत कसबे गुहागार हुजूर येऊन सांगितले कीं, ५३००० नारळ आम्हावरी जाजती घातला पाहाणी करून घेणें. पाहाणीमुळें होईल ते देऊ. त्याजवरून २०००० नारळ यासी सोडिले आहेती. शिवाय त्यांनीं अर्ज केला कीं, आम्हांस गांवांची उगवणी संचणी चाकरी बहूत पडते. हकाची विल्हे करून दिली पाहिजे म्हणोन मजकूर घातला. येसियासी साल गुदस्ता तागाइत यांसी हक्क एकंदर ४२५ लारी चालत आहेत. तरी यापुढें एकंदर ५६० लाहारी दस्ती जाजती हकदार जमा धरुन हक देत जाणे. अवघे याचेमध्यें आलें.

फा. सा. खं. १ ले. ७३ } (२७४१) { श. १५९५-९६
हि. १०८४ } { इ. १६७३-७४

मुस्लिसखानानें कचेरी बांधली. या प्रदेशाची भरभराट तिच्यामुळें झाली. तिच्या पूर्ण होण्याचें साल उबेदीनें सांगितलें कीं, 'हा पाया त्याचें स्मरण करविणारा झाला.'

सा. ४ ले. ७४६ } (२७४२) { श. १५९६ वैशाख वद्य १४
सु. १०७५ सफर २७ } खुर्दखत { इ. १६७४ मे २४

सैद मखदूम शर्जाखान—कारकून व देसमूख परगणे वाई.

सिदोजी बिन गंगाजी विश्वासराऊ नाइकवाडी किरदत चाकर ठाणे परगणे मजकूर. याचा वाप साहेब कामावरी येल्तयांरी करून चीज जाले आहे. सबब यास अजरामऱ्हामती करून ठाणाचे हसमामध्यें जमा करूम एकसे साडेचौऱ्यासी १८४॥ होनू यासी तनखा मौजे चांदक संमत हवेलीपैकीं देविले असे. माहाली गणती होऊन सद्‌रहू इस्तावा रुजू करून ठाणा चाकरी घेऊन आदा करीत जाणे.

पे. द. ३१ ले. ३३ } (२७४३) { श. १५९६ ज्येष्ठ शु. १३
शक } जावता { इ. १६७४ जून ६

राज्यसंस्थान इंद्रप्रस्थ ऊर्फ दिल्ली येथ पातशाई तर्फ येथील ऐकंदर बेवीस सुभेचा जमाखर्च शतकोटीचा होत आला.

२३८०४६२३१ ऐन जमा रसद
४६०००००००० जकायत महालानी व समुद्र किनारा बंदर गलबत
१००००००००० मोतर्फा दरजमा फाव्हा वगैरे नस्त
११०००००००० नजराणा

---

१००८०४६२३१ एकूण जमा
[ ५६०००००० सिवाय जमा ]

---

१८२७७७२४६ सुभा दक्षण सुमार ६

---

१५५२६८९८५ सुभा हिंदुस्थान सुमार १६
७६०७९१४२॥ सुभा दारुलजाफर ऊर्फ विज्यापुरी
७७२०२७८।= सुभा बेदर १॥ पैकी १
१२२७७९६८– सुभा आलजपूर देश वराड १
१२७६३२४२॥ सुभा आवरंगाबाद शहर १
५८७५१३१ सुभा खानदेश १
९५७४९२२५०० सुभा हैद्राबाद

खर्च सुभा महालानी
५००००००० देवस्थान व मसीद काजी व फकीर खैरात जमिनीवद्दल
६००००००० देशक व मोकद्दम इनाम जमिनीबद्दल माहालातिहाय
३३००००००० जमीदार व हकदार व गांव निसबत सादिलवार वगैरे जप्ती खर्च

पैकी हुजूर सरकारी खर्च
१००००००० खैरात खर्च खासास्वारी
२२०००००००० वजीर व उमराव यांचें परवेगमीस सरजामाकडे

फा. सा. खं. २ ले. १३ } (२७४४) {श. १५९६ ज्येष्ठ शुद्ध १४
सु. १०७४ हि. १०८५ रबल १२ } {इ. १६७४ जून ७

सिकंदर आदिलशाह—

शाह हजरत हवालदार व कारकून मामले मुहम्मदपूर.

अलीखान दाऊदखान याजकडे असलेली, मामले मजकूरमधील समता व पेठ मुबारकपूर यांच्या पाटेलगीची मिरास सिद्धी अबदुल अझीद यास दिली आहे. तरी ती त्याजकडे वंशपरंपरेनें चालवावी.

बॉंबे अँड सीड़ीज नं. १० } (२७४५) {श. १५९६ श्रावण वद्य १४
इ. } {इ. १६७४ आगस्ट २०

( मुंबई – सुरत )

सिद्धी संबूळ याच्याबद्दल तुम्हाला आम्ही वारंवार लिहिले आहेच. सुरत व मोगल साम्राज्याच्या बाबतींतील आमच्या परावलंबित्वाचा फायदा घेऊन त्यानें या पावसाळ्यामध्यें आपल्या जहाजांना नांगरण्याकरितां माजगांव येथे जागा देण्याबद्दल अगदीं भागच पाडले. या प्रकरणांत आम्हाला कोणच्या प्रकारचा सासुरवास भोगावा लागला हे सर्व 'कन्सलटेशन' बुकांत आपल्याला पहायला मिळेलच. आम्ही ही मूकवृत्ती धारण करतों याचें खरें कारण म्हणजे, तो व त्याचे लोक जो कांहीं पैसा येथें खर्च करितात त्यामुळें आपले येथील लोक खूप गबर होत चालले आहेत.

फा. सा. खं. १ ले. ६४ } (२७४६) { श. १५९६ आश्विन वद्य १
हि. १०८५ रजब १४ } { इ. १६७४ आक्टोबर ५

कुतुबशाह—खैरुद्दीन मुहम्मद

विठोजी तुकोजी घोरपडे यानें गादीचा भार वाहणाऱ्याकडून अर्ज केला कीं, पूर्वीपासून परगणे कतकुंयापैकीं वेलेर हा गाव स्वतःच्या कामाचा पगार १००० होन, खासखैलीचा वाटा ११९ होन ३॥ डुगल, दिवाणची तलब १३॥ होन व वरंगळच्या बाबी १५३ होन, एकूण १३६६ होन ३ डुगल इतक्या पैशांबद्दल चालूं होता व पूर्वी मुहम्मदानगर समतेपैकीं चरोपली हा गाव ४५५ होनांबद्दल चालूं होता. सध्यां चरोपली गाव अमानत केला आहे. वेलेर हा गाव हि. १०७१ पासून त्याच्या कामाबद्दल त्याजकडे चालूं असल्याचें फर्मान सादर झालें होतें. असें असतां खैरुद्दीन मुहम्मदाच्या मुतालिकांनीं संबंध नसतां गेल्यासालीं शिरजोरीनें वेलेरच्या रयतेस पकडून नेऊन जबरदस्तीनें १५३ होन घेतले आहेत व यंदाही तोच क्रम चालूं आहे. म्हणून हुकूम होत आहे कीं, वरील गांव दिवाण तलब व सर्व बाबी यांसह विठोजीकडे कामाचा पगार म्हणून चालू झालेला आहे.

तुमच्या मुतालिकांनीं असा उर्मटपणा करावा हें केवढें धार्ष्ट्य. आतां हें फर्मान पोहोंचतांच स्वतःच्या मुतालिकांना ताकीद करून मागील सालीं व यंदा वेलेर गांवापासून जें कांहीं घेतलें असेल तें त्या लोकांस समक्ष परत द्यावें व कैदेंतील लोकांना सोडून देऊन अशी ताकीद करावी कीं, पुढें त्या गांवास कोणत्याहि गोष्टींची तसदी न लागतां तो गांव सुरळीत राहील. या बाबतींत ताकीद जाणून फर्मानाप्रमाणें चालावें.

सा. ३ ले. ३९९} (१७४७) {श. १५९६ कार्तीक शुद्ध १०
{इ. १६७४ आगष्ट २९

शिवाजी राजे याणी निजामशाही किले पुरंधर येथील नाईकवाडी निलोनीलकंठराव ( हे नलिकंठराऊ किला बलकाऊन, भोवतालचा मुलूख मारून, खंडणी व हाक दस्तुरी होती ती घेऊन इनामगांवीं राहात होते ) त्यांस पत्र पाठविले कीं, ' आम्हाजवळ वडिली दादो कोडादव ठेऊन दिल्हे होते ते मृत्यु पावले. आता आम्ही निराश्रित जालो.'तुमचा व आमच्या वाडिलांचा बहुत घरोबा स्नेह यास्तव किल्ल्याचे आश्रयाने माचीजवळ येऊन राहू व तुम्ही सांगाल तैसी वर्तणूक करीत जाऊं. ह्या पत्रास त्याणी उत्तर पाठविलें कीं, " उत्तम आहे; पर, आम्ही, किला, तुमचा आहे, दुसरा विच्यार नाही. आपण यावें. " उत्तर येताच स्त्रीस, जिजाईस सांगून २५ ह. मावले, पागा घेऊन गडाखाली येऊन राहिले. पावसाळा तेथें छावणी केली. निलो, पिलाजी व संकराजी असे तिघे बंधु. पैकी वडील निलोजी किल्ल्याचा कारभार करीत होते. शंकराजी सर्वांत धाकटे ह्यांस शिवाजी राजे याजपाशी ठेविले. शिवाजीचा व त्याचा लोभ जडला. शंकराजीनें येकांतीं आपलें मनोगत शिवाजीस सांगितलें कीं, किल्ल्याची वतनी चाकरी माझा वाटा मला माझे बंधु देत नाहींत व काही कामकाज सांगत नाहींत तरी तो वाटा मिळ्वून द्यावा. शिवाजीनें तें मान्य केलें व तुमचा बंदोबस्त करून देऊं असें म्हटलें. इताकि यामध्यें दिपवालीचा सण आला म्हणून शंकराजीस निलोजीनें सांगून पाठविलें कीं, उदैक सणास किल्ल्यावर निरोप घेऊन यावें. शंकराजीनें ह्यावर कळविलें कीं, आम्हांस येकट्यास येतां येत नाहीं. राजयाचा प्यार मजवर बहुत, नित्य भोजन एके ठिकाणी करतो. शिवाय शहाजीराजे यांचा व आपला बहूत घरोबा होता. त्यांचे पुत्रास व स्त्रीस टाकून कैसें यावें. मग निलोजीलाहि हें बरोबरच आहे असें वाटून त्यानी जिजाऊ व शिवाजी राजे यांस दहावीस मानकऱ्यांसह आमंत्रणें सांगून घेऊन यावें असें शंकराजीस निरोप पाठविला. त्याप्रमाणें शंकराजीनें शिवाजीस निमंत्रण दिले. पण शिवाजी म्हणाला; आम्हांस लोकांस टाकून येतां नये. येथें आम्ही सण करूं तुमचेच आहे.शिवाजीचें म्हणणें शंकरजीनें किल्यावर पुनः कळविलें.ते समई तियानी,

विचार केला जे शहाजी राज्याचा आपला स्नेह घरोबा, त्यास टाकून आपण सण करावा हें उचित नाहीं. यास्तव कुल लोकासुधा यावें म्हणून शंकराजीस गडाखालीं पाठविले. मग हे गडावर कुल गेले. जागोजाग लोक उतरविले. तीन दिवस नाहाणें व भोजनें केली. लोकसुधा जेवणें घातली. समारंभ केला. आग्रह करून भाऊबीजेसाठीं राहविले. रात्रीस निलोजी नीलकंठराप स्त्रीसुद्धां निद्रा केली. पिलाजी व शंकराजी येकत्र होऊन राज्यास वर्तमान सांगोन निलोजीस कैद करावे आणि आपणाकडे किला द्यावा. येकानें किलेदारी करावी येकानें राज्याजवळ असावे. पूर्वींहि संकराजींनीं खास बंदोबस्तासाठीं विनंति केलीच होती. त्यावरून राज्यानी खासे बारगीर पंचवीस देऊन बेडी निलोजीच्या पायात घालावयास सागितली. मागे याणी विच्यार केला. नंतर या उभयताचेहि पायात बेड्या घालून आपण किला घ्यावा. झोपेमध्ये दगा करून पायात बेड्या घालून कैद करून राज्यास वर्तमान सागितले. राजे ऐकोन बोलले, किल्याचा बंदोबस्त आह्मासच करावा लागतो. तुह्मी त्यांचेच पंक्तीस बसावे. बोलोन बेड्या ठोकून दरवाज्यावर आपले लोक बसवून बंदोबस्ती केली. त्यांचे लोक व बायका गडाखाली लाऊन दिल्या, सर्व मालमत्ता जप्त केली. खजिना पुष्कळ सापडला. तीन दिवस तिचे भाऊ कैदेत होते. चवथे दिवसी बंद खुलास करुन गांव इनाम वस्त्रे देऊन समाधान केले.

| | | |
|---|---|---|
| सं. सा. खं. १ ले. ११४<br>फ. १०८४ रमजान ५ | (२७४८)<br>महजर | श. १५९६ मार्ग. शुद्ध ७<br>इ. १६७४ नोव्हेंबर २४ |

कवजी पाटील व मुजारी मौजे मोहाडी प्रगणे दिंडोरी यानी मौजे मजकूरचे सिवेमधे वानगंगामध्ये बांद बांधोन मौजे मजकुराच्या सिवारात पाणी नेऊन काही बागाईत करून आबादानीची पैरवी करावी म्हणोन उमेदवारी धरून काम सुरू केले. ऐसियासी मौजे जाणोरकर मोकदम येऊन कामास हरकती केली आहे की येथें बांद बांधलियाणें आपल्या बांदास पाणी कमी होईल; बदल बांद बांधो नेदू. यावरून हुकूम महाराज साहेबजीचा जाला जे, काजी व दारोगे व मुश्रीफ अदालत व फौजदार व सेकदार, गुमास्ते, देशमूख, देशपांडे, मोकदम येश करकशाच्या जागा जाऊन मुशकस करणें. यावरून सदरहू मुदसदी व जमीदार येऊन नजरेस पाहून सागितले की जाणोरकराची हरकत नाहक दिसते. मोहाडीस आबादानीची परवी होते. म्हणौन मुनसीफदारी मोहाडीच्या मोकदमास हुकूम केला की काम बाधारियाचे चाली लावणे. इ. इ.

| | | |
|---|---|---|
| पे. द. ३१ ले. ३५<br>फ. १०८५ जिल्कादी २१ | (२७४९)<br>श्रीत्रिंबकराज, श्रीगणेश | श. १५९६ माघ व. ८<br>इ. १६७५ फेब्रु. ७ |

रा. शरीफजी राजे—माहादेवभट मेघशामभट.

. तुम्ही आमचे तीर्थपुरोहित. रा. राजेसाहेबाचे वरशासन होतें मनसफ जालियावरी आपनापासी आलेत. तु श्रींस प्रतेह अभिशक करीत जाणे १०८५ पासुनु रु. ४८ देत जाऊनु.

पे. द. ३१ ले. ३४ } (२७५०) { श. १५९६ माघ व. १२
फ. १०८५ जिल्काद २५ } श्री त्रिंबकराज { इ. १६७५ फेब्रु. ११

रा. शरीफजी राजे भोसले—नीलकंठ गंगाधर भट त्रिंबककर

तुम्हास मनसुफेचे पूर्वी प्रतेह दोडशत लिंगे करीत जाणे म्हणून सांगितले होतें. सालास रु. २५ देऊनु पैसे बोलिला होतो. यावर आपनास मनसफ जाली आता १०८५ पासुनु वरशासन रु. १०० केले आसेती. तुम्ही श्रीची पूजा व लिंगे ५० दररोज आमचे नावे करीत जाणे.

फा.सा.खं. १ ले. ३० सु. १०७५ } (२७५१) { श. १५९६ फाल्गुन शुद्ध १५
हि. १०८५ जिल्हेज १३ } { इ. १६७५ मार्च १

२ रा अली आदिलशाह—देसाई परगणे कागल

हरी अमीनराव मजलसी हे खात असलेलें, मौजे जमगांव, कर्यात मुरगूर, परगणे कागल, हें गांव राव दियानतराव मजलसी यास तंबाकू, भेट, करगोटा व इनाम यांखेरीज इतर हकांसह इनाम दिलें आहे. तरी तें त्याच्या ताब्यांत देणें.

प. द. ३१ ले. १८५ } (२७५२) { श. १५९७ वै. शु. १
श. } { इ. १६७५ एप्रील १६

आपाजी नामदेऊ लांडे—बाबाजीराम होनप देशपांडे परगणा पुणा.

आपला बाप नामाजी लांडा तुमच्या वडिली तरफ कर्याती मावळची देस-कुलकर्णाची गुमास्तगिरी देऊन ठेविला असतां तुमचा हक व लाजिमा व कागदांचा सिरस्ता तुमच्या वडिलांस देत गेला आहे. आपण तुम्हासी नजर बदलून तुमचा हक वगैरे शिरस्ता द्यावा तो दिधला नाहीं. म्हणऊन तुम्ही आपल्या गला पडोन आपणास पदरी धरिले ते वस्ती किले सिहगडीचे छावणीबदल उदयेभान राठोडी किलेदार त्याणी मावलचे देसमुख, मोकदम, कुलकर्णी किलियास बोलाविले. त्यास आपण दरम्याने घालून आपला अन्याये मागोन घेऊन आपणास संतोसे ठेवाल तरी राहोन. दूर कराल ते वस्ती उजूर न करूं.

ता. ३ ले. ४०१ } (२७५३) { श. १५९७ वैशाख व. ५
सु. १०७५ सफर १८ } { इ. १६७५ मे ४

संभाजी राजे—रावो बलाल सुभेदार जुनर.

पुणे तरफेस मिरासपटी हुजरून तो घातलीच नाही. मावलावरी पटिया

घातलिया त्या कारबारी देशमुख व देशकुलकर्णी व पाटील व गाऊकुलकर्णी यावरी पटी घातली. की हकदक खाताती, काही गुंन्यास करताती. येसियासी इनामदारास पटी घ्यावयाची काये गरज ? त्यांहीमधे पुणेतर्फेस मिरासपटी घातली नसता निलोजी नीलकंठराऊ इ.याचा इनाम मौजे चांबलीस आहे त्यावर रायो भास्कराने पटी घातली तरी त्यास येक कागद लेहून देणे व त्यांचे वाटे नव जाणे. ज्या माहालास घातली तेथे इनामदारास हिसावीने घ्यावे याचा तह आहे.

| | | |
|---|---|---|
| सा. ३ ले. ४०० <br> सु. १०७५ सफर १८ | (२७५३) <br> ताकीदपत्र | श. १५९७ वैशाख व. ५ <br> इ. १६७५ मे ४ |

संभाजी राजे—रायो भास्कर सरहवालदार व कारकन परगणे पुणा.

निलोजी व शंकराजी व विसाजी व त्र्यंबक यासी मौजे चांबिली (तर्फ कन्हेपठार परगणे मजकूर) येथें कासटका येक आहे. त्यावरी तुम्ही मिरासपटी पंचवीस होनु मागता. तरी परगणे मजकुरावरी मिरासपटी घातली नसता उगेच आपले भातेने पैके मागता हे कोण स्वेश. येक रुकेयांची तसवीस न देणे. आजीतागायत त्याचे इनामास पेशजी रुका घेतला नाही तसवीस लागली नाही. पेस्तरहि तुम्ही मिरास व हरयक बाबे तसवीस न देणे.

| | | |
|---|---|---|
| सा. ३ ले. ४०२ | (२७५५) | श. १५९७ ज्येष्ठ शु. २ <br> इ. १६७५ मे १७ |

रायो बलाल—विसाजी नीलकंठ राऊ.

चांबलीस इनाम आहे त्यावर इनामती खडणी घेतले न पाहिजे म्हणौउनु गोसावी लिहिले. तरी रायो भास्कराचा मजमूदार मोरो निवाजी त्यास रोखा करून होनु घेतील ते दूर कराविले असेती.

| | | |
|---|---|---|
| बाँबे अँड सर्दिज नं. ११ <br> इ. | (२७५६) | श. १५९७ आश्वीन वद्य ४ <br> इ. १६७५ सप्टेंबर २८ |

दण्डाराजपुरीच्या कुमकेला निघालेल्या जहाजांच्या काफिल्याला, पाणी, सर्पण वगैरे बाबतीत हरएक प्रकारची मदत तुम्ही त्याना करा. पण त्यांच्या मुख्याला तुम्ही कोणत्याही प्रकारची लूटमार व करणे व हर्णाई, कण्हेरी व चौल येथील गलबताना बंदरांत कोणच्याही प्रकारे त्रास न देता व आमच्या हक्काची पायमल्ली न होईल असें वर्तन करण्याबद्दल सक्त ताकीद द्या. आणि असें वर्तन झाल्यास आम्हाकडन कोणतीहि मदत होणार नाहीं, अशी समजही पण त्यांना द्या.

फा. सा. खं. १ ले. ६५ } (२७५७) { श. १५९७ कार्तिक वद्य १२
हि. १०८६ साबान २५ } { इ. १६७५ नोव्हेंबर ४

कुतुबशाह--नेगोजी व मुकुंदजी घोरपडे.

आमच्या कानावर आलें कीं, तुम्ही आपल्या स्वारांच्या जमेतीसह लतीफ-शाह याच्या बरोबर जाऊन शत्रूच्या अल्लूर पालमपेठ या गढीवर बसून तेथील हरामखोरांना योग्य शिक्षा केली. गनीम मोड होऊन पळून गेला व शत्रूची ती जागा काबिज झाली. विजयी लस्करापासून २ गांव अंतरावर असलेल्या एका गढींत हरामखोरांनीं तळ दिला आहे. ती गढी (ती वर जाऊन) तुम्ही घेऊं इच्छितां. तरी लतीफशाहशी संगनमत करून त्या गढीवर जावें, प्रयत्न करून ती ताब्यांत आणावी आणि शत्रूला नेस्तनाबूद करून सदिच्छा व्यक्त करावी म्हणजे उत्कर्ष केला जाईल. हें फर्मान मादो भानजी मुजुमदार याच्या परवानगीनें लिहिलें.

मु. घो. इ. प. अ. ले. २० } (२७५८) { श. १५९७ मार्गशीर्ष वद्य ६
सु. १०७६ हि.१०७९ रमजान २० } { इ. १६७५ नोव्हेंबर २८

[ कुतुबशाह ? ]—मालोजी राजे घोरपडे.

तुम्हीं आदिलशाहींत पुष्कळ मान्यता आणि सरकार कामास येऊन वजीरी मिळविली. तुमचे वाडवडील व तुम्ही एकदिलानें पुष्कळ दिवस सरकार चाकरी केली. या बाबतींत शिवाजी राजे भोसले यांनीं जाहीर केलें कीं, सध्यां अफ-गाणानें आदिलशाही हातीं घेतली आहे. तेव्हां आम्ही अफगाणाला तंबी देण्याचा इरादा केला आहे. आपण इज्जतदार मराठे सरदार आहां. आपल्या हातून मोठीं व उमदीं कामें झालीं आहेत व पुढेंही होतील, असा सरकारचा विश्वास आहे. तेव्हां तुम्हांस हुकूम सादर होत आहे कीं, तुम्ही सरंजाम व फौज घेऊन बेशक इकडे या. आदिलशाहींत प्रधानकीचे मरातब, मुलुख, जागीर व इतर जें कांहीं चालूं असेल तें इकडे चालूं राहील.

पे. द. ३१ ले. ४६ } (२७५९) { श. १५९८ चैत्र शु. ५
राज्या. शक २ } { इ. १६७६ मार्च ९

[ राजाज्ञा ]--सईबाई कोम बाबाजी नारायेण व गोपाळ राम लाळे जोसी कुलकर्णी मौजे केंजळ किकवी पाडे साबरदर राजापूरतर्फे निरथडी प्रगणे पुणे. कान भट बिन विश्वनाथभट तुमचा हाडभाऊ म्हणून कजिया करीत होता तरी देशमुख-देशपाडिये बैसोन पाटील चौगुले व बलुते आणून शफतपूर्वक पुसता कानभटाचा वृत्तीसी समध नाही. वृत्तीमुळें कजिया जाला होता तेसमई मागे याने पाठी राखून कयास आला आहे. याजमुळे यासी काय देणे ते सुसरूप दिल्हे पाहिजे. येन्हवी यासी वृत्तीसी संबंध नाहीं. त्यावरून त्यास नारो अनत लाले यानी नीलकठराऊ

व .बोकील चाद्वडकराचे उपाधेपणाची तकसीम करार करून देऊन भटमंज-कुराचे येजितखत लेहून घेऊन तुम्हास दिल्हे आहेत. तरी पत्राप्रमाणे वर्तावयासी हें पत्र दिल्हे असे. आपली वंशपरंपरा वृत्ति अनभऊन सुखरूप असणे.

पे. द. ३१ ले. ३७ } (१७६०) { श. १५९८ ज्येष्ठ शु. ५
सु. १०७७ रवल ४ } { इ. १६७६ मे ८

अनाजी दतो—त्रिंबक गोपाळ सुबेदार व कारकून परगणे पुणे.

नीलकंठराऊ यांचा इनाम साल दस्तोप्रमाणे साल मजकुरी जालवणे.

सा. ४ ले. ६८५ } (२७६१) { श. १५९८ आषाढ वद्य ७
सु. १०७७ रखर २० } { इ. १६७६ जून २२

राजश्री शिवाजी राजे—कोनेरी रंगनाथ सुबेदार व कारकून सुबा तर्फ कल्याण.

श्री–देव यांचेथे अनव्यय बहुत आहे. तीस त्यांचे बैल पेण, पणवेली, नागोठणे येथे जातात. मीठ नेतात. त्यांचे पैके कोण्ही घेत नाहीं. म्हणून श्रीने सनद पाहिजे म्हणून सांगून पाठविले. याउपरी फुकट मीट कोण्हापासून घ्यावयास यावयास गरज नाहीं. मीठ केली दहा सेरी गल्याचे ४ खंडी रास देणे ते पेणचेच बंदरीहून यास दिवाणीचे मिठापैकी दरसाल देणें. खर्च लिहिणे. दरसाल ताजा सनदेचा उजूर न करणें.

सा. ४ ले. ६८३ } (२७६२) { श. १५९८ आषाढ वद्य ७
सु. १०७७ रखर २० } { इ. १६७६ जून २२

—कारकून व देसमुखानी तर्फ पोनमावळ.

श्री–चिंचवड येथें श्रीप्रीत्यर्थ अनव्यय होतो. त्याकारणे टके ४१२॥ रास घेऊन रयत निसबतीने खरेदी देत आले आहां. सालमजकुरी साहेबांनी श्रीचे कार्य म्हणून व धारण सवंग ये गोस्टीकरितां सनद देविली. दिवसोदिवस धारण महाग होत आली. रयतनिसबत खरेदी श्रीची घ्यावया व यावया साल मजकुरापासून निसबत नाहीं. रयतेपासून हे खरेदी देवयाची तरी बटाईचा मुलूक. रयतीस बटाई खेरीज सादिलवार पटी, खरेदीचे नुकसानपटी यावया हे कैसी दिल्ही जाते. म्हणून साहेबांनी श्री आपले तर्फेने देविले असे. साडेसततीस टके किमत होते. श्री पाठवून देतील ते जमा करणे. जितके नुकसान येतील ते साहेबी कबूल करून जिनस देविले असेति. दरसाल याप्रमाणें इस्तकबिल साल मज-कुरपासून देत जाणे. ताजा सनदेचा उजूर करीत न जाणे. धारण महाग हो सवंग हो येणेप्रमाणेच पैके घेत जाणे, जिनसा देत जाणे.

सा. ४ ले. ६८४ }        (२७६३)        { श. १५९८ आषाढ वद्य ८
सु. १०७७ रबर २१ }        { इ. १६७६ जून २३

राजश्री शिवाजी—रावो बलाल सुबेदार संमत जुन्नर व माहालहाय.

श्री—चिंचवड येथें श्रीप्रीत्यर्थ अनाचा व्यय करितां धान्य, रयतीकडून सवंग खरीदी म्हणून किंमत देऊनू घेत आले असती. पहिली धारण सवंग, आतां रयतेस ते गोष्टी जड वाटते. हाली धारण बहुतच माहाग जाहाले. वरकड नुकसान व रयतेनें पट्टी करून घ्यावी हेहि गोस्टीने तीस जलल पडते. म्हणून जरूर ते धान्य श्रीस देत जाणे. खुर्दा टके ६७५ श्री—देव दरसाल पाठवून देतील तो दोही महाली जमा करणें. श्री—देवापासून किमती येतील त्यास आणि खरेदी केले बेरजीस नुकसान पडते ते साहिबी कबूल केले असे. येणेप्रमाणे दरसाल याच सनदेवरून, धारण पेस्तर महाग हो अगर सवंग हो, चालविणे.

सा. ४ ले. ६९२ }        (२७६४)        { श. १५९८ अ. श्रावण वद्य ५
फ. १०८६ व शक }        महजरनामा        { इ. १६७६ जुलै १९

गिरमाजी मोकदम इत्यादि व समस्त दहाजण मौजे देहुणे परगणे नीवासे—
आताजी व राधाजी त्रिमल सबनीस परगणे संगमेनर हाली वस्ती हिंगणेगौऊ.

आपले गावी मिरासीदार कुलकर्णी होते कालदुकाले बुडले. पुढे दाहापाच वरसे कोनेरी व आउजी यांचे हवाला कुलकर्णपण केले होते. त्यावरी परगणा नवाब बाहदुरखान यासी जाहगीर जाला. प्रजा नाबुवान जालिया, बाकी देवयासी जागा नाहीं. साहेबी जबरदस्ती बाकी सुटत नाहीं. कुल्कर्ण विकोन बाकी देण्याचा तलास मांडला. कोणी तयार होत नाहीं. तरी तुम्हास मौजे मजकुरीचे कुल्कर्ण दिधले असे. किंमत रुा १२५० घेऊन फारीक जालो. जे सुदामत (वहिवाट) आहे ते तुम्हास दिधले असे. पांढरीवर घर बांधोन सुखे राहाणे. तुम्ही सुखे मिरासी लेकराचेलेकरी खाणे.

पे. द. ३१ ले. ३८ }        (२७६५)        { श. १५९८ माघ वद्य ८
रा. श. ३ नल }        { इ १६७७ फेब्रुवारी १५

श्री राजा शिवछत्रपति—त्र्यंबक गोपाल देशाधिकारी परगणे पुणे.

बाबाजीराम देसकुलकर्णी परगणे मजकूर मोगलाईत गेल्यामुळे त्यांचे मिरास तकसीम व हक लवाजिमा व इनामत वगैरे अमानत केले होते. हाली निराजी पंडित याणी लिहिल्यावरून त्यावरी कृपा करून अभयपत्र दिल्हे असे की, सुखे वतनावरी येणे. मशारनिलेचे देसकुलकर्ण मिरास हक लवाजिमा व इनामती वगैरे त्यांचे त्यांचे दुमाले केले असे. दुमाले करणे.

सा. ४ ले. ७३३ } (२७६६) {श. १५९९ वैशाख व. ७
राज्या. श. ४ सु.१०७९ } छुर्दुखत {इ. १६७७ मे ३

श्री राजा शिव छत्रपती—गणोराम देशाधिकारी तर्फ कुडाल.

मौनीबावा पाटगांव यांच्याकडे येणाऱ्या आतीतआभ्यागताबद्दल प्रतिवर्षी येक हजार माणसाची सामग्री देविली आहे. दर माणसास येकदा अन पावावे म्हणून

| तादूल वजन सडीक | कणीक व. | डाली वजन | तुप वजन | मीठ वजन |
|---|---|---|---|---|
| ००१॥ | ००३॥ | ००॥ | ००।• | ०००९ |

येकूण पाउणेच्यारी सेर नवटाक रास याप्रमाणें हाजार माणसाची बेरीज होईल ते साल तिसासबैन पासून तुरुतागिरीपासी वर्षामध्ये एकदा एकथोक देणे.

मॉडर्नरिव्ह्यू. १९२४ } (२७६७) {श. १५९९ ज्येष्ठ शु. ६ ते माघ.
व्हा.३४ पृ. १५३-१५५ } रोजनिशी {इ. १६७७ मे २७ ते १६७८ फेब्रु.

[ मार्टिन हा पाँडिचरी येथील फ्रेंच वखारीचा मुख्य होता. शिवाजीनें कर्नाटकच्या स्वारींत जिंजीस वेढा दिला त्यावेळीं मार्टिननें आपला ब्राह्मण वकील महाराजांच्याकडे पाठविला व त्या वकिलानें महाराजांची तीन वेळा गांठ घेतली; वगैरे हकीकत देणाऱ्या रोजनिशीचीं हस्तलिखित पानें पॅरीस येथील Archives Nationales या संग्रहांत T. 1169 या अनुक्रमांकांत आहेत. त्यांचें इंग्रजी भाषांतर सर जदुनाथ यानीं इ. १९२४ च्या मॉडर्न रिव्ह्यूमध्यें सारांश रूपानें प्रसिद्ध केलें. त्यांतील कांहीं महत्त्वाचा भाग येथें उद्धृत केला आहे. ]

शिवाजी जिंजी घेतो—

इ. स. १६७७ मे च्या शेवटीं शिवाजीच्या सैन्यांतून १००० स्वारांची पलटण येऊन तिनें जिंजीबाहेर तळ दिला. पलटणीचा मुख्य, नासीर महमद्‌खानाशीं, तहाच्या वाटाघाटी करण्याकरितां किल्ल्यांत गेला आणि तावडतोब तहाच्या अटी ठरल्या. नासीर महंमदानें, कांहीं रोकड रक्कम व ५०,००० रु. ची वार्षिक उत्पन्नाची वंशपरंपरा जहागीर घेऊन किल्ला शिवाजीचे ताब्यांत देण्यास कबुली दिली.

अशा तऱ्हेनें, जिंजी हस्तगत करण्याची योजना आंखल्यावर शिवाजी वेलोरवर चालून गेला. तेथें विजापूर दरबारतर्फे एक शिद्दी अधिकारी होता. या अधिकाऱ्याला नासीर महम्मदानें शिवाजीशीं तह करण्याबाबत गळ घातली होती, “ पण असल्या भ्याड वृत्तीचें अनुकरण करणार नाहीं ” असा स्पष्ट नकार नासीर महम्मदास त्यानें दिला. जिंजीच्या तहानुसार, नासीर महम्मदाला, गोवळ-

कोंडा राज्यांतील कांहीं मुलूख वाटणीला आला होता. पण तो मुलूख त्याला मिळेना. कारण "जिंजी काबीज केल्यावर तो किल्ला गोवळकोंडेकरांच्या अधिकारांच्या ताब्यांत शिवाजीनें दिला नाहीं" या सबबीवर गोवळकोंड्याचे अधिकारीहि नासीर महंमदाला आपल्यापैकीं कोणताहि मुलूख देईनात. "तहांतील अटीप्रमाणें बिचाऱ्या नाझीर महंमदाच्या वाटणीस म्हणण्यासारखें कांहींच आलें नाहीं; व अशा तऱ्हेनें "आपल्या पूर्व वैभवाला आपण नाहक मुकलों" या दुःखप्रद जाणिवेनें तो झुरणीला लागला व थोड्याच काळांत मरण पावला.

शिवाजी, तिरुवाडी येथें शेरखान लोदीचा पराभव करतो—

कार्यक्षम अशा अधिकाऱ्यांच्या ताब्यांत असलेल्या वेलोरच्या बळकट किल्ल्यावर आपलें सैन्य रवाना करून; शिवाजी, दक्षिणेच्या बाजूला शेरखानावर चालून गेला. ता. २० जूनच्या सुमारास, पॉडिचरी येथून २४ मैलांवर असलेल्या तिरुवाडी या ठिकाणीं, शेरखान लोदी ससैन्य दाखल झाला. मराठ्यांचें ६००० घोडदळ होतें. व शेरखानाकडे ९००० स्वार (येथें खरे ४००० च असावेतसें वाटतें) किंवा ३–४ हजार पायदळ होतें. पण या सर्व बाजारबुणग्या शेंदाड शिपायांना शिवाजीचें इतकें भय वाटे कीं त्याचें नांव ऐकल्यावरोबर ते थरथर कापूं लागत. राजकारणाचे डाव खेळण्याला लायक पण युद्धावर जाण्यास नेभळट अशा सरदारांपैकीं शेरखान हा होता. शिवाय, तो नेहमीं शिवाजीच्या सैन्यसामुग्रीबद्दल तुच्छता दाखविणाऱ्या ब्राह्मणांच्या तंत्रानें वागत असे; हाहि एक मोठा दोष त्याच्यांत होता.

मराठ्यांचा सेनापती तिरुवाडीजवळ ता. ६ जुलैला येऊन दाखल झाला. हें पाहून त्यानें आपल्या लोकांना युद्धाची तयारी करून चालून जाण्यास आज्ञा दिली. शिवाजीचे लोक कोणत्याहि प्रकारची हालचाल न करतां हल्ल्याची वाट पहात स्वस्थ राहिले. या त्यांच्या तटस्थ वृत्तीवरून शेरखानाला आपण कांहीं चुकीचें धोरण स्वीकारीत आहों असें वाटून आपल्या सैन्यास माघारीं येण्यास त्यानें फर्माविलें. लढाई होईल असा शिवाजीचा कयास होता पण ही नसतीच धामधूम व घोटाळा झालेला पाहातांच त्यानें आपल्या सैन्यानिशीं निकराचा हल्ला चढविला व आज्ञेप्रमाणें मागें फिरण्याचें बाजूला राहून, शेरखानाचें सैन्य वाट फुटेल तिकडे पळूं लागलें. मराठ्यांनीं हल्ला केला व शत्रूची पांगापांग झाली. आपला पुत्र इब्राहिम, व कांहीं सरदार बरोबर घेऊन शेरखान मोठ्या शिकस्तीनें पळून चालला होता. पण त्याला पकडून युद्धाचा शेवट लावावयाचा या हेतूनें शिवाजीनें त्याचा कसून पाठलाग सुरू केला. दुसरे दिवशीं कसाबसा तो बोनागिरपट्टमच्या किल्ल्यांत येतो न येतो तोंच मराठ्यांनीं किल्ल्याला वेढा दिला. ता. ९ या दिवशीं वालदुर, तेवेनापट्टम (कुडालोर) इत्यादी किल्ले तेथील लोक भिऊन पळाल्यामुळें मराठ्यांना अनायासें मिळाले.

आपल्या प्रांतांतील सर्व मुलूख २०,००० रोकड होन देऊन व आपला मुलगा ओलीस म्हणून ठेवण्याचें कबूल करून ता. १५ जुलै रोजीं शेरखान शिवाजीशीं तह करण्यास तयार झाला. शिवाजीनेंहि त्याची मुक्तता करून त्याला गोंडेलूर किल्ल्यांतील सर्व मालमत्ता देण्याचें कबूल केलें. तहाच्या अटी ठरल्यावर शेरखान बोनागिरपट्टमहून शिवाजीला भेटण्यास आला. शिवाजीनेंहि त्याचा अत्यंत लोभपुरःसर परामर्ष घेऊन त्याच्याबद्दल सहानुभूती प्रदर्शित केली. त्यानंतर शेरखान अरियालुरच्या अरण्यांत निघून गेला.

त्यानें आपल्याबरोबरच्या बाडबिछाडांत बरीचशीं मौल्यवान रत्नें गुप्तपणें दाबून ठेवलीं होतीं; विशेषतः त्याच्या बेगमेच्या अंगावर सरासरी १ लाख रुपयांचे जडजवाहीर असावें अशी जरी पुष्कळांची समजूत होती तरी पण वास्तविक २०,००० होनांची भरती करणें हें त्याला अगदीं मुष्किल होतें. अरियालूरच्या नायकानें त्याचें अत्यंत आस्थापूर्वक स्वागत केलें. व त्याला खर्चासाठीं सुमारें १५०० रु. वार्षिक उत्पन्न येणारीं दोन खेडीं लाऊन दिलीं.

शेवटीं एकदां (फेब्रुआरी १६७८) त्या प्रांतांतील राजांना शेरखानाची करुणा येऊन त्यांनीं स्वेच्छेनें २० हजार होन उभारले. व वारंवार रकम भरपाईबद्दल मराठ्यांकडून जाच सोसत असलेला त्याचा पुत्र इब्राहिम याला त्यांनीं सोडवून आणलें.

आपला आश्रयदाता बहलोलखान येऊन आपल्या मदतीस सैन्य पाठवील या आशेवर शेरखान जीव धरून होता. परंतु खुद्द विजापुरांतच सरदारांत यादवी माजली होती. व बहलोलखान २३ डिसेंबर १६७७ (Old style) ला मेला. फेब्रुआरीमध्यें कर्नाटकांतील शिवाजीच्या वकिलानें शेरखानाबरोबर सलोख्याचे बोलणें सुरू केलें. शेरखानाबद्दल तेथील छोट्या संस्थानिकांना फार सहानुभूती होती व त्याच्या हीन अवस्थेबद्दल त्यांना अत्यंत विषाद वाटत होता आणि त्याला त्याचे पूर्व वैभवावर स्थापन करण्याची संधीच ते पहात होते. शिवाजीनें त्याला गोंडेलोरच्या किल्ल्याचें पूर्ण स्वामित्व दिलें व तेथें व्यापार करण्यासहि पूर्ण मुभा दिली. आणि एक महिन्यानंतर, शिवाजीनें त्यास आपल्या नोकरीस येण्यास सांगितलें. पण विजापुराहून आपणाला मदत येऊन आपले पूर्व वैभव आपल्याला परत मिळेल या आशेवर त्यानें शिवाजीला नकार दिला. व शेवटीं तो मदुरानायकाकडे त्रिचनापल्लीला येऊन दाखल झाला.

शिवाजी व त्याचा भाऊ व्यंकोजी यांचीं भेट—

वडिलार्जित मिळकतीबद्दल वारसा हक्क शाबित करण्याबद्दल शिवाजीचा सावत्रभाऊ व्यंकोजी याचे व शिवाजीचे आतांपर्यंत खूप बोलणें वकिलांतर्फ झालें होतें. व्यंकोजी (याचा उल्लेख 'एकूजी' असा आहे.) च्या ताब्यांत

पूर्वी शिवाजीकडे असलेले जंजीचे ३ जिल्हे व वडिलार्जित मौल्यवान जंगम मालमत्ता होती. या बाबतींत आपली योग्य वाटणी मिळण्याबद्दल शिवाजीनें त्याला बरेंच वेळां लिहिलें व यादवी न करितां सलोख्यानें भागविण्याबद्दलाहे वेळोवेळीं सांगितलें. प्रथम व्यंकोजीनें याला संमति दाखविली नाहीं. मात्र भावाकडून स्वसंरक्षणाची शपथ घेऊन तो कोलेरुन नदी ओलांडून शिवाजीला भेटण्यास आला...' शिवाजी आपणाला सरळ परत जाऊं देणार नाहीं ' असें वाटून व्यंकोजीनें कपट रचलें. वरकरणीं "होय होय" म्हणून, तेथून पळून कसें जातां येईल याबद्दल तो प्रयत्न करूं लागला. एके रात्रीं तो कांहीं जरूरीच्या कामाकरितां कोलेरनच्या किनारीं आला. (त्याच्यावर पाळत ठेवली होती.) व त्याच्याकरतां तयार ठेवलेल्या एका तारफ्यावर बसून तो पैलतीराला घेऊन पोंचला. हा त्याचा स्वतःचा मुलुख होता व येथें त्याचें सैन्यहि होतें.

हें ऐकून शिवाजीनें आपल्या गोटांत असलेले व्यंकोजीचे बरेच लोक कैद केले. त्यांत व्यंकोजीचा बाणेदार सेनापती जगन्नाथ पंडित हा होता. व्यंकोजीच्या ताब्यांत असलेला जिंजीपैकीं कांहीं भाग शिवाजीनें आपणाकडे घेतला.

कोलेरुनच्या कांठीं शिवाजीचा जो तळ पडला होता तेथून अरियाळूर अरण्य अवघ्या ५०० पावलांवर होतें, व प्रत्येक रात्रीं या अरण्यांतील जनावरें चोरणारे लोक येऊन शिवाजीच्या सैन्यांतील घोडीं चोरून नेत असत. या बाबतींत शिवाजीनें अरियाळूरच्या नायकाला कळविलें. तेव्हां त्यानें शिवाजीची हेटाळणी केली व ते आपले प्रजाजन असल्याचा स्पष्ट इनकार केला. आगष्टच्या पहिल्या आठवड्यांत शिवाजीचे जवळजवळ ४०० ते ५०० घोडे चोरीला गेले. जरमेन व कॅंडल ह्या दोन फ्रेंच वकिलांनीं घोडे चोरण्याची एक अत्यंत धाडसी कल्पति पाहिली. हातांत विळा, चऱ्हाट व एक घाणेरडें कापड घेतलेला असा एक मनुष्य कुरण कापण्याच्या वेषांत मराठ्यांच्या तळांत शिरला. दुपार असल्यामुळें, घोड्यांना पायबंद लावून ते मेखांना बांधले होते; व सैनिक तेथेच जमिनीवर पडले होते व कांहीं जणांना झोपहि लागली होती. एक उमदा घोडा पाहून त्या इसमानें तत्काळ त्याचे पायबंद तोडले व हातांतल्या दोरानें मानेला फांस घालून व घोड्यावर उडी मारून स्वार होऊन तळाच्या बाहेर वायुवेगानें तो पळाला. याची मराठ्यांना वर्दी पोचावयाच्या आधींच तो अरण्यांत येऊन दाखल झाला होता.

व्यंकोजीला परत बोलाविण्याच्या फोल आशेवर विसंबून न राहातां शिवाजीनें आपला तळ तेथून हलवून दुसरीकडे नेला.

शिवाजीचा अत्यंत साधा शिपाइगिरीचा बाणा पाहून फ्रेंच लोकांना मोठें आश्चर्य वाटलें. मार्टिन आपल्या डायरींत लिहितो कीं 'शिवाजीच्या बरोबर

स्वारीमध्यें केव्हांहि बायकामुलें, पेटीपेटारे वगैरे कोणत्याहि प्रकारचा बादशाही बडेजाव नसे. जाडेजुडे व साधे असे फक्त दोनच तंबू असत. पैकीं छोटा एक स्वतःकरितां असे व दुसरा त्याच्या इतर सरदारांकरितां असे. शिवाजीच्या शिलेदारांना महिन्यास २ होन प्रमाणें मुशाहिरा मिळत असे. सर्व घोडे शिवाजीच्याच मालकीचे होते व त्यांकरितां त्यानें कांहीं मोतद्दारहि ठेविले होते. जलद हालचाली करता याव्या म्हणून प्रत्येकीं २ इसमामागें ३ घोडीं दिलीं जात. स्वारीवर खरी व उपयुक्त माहिती देणाऱ्या हेरांना तो सढळ हातानें देणग्या देत असे.

शिवाजीचीं कर्नाटकच्या स्वारींतील कृत्यें—

कर्नाटकांतील स्वारी शिवाजीला अगदीं सोपी गेली. फक्त वेलोर येथेंच जरा जास्त विरोध झाला. मार्टिन १६७७ च्या जुलैच्या शेवटीं लिहितो कीं "कोणत्याहि बाबींत शिवाजी सर्वसत्ताधीशाप्रमाणें वावरतो. शेरखानाच्या मुलुखांतून पळून आलेल्या लोकांना हाकलून लावण्याकरितां व योग्य तें काम न झाल्यास शासन करण्यांत येईल अशा आशयाचें एक पत्र त्यानें मद्रासच्या गव्हर्नरला पाठविलें होतें. पण गव्हर्नरानें शिवाजीचा उपहास केला. जे किल्ले संरक्षण करून कांहीं उपयोग होत नव्हता असे (त्या टापूंतले) पुष्कळ किल्ले त्यांनीं ओसाड करून टाकले व तेथील तोफा व शस्त्रास्त्रें जिंजीच्या किल्ल्यांत नेऊन ठेविलीं. शिवाजीनें बोनागिरपट्टमची पहाणी करून वरीलप्रमाणें त्याचाहि निकाल लावला. शिवाजीबरोबर आलेले गोवळकोंड्याचे पुष्कळ अधिकारी शिवाजीच्या सेवेंत राहिले. शिवाजीनेंहि त्यांना नेमणुका इनामे वगैरे दिलीं. शिवाजीच्या परवान्याशिवाय मुलुखांतून कोणाला प्रवास करतां येत नसे. शिवाजीनें पुष्कळ उंच डोंगरावर तटबंदी करण्याकरितां हुकूम सोडला.

सर्प्टेंबरमध्यें शिवाजीनें आपल्या सल्लागार मंत्र्यांशीं विचारविनिमय करून महाराष्ट्रास परत जाणेचा बेत ठरविला. कारण त्याच्या गैरहजरींत तेथें थोडी अव्यवस्था झाली होती. नुकत्याच जिंकलेल्या कर्नाटक प्रांताचीं सूत्रें त्याचा मंत्री जनार्दन (नारायण हनुमंते) पंडित याचा भाऊ, रघुनाथ पंडित याच्या हातांत दिलीं; व राहिलेले कांहीं थोडे भाग पादाक्रांत करण्यास आणखीही थोडा फौजफाटा त्यांच्या हवालीं केला. शिवाजीच्या हालचाली इतक्या गुप्त रीतीनें चालत असत कीं, कित्येक वेळां तो त्या प्रांतांतून निघून दुसरीकडे गेला तरी तेथील लोकांना तो त्याच प्रांतांत अद्याप आहे असें वाटे. त्याचें नुसतें नांव शत्रुपक्षाच्या अंगांत भीति उत्पन्न करी.

शिवाजीचा प्रतिनिधी व व्यंकोजी यांचें युद्ध—

शिवाजीच्या त्या प्रांतांतील सैन्यानें कोलेरून उतरून व्यंकोजीच्या मुलुखावर हल्ला करण्याचा डाव दाखविला. व्यंकोजीनेंहि ४–५ हजार घोडदळ व

१० हजार पायदळ घेऊन युद्धाची तयारी केली. दोघांचीं सैन्यें एकमेकासमोर आलीं पण लढाईला तोंड लागेना. व्यंकोजीचें एकंदर सैन्य शिवाजीच्या सैन्याच्या मानानें कमी प्रतीचें होतें; पण त्याचें घोडदळ मात्र चांगलें होतें.

कित्येक दिवस त्याच्या सैन्याच्या तळावरून गिधाडांचा कळप रोज जात असे. या अपशकुनाला भिऊन व्यंकोजीनें युद्ध करण्याचें टाळलें.

शेवटीं नोव्हेंबर २६ इ. १६७७ रोजीं एक चकमक झाली. व्यंकोजीच्या सैन्यानें हल्ला चढविला. ही लढाई मोठी निकराची झाली. यांत मोठे मोठे नांव घेण्यासारखे कित्येक लोक जखमी झाले, मेले, वगैरे वगैरे. दोनहि बाजूला सारखाच संव्हार झाला व लढाई तशीच राहून दोघांनीं माघार घेतली. परंतु डिसेंबर अखेर छोट्या छोट्या चकमकी उडत होत्या. या धामधुमींत त्यांनीं पुष्कळ मुलूख मात्र उध्वस्त करून टाकला.

१६७८ च्या जानेवारींत मार्टीन लिहितो कीं, 'हिंदू राजांत एकीचें बीज फार थोडें आहे व असल्यास तेंहि नाहींसें करणें विशेष कठीण नाहीं; हें जाणून शिवाजीच्या तत्प्रांतीय अधिकाऱ्यांनीं असें ठरविलें कीं, प्रत्येक राजानें स्वंरक्षणापुरतें ३-४ हजार सैन्य ठेवून घेऊन बाकीचें शिवाजीकडे पाठवावें; कारण विजापुरला दक्षिणी व अफगाण यांच्यांत तहाच्या वाटाघाटी चालूं होत्या व ते मिळून चालून आल्यास ही तरतूद पाहिजे होती. मुख्य प्रधानगिरीचीं सूत्रें दखनी लोकांच्या ताब्यांत असावींत व सेनापतित्वाचे हक्क अफगाणांकडे असावेत, (अफगाणांचा मुख्य बहलोलखान होता) व या दोघांनीं मिळून शिवाजीनें घेतलेला मुलूख परत मिळवावा असा तह ठरला. पण या तहानंतर थोड्याच कालांत बहलोलखान (२३ डिसेंबर १६७७) मृत्यु पावला.

इ. १६७७ मे २७—शिवाजीच्या सैन्याची आवाडी जिंजीपासून दोन मुक्कामावर आली असें आम्हांस समजलें. तेव्हां आमच्या कंपनीच्या वखारींतला महत्वाचा माल एका पोर्तुगीज जहाजांतून पराठिकाणीं नेण्याचें आम्हीं ठरविलें; हें पोर्तुगीज जहाज गोव्याहून मद्रासेस जावयाचें होतें व वाटेंत सहज त्या दिवशीं आमच्या खाडींत नांगरून वस्तीस राहिलें होतें. जिंजीच्या सभोंवार असलेल्या लहानसहान राजांना शिवाजीशी सामना करण्याची आपल्या आंगीं ताकद नाहीं असें वाटत असल्यामुळें त्यांनीं शिवाजीकडे वकील पाठविण्याचें ठरविलें होतें. शेरखानानें आपल्या कुटुंबांतील मंडळींना सुरक्षिततेसाठीं अरियलूरच्या जंगलांत पाठविलें. गुंडेलूर वगैरे त्या बाजूच्या गांवांतील बहुतेक लोक दक्षिणेकडे पळून गेले. पांडिचरीच्या लोकांनीं आपल्याजवळ असलेली मालमत्ता जंगलांत नेऊन ठेवली. आम्ही देखील आमच्या वखारींतला राहिलासवरलेला माल तिकडेच पाठवून दिला. अशा रीतीनें सर्वत्र धांदल उडाली होती.

जून १—पाँडिचरी येथील आमच्या कंपनीच्या नोकरांपैकीं कांहीं रंगारी रात्रीं आम्हांस न विचारतां मद्रासकडे निघून गेले.

जून १०-१२—शिवाजीच्या सैन्यांतील कांहीं तुकड्यांनीं वल्डाऊर व कुनिमेडु या गांवांच्या आसपास असलेल्या अनेक खेड्यांचा ताबा घेतला. तेव्हां आतापर्यंत तेथें टिकाव धरून राहिलेले सुखवस्तु लोक युद्धाचा शेवट होईपर्यंत दिवस कंठण्यासाठीं जंगलांत पळून गेले.

इ. १६७७ जून १—शिवाजीला भेटून त्याला देण्यासाठीं एक पत्र मार्टिनेनें कंपनीच्या ब्राह्मण नोकरामार्फत जिंजीस पाठविलें; त्यांत मजकूर होता तो असा "आमची कंपनी तुमच्या राज्यांतील राजापूर शहरीं नांदत आहे; करिता तिकडच्या प्रमाणें या किनाऱ्यावर देखील आमचें आपण संरक्षण करावें अशी आमची विनंति आहे." वेलूरजवळ या वकिलानें शिवाजीची तीन वेळां मुलाखत घेऊन तो पाँडेचरीला १६ तारखेस परत आला.

पहिल्या मुलाखतींत शिवाजी महाराजांनीं फ्रेंच लोकांना दोष दिला. कारण "कुतुबशाहा हा मला बापासारखा पूज्य आहे व, तो माझा धनी व राजा आहे, तेव्हां सेंट थोम हें ठाणें घेण्यासाठीं त्याचें सैन्य गेलें असतां फ्रेंचांनीं त्यावर हल्ला केला व मच्छलीपट्टणच्या बंदरांत असलेलीं गोवळकोंडेकरांचीं जहाजें फ्रेंचांनीं नेलीं. त्याचप्रमाणें फ्रेंचांनीं वल्डाऊर हिसकाऊन घेतल्यामुळें जिंजीच्या धन्याविरुद्ध जुलूम होत आहे." फ्रेंचाच्या ब्राह्मण वकिलानें या आक्षेपास उत्तरें देऊन महाराजाचें समाधान केलें.

दुसऱ्या मुलाखतींत वरील विषयाखेरीज नवीन मुद्दा शिवाजी महाराजांनीं काढला होता; तो असा "नासीर मुहंमद याच्याकडून फ्रेंचानीं वालदौर घेतलें तें शेरखानाच्या वतीनें घेतलें. तसें आतां त्यानीं ते शेरखानाकडून हिसकाऊन घेऊन मालकाला परत दिलें पाहिजे."

यानंतर महाराज असें म्हणाले कीं "वेलोर ताब्यांत घेण्याच्या कामांत मदत करण्यासाठीं कांहीं फ्रेंच लोक पाठवा." तेव्हां फ्रेंचाच्या ब्राह्मण वकिलानें उत्तर दिलें कीं "आम्हांला पाँडेचरी सोडून बाहेर जातां येणार नाहीं."

नंतर महाराज म्हणाले "तुम्हास उपसर्ग न पोचविल्यास तुम्ही काय देणार?" वकिलानें उत्तर केलें कीं "आमच्या वखारींत कांहींच शिल्लक नाहीं आणि डचांशी आमचें युद्ध चालू असल्यामुळें आम्हांस व्यापार करतां आला नाहीं. पण आमच्या देशाहून कांहीं जहाजें लौकरच येतील अशी आमची कल्पना आहे"

तिसऱ्या मुलाखतींत महाराज म्हणाले " जर फ्रेंच लोक या किंवा त्या कोणत्याच पक्षास मदत न करतां तटस्थ राहिले तर त्यांनीं पॉण्डेचरीस स्वस्थ-मनानें राहण्यास कांहींच हरकत नाहीं. थोड्याच दिवसांत पॉण्डेचरीस आम्ही एक हवालदार पाठवूं. तेव्हां शेरखानाच्या अधिकाऱ्याशीं पूर्वी फ्रेंच जसें वागले तशी वर्तणूक त्यांनीं आमच्या हवालदाराशीं ठेवावी."

यानंतर त्यांनीं मार्टिनच्या नांवें लिहिलेलें एक पत्र वकिलास दिलें व नंतर निरोप दिला.

फ्रेंचांचा वकील परत आल्यावर थोड्याच दिवसांनीं पन्नास घोडेस्वार आणि कांहीं पायदळ शिपाई पांडेचरीस आले. "शेरखानास शोधण्यासाठीं आम्ही आलों आहों; तेव्हां फ्रेंच वसाहतीच्या दक्षिणेस असलेल्या मशिदीजवळ रात्रीं मुक्काम करण्यास आम्हांस परवानगी द्या" असे ते म्हणाले. "त्यांना परवानगी देण्यावांचून गत्यंतर नव्हतें. पण त्यांच्यावर पाहरा ठेवला व आम्ही सावध राहिलों. ता. २० जून रोजीं सकाळीं या टोळीच्या जमादारानें कांहीं उसनी रकम आणि शिधासामुग्री यांची आम्हांकडे मागणी केली. पण आमच्याजवळ कांहींच नाहीं असें मीं उत्तर पाठविलें. तेव्हां तेथील लोकांना उपद्रव देण्याचा त्यांचा रोख दिसूं लागला. हें पाहून आम्ही त्यांना अडविण्याचा आविर्भाव दाखविला. नंतर तो जमादार आपले शिपाई घेऊन दुसरीकडे निघून गेला.

त्रिवादी येथें तळ देऊन राहिलेल्या शेरखानाचा शिवाजीच्या सैन्याकडून ता. ६ जुलै रोजीं पाडाव झाल्यामुळें त्याला मोडकळीस आलेल्या बोनागिरपट्टम नांवाच्या किल्याचा आश्रय घेणें भाग पडलें. तत्कालच त्या ठाण्यास मराठ्यांनीं वेढिलें. अशा तऱ्हेनें आमचा त्या भागांतील एकमेव आधार नाहिसा झाला.

[ लगेच मार्टिननें पुन्हां एकदां शिवाजीकडे विनंती केली. ]

मी त्या राजपुत्राला आमचे डायरेक्टर एम् बॅरन ह्यांच्या नांवानें खालील हकीगतीच पत्र पाठवलें.

"एम् बॅरन ह्यांना शिवाजी ह्या भागांत येण्याकरतां निघाल्याचें वर्तमान कळल्यामुळें व त्यांना शिवाजीला त्याच्या इच्छेप्रमाणें जय मिळण्याबद्दल शंका नसल्यामुळें, त्यांची त्याला अशी विनंती आहे की, त्यानें आपल्या संरक्षणाखालीं पांडिचरी येथील कंपनीचे लोक घ्यावे."

असें हें पत्र आमच्या ब्राह्मणाबरोबर शिवाजीकडे पाठवण्यांत आलें. तो ब्राह्मण शिवाजीच्या बोनागिरपट्टम येथील तळावर १२ अगर १३ जुलै रोजीं पोचला. त्यानें शिवाजीची लगेच भेट घेऊन आमचें पत्र त्याला दिलें. आमचें पत्र पाहून राजाला समाधान वाटलेसें दिसलें. परन्तु राजपुत्रानें आम्ही एकादा युरोपीय न पाठवल्याबद्दल नवल व्यक्त केलें.

आम्ही जमलों व शिवाजीकडे नजराणे घेऊन वकील पाठविण्याचें ठरविलें. आमच्याजवळ पांडिचरी येथें नजराण्याजोगे किंमतवान अगर कुतूहल उत्पन्न करण्यासारखे जिन्नस नसल्यामुळें आम्हीं गोंधळून गेलों. शेवटीं आम्हीं, जुना रंग गेलेला जरीचा कापडाचा तुकडा, पांचसहा पांढऱ्या कापडाचे गठ्ठे, सोनेरी पिवळ्या रंगाची शाल, एक डबल बॅरलच्या पिस्तुलाची जोडी आणि चार रंगीत कापडाचे तुकडे, हे जिन्नस निवडून काढले. खरोखरीच हे जिन्नस फारच क्षुद्र होते. सिगूरजरमेन ह्याला हा नजराणा नेण्याच्या कामगिरीवर नेमले व अंटोनी कॅटेल याला त्याच्याबरोबर दुभाषा म्हणून दिले. ते दोघे पांडिचरीहून ता. १५ जुलै रोजीं निघाले.

इतक्यांत शिवाजी चीनापट्टणमहून निघून गेल्यामुळें व त्या फ्रेंच वकिलांना पलमकोट येथील मराठा गव्हर्नरानें अडकवल्यामुळें त्यांना आगस्टच्या पहिल्या आठवड्यांत शिवाजीच्या कोलेरुन येथील तळावर यावें लागलें. त्यांची शिवाजीशी रुजवात, पूर्वी ज्या प्रधानानें आमच्या ब्राह्मणाला वेलोर येथें करून दिली त्याच, ( जनार्दनपंत हणमंते ) प्रधानानें करून दिली. नंतर त्यांनीं आमचे नजराणे त्यास अर्पण केले. शिवाजीनें त्याजकडे दुर्लक्ष केलें. परंतु आम्ही त्याला आमची गरीब स्थिती व मंदावलेला व्यापार ह्याबद्दल अगोदरच कळवलें होतें. नंतर प्रधानानें कांहीं रंगीत कापड व कांहीं रोकड पैसा घेतला. व आमच्या वकिलाला तळावर पोंचल्यापासून फक्त तीन दिवसांनींच निरोप देण्यांत आला. त्याच्याजवळ शिवाजीनें पांडिचरी येथील लोकांच्या सुरक्षिततेबद्दल कौलनामा देऊन व आमच्या माणसांपैकीं प्रत्येकाला ४ ते ५ होन ( पॅगोडा, किंमतीचें कापड देऊन त्यांना जाण्याकरतां परवानगी दिली.

मराठ्यांच्या स्वारीमुळें लोकांचें झालेले हाल—

१८ जुलैच्या सुमारास शिवाजीनें जिंकलेल्या मुलखाची व्यवस्था करण्यांकरतां पाठवलेले दोन ब्राह्मण पांडिचरी येथें आले. शिवाजीनें आपलें ब्राह्मण जिंकलेल्या मुलखांतील सर्व खेड्यांत व्यवस्था ठेवण्याकरतां पाठवले. त्याच्या बरोबर २०,००० ब्राह्मण काम मिळवण्याच्या उद्देशानें आले होते, ही नवलाची गोष्ट आहे. कोणालाहि शिवाजीच्या अधिकाऱ्यांच्या परवान्याशिवाय मुलखांतून प्रवास करतां येत नाहीं. मी ह्या सर्व बारीक गोष्टी कनीले ब्राह्मणांच्या जुलमी कारभाराची माहीती होण्याकरतां दिल्या आहेत.

मराठा ब्राह्मणाचें जुलमी राज्य सुरुंच आहे. त्यांनीं सर्वांस लुबाडलें आहे. एक फॅक्टरींत अलमानेरचें काम करणारा कॅपुचिन पाद्री परतनूरला गेला. मी त्याला प्रवासाकरतां एक घोडा दिला. वाटेमध्यें त्याला शिवाजीच्या घोडेस्वारांनीं खालीं उतरविले व त्याचा घोडा हिसकून घेतला. आम्हांस तो घोडा परत मिळवण्याच्या कामांत अपयश आलें.

आमच्या ब्राह्मणाला त्रास देण्याचें काम त्यांनीं अद्यापहि चालविलेंच होतें, त्यांचें म्हणणें असें कीं, परतनूर येथे सेनापति बहलोलखानाची कामें पहाणाऱ्या भावाची बाजू त्यानें घ्यावयास पाहिजे. त्यांनीं असाहि बहाणा केला कीं त्याला पकडण्याचा हुकूम झाला आहे. शिवाजीराजांकडून अभयपत्र मिळविण्याच्या इरायानें सदरहू ब्राह्मण पाँडेचेरीहून राजांच्याकडे जाण्यास निघाला. मराठ्यांनीं त्याच्या घरावर मोहर केली. त्याच घरांत त्याचे ऐशीं वर्षांहून वृद्ध आईबाप, बायको व मुलें यांना कैद करून ठेविलें व कोणाला बाहेर पडूं देत ना, कीं आत येऊं देत ना. तथापि मी मोहर तोडावयास लाविली व आंतील माणसांना जीवनाला आवश्यक वस्तू मिळण्याची सोय करून दिली.

ऑगस्टच्या राहिलेल्या दिवसांत, ज्यांच्याकडून पैसा मिळेल असें वाटलें त्या. मनुष्यांचा शोध करण्यापलीकडे कांहीं काम केलें नाहीं. तेवेनापट्टम् येथें उच्च लोक आपापल्या घरीं जवळजवळ कैदासारखेच होते आणि जाण्यायेण्याची परवानगी देण्यासाठीं त्यांच्याकडून सक्तीनें देणग्या घेण्यांत आल्या. शिवाजीला लिहिलेल्या पत्रांचा कांहीं उपयोग झाला नाहीं."

ऑक्टोबरमध्यें तो पुनः लिहितो "कोणत्याहि राष्ट्राच्या कोणाहि मनुष्याला हल्लींच्या राज्यकर्त्यांकडून होणाऱ्या त्रासापेक्षां विशेष असें या महिन्यांत कांहींच नाहीं. या प्रांताचा सुभेदार आणि अधिकारी (Intendants) यांचें सख्य जमलें आहे. पैसा पिळून काढण्याच्या सर्व मार्गांना परवानगी आहे."

इ. १६७८ च्या फेब्रुआरींत सुभेदारानें पाँडेचरीला भेट दिली. तो उग्र व लोभी मनुष्य होता. फ्रेंच कंपनीच्या नोकराविषयीं, कंपनीला दिलेल्या सवलतीशीं विसंगत असा एक नियम करण्याची त्याची इच्छा होती. मार्टिननें या प्रयत्नाला विरोध केला. अधिकाराच्या धुंदींत सुभेदारानें कंपनीच्या पुष्कळ हिंदी नोकरांना अटक केली. चारपांच दिवस वाटाघाटी करून त्याला एक लहानसा घोडा, कांहीं पॅगोडा (होन) नाणीं, त्याच्या नोकरचाकरांना कांहीं देणग्या येवढें दिल्यानंतर त्यांची सुटका झाली.

---

[मार्टिनच्या रोजनिशींतील इ. १६७८ फेब्रुवारीपर्यंतचा भाग सर जदुनाथ यांनीं मॉडर्न रिव्ह्यूमध्यें दिला होता त्याचा सारांश येथवर दिला. आतां यापुढचा म्हणजे इ. १६७८ मार्च ते इ. १६८० मे पर्यंतचा मार्टिनच्या रोजनिशींतला भाग डॉ. सुरेंद्रनाथ सेनकृत Foreign Biographies of Shivaji या ग्रंथांतील पृ. ३२३ ते ३५४ पर्यंतच्या मजकुराच्या आधारें दिला आहे. डॉ. सुरेंद्रनाथ यांनीं रोजनिशीचें भाषांतर सविस्तर व मुळांतील क्रमास अनुसरून दिलें आहे. सर जदुनाथ यांनीं सारांशरूपानें व क्रम बदलून दिलें आहे. यामुळें त्यांच्या सारांशांत

मुल्खावरहकुम कोणता भाग व अधिक कोणता भाग हें समजण्यास पंचाईत पडते. ]

मार्च १६७८

या महिन्याच्या प्रारंभीं "तूं व तुझा मुलगा यांनीं शिवाजीच्या नोकरींत यावें" अशी सूचना शेरखानाकडे शिवाजीच्या सुभेदाराकडून आली. पण शेरखानाला विजापुराकडून आपल्या मदतीस सैन्य येईल अशी आशा वाटत होती. शिवाय शिवाजीच्या अधिकाऱ्यावर त्याचा विश्वास नव्हता यामुळें त्यानें ती सूचना मान्य केली नाहीं.

विजापुरांत दक्षिणी व पठाण यांचीं भांडणें चालूंच होतीं. बहलोलखानाच्या मृत्यूमुळें पठाणी पक्ष कमजोर झाला होता व दक्षिणी पक्ष जोरांत होता.

तेगनापट्टण येथील व्यापारासाठीं शिवाजीच्या अधिकाऱ्यांचा फर्मान डचांना आजपर्यंत मिळाला नव्हता तो आतां मिळाला आणि शेरखानाच्या वेळीं त्यांना पोर्टोनोव्हो येथें ज्या अटीवर राहूं दिलें होतें त्या अटीवर आतांहि राहूं देण्याचें त्यानें मान्य केलें.

एप्रिल १६७८

विजापुरी सैन्य या बाजूला चाल करून येत आहे अशी अफवा उठली आहे. शिवाजीच्या अधिकाऱ्यांनीं दाणागोट्याची व हत्यारांची तयारी केली. यावरून त्यांनाहि या हालचालीबद्दल शंका वाटत होती असें दिसतें. ज्यांना इत्थंभूत बातमी होती त्यांनीं मात्र या गोष्टीला विशेष महत्व दिलें नाहीं.

मे १६७८

या मुलखांतील लोकांवर शिवाजीच्या अधिकाऱ्यांनीं अजूनहि जुलूम-जबरदस्ती चालविली होती. शेरखान मदुरेच्या नायकाला भेटण्यासाठीं त्रिचनापल्ली येथें तिष्ठत बसला होता; परंतु नायकाच्या दिरंगाईमुळें कंटाळून परत अरिअलूरच्या अरण्याकडे आला. व्यंकोजी व इतर हिंदु राजे यांनीं त्याला आपल्या नोकरींत येण्याविषयीं बराच आग्रह केला; पण तो त्यानें मान्य केला नाहीं आपल्याला कैद करण्याचा या लोकांचा विचार आहे असें त्याला वाटलें; व विजापूरहून सैन्याची मदत आल्यावर आपण झाल्या गोष्टींचा जाब घेऊं अशी त्याला आशा वाटत होती. शेरखान अरिअलूरकडे आला आहे असें समजतांच शिवाजीच्या अधिकाऱ्यांनीं अरिअलूरच्या नायकाला "शेरखानाला आश्रय देऊं नको व त्याला बाहेर हांकून दे; नाहींतर आम्ही तुझ्याशी युद्ध पुकारूं" अशी तंबी दिली. विजापूरचें सैन्य येत आहे अशा बातम्या अजूनहि उठत होत्या पण त्या खोट्या होत्या.

**ऑगस्ट १६७८**

गोवळकोंड्याच्या दरबारीं मोगलांचा वकील आल्याचें पत्रावरून कळलें. त्यानें शिवाजीशीं लढण्यासाठीं गोवळकोंडेकरांकडे १२००० घोड्यांची मागणी केली. गोवळकोंड्याच्या राजानें घोडे देण्याची व स्वतःहि बरोबर जाण्याची तयारी दर्शविली.

मोगलांचा एकंदर वडेजाव व त्यांच्या पदरीं असलेलें सैन्य याचा विचार करतां त्यांना शिवाजीसारख्या एका बंडखोर भुरट्या राजाचा पराभव करतां येत नाहीं याचें आम्हास आश्चर्य वाटतें. शिवाजी हा बाणेदार व धूर्त असून त्याचा भर उघड दांडगाईपेक्षां युक्तिप्रयुक्तीवरच अधिक असे. मोंगली अधिकाऱ्यांशीं त्याचें आंतून संगनमत होतें. मोंगलांनी मात्र त्याला नाहींसा करण्यासाठीं कोण-ताहि प्रयत्न करण्याचें बाकी ठेविलें नाहीं. शिवाजीच्या मेहुण्यानें त्याच्याविरुद्ध दगाबाजीचें एक कारस्थान मोंगलाच्या संमतीनें करण्याचा घाट घातला होता. हा डाव ओळखून शिवाजीनें त्याला कैद केलें व त्याचे डोळे काढले.

शिवाजीच्या अधिकाऱ्यांच्या धमकावण्याला भिऊन अरिअलूरच्या नवाबानें शेरखानाला व त्याच्या मुलाला आपल्या राज्यांतून घालवून दिलें. तेव्हां शेरखान मरवाजच्या नायकाच्या आश्रयाला गेला.

वेलोरच्या किल्ल्याला शिवाजीनें या प्रांतांत आल्यापासून वेढा घातला होता. तेथील सुभेदारानें पुष्कळ काळपर्यंत टिकाव धरिला, पण शेवटीं सैन्यांत सांथीचा रोग उद्भवल्यामुळें नाइलाजानें किल्ला शिवाजाच्या ताब्यांत दिला. हा महत्त्वाचा किल्ला घेतल्यानंतर शिवाजीच्या सैन्यानें नवेनवे मुलूख काबीज कर-ण्यास सुरवात केली आम्हाला असें आढळून आलें कीं, कोंकणपट्टी व या बाजूला शिवाजीनें जिंकलेला मुलूख यांत अवघें नव्वद मैलांचें अंतर होतें.

**ऑक्टोबर १६७८**

विजापूरच्या ताब्यांतील एक एक प्रदेश काबीज करून शिवाजी स्वतःच्या राज्याचा विस्तार वाढवीत आहे. एका रात्रीं त्यानें मोर-दि-चौल या किल्ल्यावर अकस्मात् छापा घातला. व तेथें असलेल्या पोर्तुगीज पलटणींनीं त्यांना परत हाकून लावलें.

**नोव्हेंबर १६७८**

गेले कांहीं दिवस आमचा ब्राह्मण (वकील), या प्रांताचा मुख्य सुभेदार रघुनाथ पंडित याच्याकडे, आमच्याविरुद्ध कांहीं कारस्थान शिजत नाहींना, हें पाहण्यासाठीं बसला आहे. एका भेटीच्या वेळीं सुभेदारानें "तुम्ही पांडेचरी येथें कांहीं व्यापार करीत नाहीं; तुमच्यामुळें राज्याचा कांहींहि फायदा नाहीं; तेगनापट्टम

येथें डचांचा व्यापार उत्तम चालला असतां त्यांना तेथून जाण्याची इच्छा होण्यास कारण तुम्ही आहांत " अशी तक्रार केली व असाच प्रकार पुढें चालणें इष्ट नाहीं असें सांगून आम्हीं दहा हजार होन (pagodas) सैन्याच्या खर्चाकरितां दिले तर, एक दोन वर्षें आमच्याकडे कानाडोळा करण्यांत येईल असें त्यानें आश्वासन दिलें. या रकमेकरतां पांडेचिरी नजीकच्या कांहीं खेड्यांचा वसूल करण्याची परवानगी मिळेल असेंहि सांगितलें. पण एवढी मोठी रकम आमच्याजवळ नव्हती. ही सर्व कारवाई रघुनाथपंडितानें डचांच्या चिथावणीवरून केली असावी, असें आम्हास वाटतें. वास्तविक सुभेदाराला सैन्याकरितां पैशाची टंचाई होतीच. याला कारण म्हणजे सर्व छोट्यामोठ्या ब्राह्मण अधिकाऱ्यांना पैसे खाण्याची मोठी चटक लागली होती; व दुसरें असें कीं, ते आपल्या हाताखालच्या मुलुखांतील लोकांना नीट वागवीत नसल्यामुळें ते (लोक) दुसऱ्या प्रांतांत कंटाळून निघून जात, व अशा तऱ्हेनें कै सुद्धां वसूल जमा होत नसे. जमिनीचें उत्पन्न कसें वाढवितां येईल हें ठरविण्यांत मुसलमानांपेक्षां ब्राह्मण अधिकारीच जास्त हुषार आहेत हें कबूल केलें पाहिजे. विजापूरच्या राजवटीचा अंत नजीक आला आहे. सरदारांत आपापसांत यादवी माजली आहे. शिवाजीनें या यादवीचा पुरा फायदा घेतला. कारण हे सर्व एक झाले तर आपल्यालाच घातुक आहे हें तो ओळखून होता. विजापूरच्या राज्याचा नाश व्हावा ही शिवाजीची इच्छा होती व वेळोवेळीं त्याला या बाबतींत गोंवळकोंड्याहून मदत मिळत असे.

डायरेक्टर मॉ. बॅरन यांनीं सुभेदाराला देण्याकरितां, शिवाजीनें लिहिलेलीं (आमच्यासंबंधीं) पत्रें आम्हाकडे पाठविलीं होतीं. डच लोक शिवाजीला भेटण्यास गेले होते असें निश्चित कळतें. पण त्यांचें कांहीं म्हणणें मान्य न करतां उलट त्यांच्यापासून काय घेतां येण्यासारखें असेल तें घेऊन त्यांना हालूं देऊं नये अशी त्यानें व्यवस्था केली. आम्हाला मिळालेलीं पत्रें आम्हीं सुभेदाराला दिलीं; पण त्याचा विशेष उपयोग झाला नाहीं. कारण एक तर या अधिकाऱ्यांना अशीं पत्रें मिळालीं म्हणजे आपल्याचविरुद्ध कांहीं गाऱ्हाणें झालें आहे असें वाटतें. शिवाय, ते आपल्या राज्यापासून दूर असल्यामुळें नेहमीं आपलें वर्तन एखाद्या सत्ताधीशाप्रमाणें ठेवतात.

फेब्रुआरी १६७९

शिवाजीच्या अधिकाऱ्यांना असें कळलें कीं, शिवाजी व त्याचा मुलगा संभाजी यांच्यांत कांहीं बाचाबाची होऊन तो (संभाजी) मोंगलाकडे निघून गेला.

मार्च १६७९

या प्रांताचा शिवाजीचा अधिकारी येऊन आमच्यांतल्या प्रत्येक नोकराकडे कर मागूं लागला. आम्ही शिवाजीचें फर्मान दाखविलें. पण त्यानें तें झिडकारून दिलें. नाइलाजानें प्रसंग ठेपलाच तर आम्ही याचा प्रतिकार करूं असें उत्तर देतांना तो त्रागा करीत निघून गेला. याचें मूळ कारण (तेथील हवालदाराकडून कळ्लेलें) म्हणजे शेरखानाच्या मदतीस येणाऱ्या विजापुरी सैन्यास आम्ही शेरखानाचे हितेच्छू म्हणून जाऊन मिळूं, असें भय त्याला वाटत होतें. पण पांडिचरीच्या गव्हर्नराचा शिवाजीशीं पत्रव्यवहार सुरू असून त्याच्या हुकूमाशिवाय आम्ही कांहींहि करणार नाहीं अशी आम्ही त्याची खात्री केली.

फेब्रुआरी १६८०

शिवाजीनें महाराष्ट्रांत धुमाकूळ चालविला आहे. त्याचें कांहीं सैन्य सुरतेपासून २५-३० मैलावर येऊन ठेपलें आहे. त्याच्या या कृत्याला आळा घालण्याचें काम मोंगलांच्या हातून होणें शक्य नाहीं असें दिसत आहे.

मे १६८०

राजापूर येथील कंपनीचा मुख्याधिकारी क्लेमंट यानें मला लिहिलेल्या ता २९ एप्रिलच्या पत्रांत तो शिवाजीचा मृत्यु १२ दिवसांपूर्वी झाला असें म्हणतो शिवाजीनें जरी उघड उघड तोंड न देतां बऱ्याच वेळीं युक्तिप्रयुक्तीनें व धूर्तपणानें मुलुख काबीज केला असला तरी हिंदुस्थानांतील नांव घेण्यासारख्या अशा थोर विभूतींमध्यें त्याला अत्यंत महत्त्वाचें स्थान आहे, हे निःसंशय!

शिवाजीनें मोंगलांचा मुलूख व शहरें उध्वस्त करून टाकली व तो एक मोंगलांचा जबरदस्त शत्रु होता.

| | | |
|---|---|---|
| सा. ५ ले. ७७२<br>सु.१०७८ जवल ८ | (२७६८) | श. १५९९ आषाढ शु. ९<br>इ. १६७७ जून २९<br>१६ |

अनाजी दत्तो—आवधतराऊ देशकुळकर्णी परगणे वाई.

लिहिले कीं आपले खंड पैकी जानोजी राजे पालकर याचा कागद होन ७०० चा पाठविला आहे. याविरहीत पहिले मुकुंदबावाजी येही हारजी माहाडीक याचे पत्र होन ३०० चे दिधले आहे. तरी सदरहू दोनी पत्रे प्रविष्ट जाली. ऐकूण होन पातशाही १००० रास तुमचा खंड त्यापैकीं खर्च लिहिणे. मजुरा असेती.

सा. ५ ले. ७८२ } (२७६९) { श. १५९९ आश्विन शु. ९.
सु. १०७८ सावान ७ } { इ. १६७७ सप्टेंबर २५

माहाराज हणमंतराऊ खराडे—

तिमाजी खंडेराऊ देसाई संमत कुंदगोल मामले बंकापूर.

हाली समत मजकूर आम्हास मोकासा जाहला. सालगुदस्ता सिवाजीचे फितरतीकरिता रयेत लोक बहूत खराब जाले. त्यावरी सेदे सुलतान तमाम मुलुकगिरी करून धुध पाडून विलायेती नागवाऊन धुलीसी मिळविले. द्रिवा लावणी नाही. चौथाई जाहले नाहीं, ऐसे जाहले. कितीयेक गाऊ नवी हुगी घालोन वस्त करावे ऐसे जाहाले. तुम्ही बहूत काही मेहनत करून आपले मिरासी गाहाण घालोन रयेत लोकास मूड देऊन विलायेतीचे किर्दीमामुरी केली, कितीयेक गाऊ नवी वस्त केली. तुमचे दौलतखोहीवरून तुम्हास सरफराज करून कदीम वतनाखेरीज हाली दर सदे होन २॥ प्रमाणें कसबा व देहाये व जकायेती वा गैर महासूल व बाजे महारमत करून दिल्हे आसे.

सा. ५ ले. ७८३ } (२७७०) { श. १५९९
{ इ. १६७७.

येशवंतराऊ वेदाजी आनंद—बहलोलखान.

चंद रोज गुदरले खबर घेतली नाहीं. तेणेकरून दिल माद्गी जाते. तरी साहेबी अलबत्ता खबर घेऊन नसीहतनामा पाठवावया हुकूम फर्माविला पाहिजे. ये तर्फेची हकीकत साहेबास रोशन जाली असेल. तपसील जाहीर करावयाबद्दल गिरमाजी पंडित पाठविले आहेती. आपण साहेबाचे आहों. बाजदराज काय लिहिणें ?

सा. ४ ले. ६९३ } (२७७१) { श. १५९९–१६००.
फ. १०८७ } कौलनामा { इ. १६७७–७८

—संभाजी नारायण देसपाडिया मोकदम नव आबादवाडी मजरे दर जमीन मौजे दाहिगोऊ परगणे निवासे.

तुम्ही व तुमचे बाबे देशमूख देशपांडे माळूम केलें त्यावरून मौजे मजकुरीचा रकबा बनजर पडिली आहे. तरी गायरान चावर २ इनाम मोकदम चावर १ वजा घालून एकंदर १७ चावर जमीन काळी पोलिजास दर चावरी होन ९, बरड. पोलिजास होन ७ व खरड होन ५ प्रमाणें इस्तावा माफीक दरसाल जैसी कीर्दी होत जाईल तेणेप्रमाणें धारा माफीक कीर्दीचा हिसेबू करून घेत जाणे. या तुमच्या मकसुदाप्रमाणें वाडीचा कौल दिधला असे.

फा. सा. रा. १ ले. ५६ } औ. जु. २१ सफर १ }　　(२७७२)　　{ श. १६०० चैत्र शुद्ध ३ { इ. १६७८ मार्च १५

औरंगजेब—मुख्तारखान.

हें फर्मान पोहोचेंपर्यंत उज्जयिनीच्या खजिन्यांत जो पैसा जमला असेल तो, सामान व सरंजाम आणि इतर लवाजमा घेऊन येत असलेल्या, निजामुद्दीन दिवाणाबरोबर हुजूरकडे पाठवून द्यावा आणि तुम्ही रनोद्याचा फौजदार दिलावरखान याजकडे जावें. राजमार्गावरील फौजदारांना हुकूम होत आहे कीं, त्यांनीं आपल्या हद्दींतून खजिना सुरक्षितपणें पार करावा आणि सदा सर्वकाळ खबरदार असावें.

पी. सी. व्हॉ. २ इ. रे. से. व्हेस्टिजेस ऑफ ओल्ड मद्रास व्हॉ. १ पृ. ३५७ }　(२७७३) फोर्ट सेंट जॉर्ज डायरी　{ श. १६०० भाद्र. शु. १४ { इ. १६७८ ऑगष्ट २१.

काल कांजीवरमहून ( हें या भागांतील प्रमुख शहर असून सुमारें ४० मैल अंतरावर आहे ) बातमी आली कीं, शिवाजीचें १०००–१५०० घोडेस्वार त्याचा भाऊ संतोजी याचे आधिपत्याखालीं त्या शहरापुढें आले. त्यामुळें हें शहर आतां जिंकून लुटलें जाईल अशी तेथील रहिवाशांना भीति पडली. त्यांनीं आणखी असेंहि कळविलें कीं, तें घोडदल इतर सैन्यासह गोवळकोंड्याच्या राज्यांत घुसून येथून १० मैलावर असलेला पुलीमेली किल्ला घेण्याचा त्याचा विचार आहे. आज मात्र कांजीवरम् येथील दुसऱ्या गृहस्थांकडून असें कळलें कीं शिवाजीचे ते सुमारें १००० घोडेस्वार, वेलोरच्या किल्यांतील लोकांना मदत करण्यासाठीं आलेल्या विजापूरच्या एका पायदळ तुकडीचा पाठलाग करीत आले होते. वेलोरच्या किल्याला शिवाजीच्या सैन्यानें गेले १४ महिने वेढा घातला आहे.

उपरोक्त वेलोरचा किल्ला शिवाजीच्या ताब्यांत देण्यांत आला.

मु. वो. इ. प. अ ले. २४ } सु. १०७८ हि. १०८९ शाबान २८ }　(२७७४)　{ श. १६०० आश्विन वद्य ३० { इ. १६७८ आक्टोबर ५

[ सिकन्दर आदिलशाह ]—सीदी एर्दसालह हुजूर सर हवालदार आणि खान मुहम्मद सीदी सालिम हवालदार व कारकून मामले तोरगळ.

मसऊदखान याच्या मध्यस्थीनें या मामल्यापैकीं सीदी अब्दुल कादिर याच्या ताब्यांत असलेलीं सौंदत्ती व लोकापूर हीं गावें सर्व हक्कांमुद्दां वाजी घोरपडे आदिलशाही याचा मुलगा मालोजी यास इनाम दिलीं आहेत.

मु. घो. इ. प. अ. ले. २२ } ( २७७५ ) { श. १६०० आश्विन वद्य ३०
मु. १०७८ हि. १०८९ सावान २८ } { इ. १६७८ आक्टोबर ५

[ सिकन्दर आदिलशाह ]—देसाई व अधिकारी ठाणें मुधोळ.

हणमंतराव घोरपडे यांच्या तर्फेचीं कसबे मुधोळ, शिल्ल, मलली व सोरगांव हीं गांवें आणि खंडोजीचे मुलगे मानाजी व अंबाजी यांच्या तर्फेचे मन्तूर, भुंजरकोप, मुगलखेड, व बुदनी हे गांव मसऊदखान याच्या मध्यस्थीवरून बाजी घोरपडे यांचे मुलगे मालोजी आदिलशाही यांस हक्कासुद्धां इनाम दिले आहेत.

मु. घो. इ. प. अ ले. २३ } ( २७७६ ) { श. १६०० आश्विन वद्य ३०
मु. १०७८ हि. १०८९ शाबान २८ } { इ. १६७८ आक्टोबर ५

[ सिकन्दर आदिलशाह ]—देसाई कर्यात मंगळगे.

मसऊदखान याच्या मध्यस्थीवरून बाजी घोरपडे आदिलशाही याचा मुलगा मालोजी यास तंबाकू-ढेप जकात व इनामें यांखेरीज सर्व हक्कांसुद्धां ही कर्यात इनाम दिली आहे.

फा. सा. सं. १ ले. ५७ } ( २७७७ ) { श. १६०० पौष वद्य ४
औ. जु. २२ जिलकाद १७ } { इ. १६७८ डिसेंबर २२

औरंगजेब—मुख्तारखान.

गागरून किल्ल्याची रखवाली तुम्हांस माफ करून मुनव्वरबेग यास सांगितली आहे. तरी हा फर्मान पोहोंचतांच तुम्ही त्या किल्ल्यावर असलेल्या आपल्या गुमास्त्यास ताकिदीनें लिहावें कीं, किल्ल्यावर असलेल्या सामुग्रीसह किल्ला मुनव्वर बेगाच्या ताब्यांत द्यावा व पावती घ्यावी.

पे. द. ३१ ले. ३९ } ( २७७८ ) { श. १६०० पौष व. ८
रा. श. ५ कालयुक्त } { इ. १६७८ डिसें. २६

श्रीराजा शिवछत्रपति—नारोबा मुतालीक देशमुख परगणे पुणे.

रायाजी मुगर पाटील मौजे हाडपसर याचा व सोनजी तुपा याचा वेव्हार तू मनास आणून रायापासून गुन्हेगारी सवासे होनाची घेतली व गडावरी पैकियाबद्दल घातले आहे. तरी मधील मधेच मनसुफी करावा तुजला गरज काय? रायाजीपासून पैके घेतले असतील ( ते ) परतोन देणे. गडावरून उतरून निरोप देवणे. स्वामी निवाडा करतील. खरा होईल तो पाटीलकी खाईल. तू काही इस्कील न करणे.

सा. ४ ले. ७३४ } (२७७९) { श. १६०० माघ शुद्ध १५
शक दत्तपत्र { इ. १६७९ जानेवारी १६

श्रीपरमहंसस्वामी.

साहिरदेव देशकुळकर्णी व भिवजी देसाई बिन पालजी देसाई कसबे मानी–

पूजेसी पुण्यासी मौजे मानी कर्याती पाटगाऊ येथें घोडेचे वोहोळपासून उतर-भाग हद उबराचे झाड डोगराचा मस्तक पावेतो दोनी डोगराचा मध्यभाग येसे स्थळ नेमून दिल्हे. हे सत्य, उतरोत्तर चालावे.

शि. च. सा. ३ ले. ४५१ } (२७८०) { श. १५४०–१६००
अर्जदास्त { इ. १६१८–७८

सेरीकर देशमूख व मोकदम कर्याती राजूर—माहाराज मनोहरदासजी.

साहेबाची आज्ञा कीं, येथें गोविंद धोंडो आला आहे तरी माणकोजी देशपांड्यास पाठविणे. पण साहेबी माणको मजकुरास परसो सायेजी हिरोजी देशमूख यास औरंगाबादेस रायाजी देसमुखाचे समजाविसीकरतां पाठविलें याबराबरी पाठविले आहे. वतन तो माणकोजीचे कदीम पिढी दरपिढी आहे. गोविंद नाहक खलेल करतो. येसियास माणकोजी आलियावरी साहेबांचि सेवेसी येईल.

एपि. कर्ना. व्हाल्यु.७ चन्नागिरी ता.नं.४६ } (२७८१) { श. १६००
सिद्धार्थी संवत्सर १६०० { इ. १६७८

बसवपट्टणचा सुभेदार लिंगापा यानें काम मठाकरितां हिरे मदत, खेडे हे दान केले. (येथें वर्षांक गतसंवत्सराचा आहे.)

मु. घो. इ. प. अ २१ } (२७८२) { श. १६००
रवी ३ { इ. १६७८

?—देसाई परगणे.

मौजे सुरुर खेरीज करून बाकीचा सय्यद अश्रफ याजकडे असलेला परगणा बाजीचा मुलगा मालोजी व अंबाजी व हणमंतराव आदिलशाही यांस सर्व हकांसुद्धां बक्षीस दिला आहे.

ा. द. ३१ ले. ४० } (२७८३) { श. १६०१ चैत्र शु. १२
ाज्या. श. ५ सिद्धार्थी { इ. १६७९ मार्च १३

श्रीराजा शिवछत्रपति—देशमूख व देशपांडिये परगणे पुणे.

अंताजी बाबाजी याने विश्वनाथ अनंत यासी पुत्र घेऊन आपली वृति ाच्या स्वाधीन केली. त्याजवरून त्याची वृति मौजे किकवी, केजल, पांडे सावर-

न्द्रे राजापुर तर्फ नीरथडी प्रगणे मजकुरी जोतीश कुलकर्ण आहेत. विश्वनाथ वृतीचा विभाग अनभविता गोत्रपुरुश कजिया करितील अगर संशय मनात आणून उपस्वर्ग लावितील, यासी उपस्वर्ग करावयासी गरज नाही. याचे वंशपरंपर वृतीची सेवा करितील. याजपासून घेणे.

सा. ४ ले. ७३५ (२७८४) श. १६०१ चैत्र वद्य ९
राज्या. श. ५ खुर्दखत इ. १६७९ मार्च २६

श्रीराजा शिवछत्रपती—गणो श्री शिवराजे राम देशाधिकारी व देशलेखक मात कुडाळ यासी.

मौनी गोसावी याचे सेवेतील हरदास १ पुराणीक १ व श्रुङ्गी १ यास प्रत्येकी ६ होन प्रमाणे एकूण १८ होन देत जाणे. धर्मार्थ म्हणून खर्च लिहिणे म्हणून सनद दिली.

पे. द. ३१ ले. ४१ (२७८५) श. १६०१ आषाढ शु. ७
रा. श. ६ सिद्धार्थी इ. १६७९ जुलै ५

श्रीराजा शिवछत्रपति—रा. कोनेर रुद्र देशाधिकारी तर्फ मावले.

पासिणे तर्फ कर्यात मावल येथील पाटीलगी गोविंदराव सितोले देशमुख प्रगणे पुणे यांची आहे. हे तुला माहीत नसता तू रणपिसा वाडी करंदी याची बाजू घेऊन कथला करतोस. तरी नसते कथले करावयासी तुला गरज काय? स्वामी धाकुटपणापासून या देशांत आहेत. मिरासदार कोण गैर मिरासदार कोण हे जाणताती व माणसाचेमाणूस वलखतात. याउपरी मिरासदारांचे कथले नसते नवे करिसील म्हणजे आपले केले पावशील. पूर्वी मातुश्री आऊसाहेब मजरा करावयाविषई सांगितले होते ते स्वामीनी मान्य केले नाही. त्याउपरी गोमाजी नाईक पानसबल याणी त्यासी कुम्हर केला त्यास ताकीद केली. आजतागायत सुरलित चालत आहे. हाली त्याप्रमाणे सितोलियाची पाटिलकी सुरलित चालवणे वाडी करंदीचा मजरा केला नाहीं.

फा. सा. खं. १ ले. ५८ (२७८६) श. १६०२ चैत्र शुद्ध ९
औ. जु. २३ रवल ७ इ. १६८० मार्च २८

औरंगझेब—मुख्तारखान.

हा हुकूम पोहोचतांच व मीमद येथील ठाणेदार येतांच तुम्ही धावून जाऊन चिरंजीव मुहम्मद अक्बर याची चाकरी करीत रहावें.

एपि. कर्ना. १० चिक-बाळापूर ३२ } (२७८७) { श. १६०२ श्रा. शु. ६ / इ. १६८० जुल २१

( नंदीपर्वतावर योगनंदीश्वराच्या देवालयाच्या पश्चिमेकडील शिलालेख ).

कर्नाटक प्रांताच्या पूर्वेस नंदी नांवाचा पर्वत आहे तो फार उंच असून अजिंक्य आहे व वर जाण्यास एकच मार्ग आहे. त्या पर्वताच्या शिखरावर एक मंदीर आहे. बाळापुरराज्यांत शत्रूच्या हल्ल्यापासून रक्षण होण्याकरितां या पर्वतावर एक किल्ला बांधविला होता. सदरहू किल्ला हस्तगत करण्याकरितां म्लेंच्छ मोठी फौज घेऊन आले. पण त्यांचा पराभव झाला.

श्रावण शु. षष्ठी रौद्रनाम संवत्सरे १६०२ या दिवशीं शिवछत्रपतीचा पुत्र संभोजी राजा येथें शांततेनें राज्य करीत होता. त्यावेळीं बाळाजी कृष्ण हा जगदेव किल्ल्याचा दुर्गाधिकारी होता. त्यानें रघुनाथपंडिताच्या आज्ञेवरून या ( नंदी ) किल्ल्याचा अधिकार आपल्याकडे घेतला.

एपि. कर्ना. १० मुळबागल ११७ शक } (२७८८) { शक १६०२ श्रावण शु. १५ / इ. १६८० जुलै ३१

( उत्तनूर येथील मडीवाल ( Madivala ) शेतासमोरील शिलालेख. )

शक १६०२ श्रावण शुद्ध पौर्णिमा या दिवशीं राजश्री संभाजी चक्रवर्ती यांनी कोलालच्या कारकूनास आज्ञा केली कीं चन्नभट यांचा पुत्र व्यंकटेशशास्त्री यास उत्तनूर मडीवाळ बाक्षिस दिलें.

पे. द. ३१ ले. ४२ रा. श. ७ रौद्र } (२७८९) { श. १६०२ भाद्र शु. ५ / इ. १६८० आग. १९

श्रीराजा शंभु छत्रपति--रा विनायेक उमाजी देशाधिकारी प्रांत पुणे.

माहादोबागो तुकाबागो याचे पुत्र मौजे देहू यासी वर्शासनाची मोईन होन पातशाही लुगडियाबद्दल गला जोंरी बारुळे माहाल मापे खंडी येकूण होन पातशाही येक व गला खंडी येक मोईन आहे. ते साल मजकुरापासून सुभेमजकुरावरी देविली असे. दरहरसाल आदा करीत जाणे.

सा. ४ ले. ७३६ राज्या. श. ७ } (२७९०) खुर्दखत { श. १६०२ आश्विन शु. १ / इ. १६८० सप्टेंबर १३

श्रीराजा शंभु छत्रपती—गणोराम देशाधिकारी व देशलेखक प्रांत कुडाळ.

मौनी गोसावी यांचे पालखीकरितां भोई व वाजंत्री यास दरसाल नेमणूक केली असे. २५ होन वाजंत्रियास व १०० होन भोई लोकास दरसाल धर्मार्थ म्हणून गोसावी यांचे नांवे खर्च लिहीत जाणें.

जे जागा आहे ते माहालची आहे. लालमहालचा आड उकरला. ...( २१२ )
लालमहाल जुना त्यामधे हाली नवे घर बांधिले तेथें सिंदे राहणार.

शि. च. निबं. परिशिष्ट पृ. ११ शक } ( २७९६=२३४४ अ ) खरेदी पत्र { श. १४७१ आश्विन शु. १० इ. १५४९ आक्टो. १०

कमाजी बिन भाव पाटील काकडे कसबे जिंती परगणे कडेवलीत—

रा. मालजी राजे भोसले मोकदम जिंती.

आपले वडील भाव पाटील याणी तुम्हास निमी मोकदमीं नांवनागर दिधली होती. त्यावर खेलोजी काकडे याचे लेक कान्होजी व इतर पाच सात काकडे यानीं उत्पात करून बदमस्तीने आपले वडिलास मारिले. यावरोन दिसोन आले कीं हें आपणास वाचो देत नाहींत. याकरितां जरूर जाणोन आपण खुशखरिदी पेशजी निमे व हाली निमे दरोबस्त मोकदमी नावनांगर कुल मानपान तुम्हास १२०० होन रोख घेऊन दिली व घोडी एक घेतली.

ग. सा. खं. १ ले. ५४ हि. ९८१ जखर २० } (२७९७=२३५० अ) { श. १४९५ आश्विन वद्य ७ इ. १५७३ आक्टोबर १७

मलिक यूसुफ मुहम्मद शाह याच्या मरणाची तारीख हि. ९८१ जमादिलाखर ० बुधवार ही आहे.

ारत-मित्र . १०१७ जखर २९ } ( २७९८ = २३८८ अ) सरतीनामा { श. १५३९ आषाढ शु. १ इ. १६१७ जून १६

हजरती आलमपन्हा वशाली हजरती व ममलकत मदारी व सिनोर विजु-ी रजौ वरुनु रेवदंडा व चेऊलचे अहदे निवाडे हाजी याकुद ईस्तवोली हवा-दार समत तलकोंकण व त्याप्रमाणें ववसर्वा व सिनोर दो मनवेल-द-जवेद पेतान कोट रेवदांड व सिनोर वियादोर द फजेद लुईस दालमाद मोस्त-लोक दिमती पातस्या व फिरंगी खातिरेस आणुनु अहद निवाड करणे. यावरी ाडा करावयास सदरहु यारी कापाचे मैदानी वडाखाली खातिरेस आणिता ंन केला यैसा जे तीर्गातहद रकसी + + + + + निवाडियाचे बावे हाली मम-त आंबरी व विजुरे यासी लिहोनु तेथुनु जबाबे खबर होईल तसहे प्रमाणें ां तहद राकसी फलवेयाचे अहदेया निवाडा करणे. तलग हा निवाडा ांतहद राकसी फलवेतकुबे लोक असे. यैसा मोईन करुनु करार केला असे.

सर. शहाजीचरित्र } ( २७९९ = २४५३ अ) { श. १५५८ आश्वीन शु. ६
पोर्तु. दप्तर } { इ. १६३६ सप्टं. २६

राजे शहाजी भोसले—पोर्तुगीज व्हाइसराय.

निजामशाहीचा मालक अकरा वर्षांचा आमचेपाशीं असून त्याचें वास्तव्य त्रिंगलवाडीच्या किल्यावर आहे. तीन वर्षे झालीं त्याचें नांवें आम्हीं स्वतंत्र कारभार सुरू केला आहे. परंतु, मोगल बादशहा व आदिलशहा हे दोन प्रबल शत्रु आमचेवर चालून आल्यामुळें आपण आमच्या कुटुंबास व मुलास चौल येथील किल्यांत सुरक्षित रहाण्याची सोय करून द्यावी.

सर. शहाजीच. } ( २८०० = २४५४ अ ) { श. १५५८
पोर्तु. दप्तर } { इ. १६३६

पोर्तुगीज व्हाइसराय—

'चौल येथें आपल्या हद्दींत राहण्यास शहाजी राजांस आश्रय द्या' (हा व) 'शहाजीला आतां बाहेर आधार राहिला नाहीं. म्हणून प्रसंग पडला तर चौलच्या किल्यांत येऊन राहण्याचा त्याचा विचार आहे. व ह्या साह्याबद्दल तो निजामशाहीपैकीं कांहीं प्रदेश फिरंग्यास देण्यास तयार आहे.' (असाहि शहाजी भोसल्यांकडील निरोप एका मुसलमानानें आणिला आहे. त्यावर) यासंबंधानें गोवा येथील कौन्सिलनें असें ठरविलें कीं, ज्याअर्थी दोन बलिष्ठ सरदारांचें आक्रमण शहाजीवर झालें आहे, त्याअर्थी त्यास आपण उघडपणें मदत करणें श्रेयस्कर नाहीं. म्हणून त्यास चौलचे किल्यांत आश्रय देऊं नये. मात्र दंडा ( राजपुरी ) येथील तटबंदीच्या ठिकाणीं तो किंवा त्याच्या बायका जाऊन राहतील तर चौलहून दंडा येथें पोचविण्यास त्यास गुप्त मदत करावी. बायका चौल येथें आल्यास तेथें ठेवून न घेतां दंडा येथे पोंचवून द्याव्या. दंडा येथील किल्ला जरी शहाजीनें आपल्या हवाली केला तरी देखील त्यांस चौल येथें आश्रय देऊं नये.

इतिवृत्त १८३४ } ( २८०१ = २४५४ आ ) { श. १५५९ वैशाख शु. ११
पृ. १३९ } { इ. १६३७ एप्रील १५

तिमाजी व कृष्णाजी बापदेऊ देसपांडिये परगणे अहमदाबाद—

विसाजीराम.

तरफ पाटवर्दे देशपांडेपण दरकुरसी आपली आहे. हाली साल मजकुरा-कारणे परगणियात दुकाल पडला. राहूजी गोपिनाथ सबनिवीस दवलताबादेस

जाऊन परगणे मजकुरावरी एक लाख होन कबूल करून आला. त्याची वसुली सुरूखान हवालदार आरंभिली. परगणियात वसूल न होती. मग सोनाजी देसमुखास व आपणास येण्याबदल हुकूम आला. पण हूजूर गेलियावर सुटका होणें मुस्कील. काल्या कोटामध्ये सडोन मरावे. रोज मार सोसवेंना. मग १२॥ ह. देसमूख व १२॥ ह. आपणास देणें लागले. तुम्ही आपले बाहिणीचे पुत्र, आम्हास पुत्रसंतान नाहीं व तुम्हास वारसा पोचतो. तुमची मिनतवारी केली मग तुम्ही जरूर जाणोन कबूल केले व होन दिधले. तुम्हांस खुसीनें देशपांडेपण दिले. सुखे लेकराचे लेकरी अर्जानी करणे. हक्क उत्पन्न खाणे.

( २८०२=२६२५ अ )

( Agentes Hindus – da – Diplomacia Portuguesa na India by P. Pissurlencar, 1933.)

दों पेद्रु ऐंरिक हा गोवेकर सरकारचा वकील विजापूरकराकडे जात असतां पुढीलप्रमार्णे तालीमनामा ( instructions ) त्यास दिलेला होता. ता. २–१२–१६५८ "विजापुरकरास जास्त आवडीचे इसम म्हटले म्हणजे Ibraem base ( इब्राइम बास ), अब्दुल महमद व काझी नुरुला हे होत.

मराठाज्ञ. एम्. वसीन. पृ. २–३ पोर्तु. }　(२८०३=२६६१ अ) गोव्याचे गव्हर्नर–कॅप्टन वसई.　{ श. १५८४ वैशाख इ. १६६२ मे

"दाबोळ येथील राघो बल्लाळ नामक शिवाजीच्या सुभेदाराचें एक पत्र तूर्त आम्हांस आलें असून त्यांत त्यानीं आपलीं ५ तारवें व १ पताश (एक तारवांचा प्रकार ) जीं करांजा येथें अडसकून पडलेलीं आहेत तीं सोडून देण्याविषयीं मागणी केली आहे. त्यांस मीं कळविलें आहे कीं, ह्या गोष्टींची आपणास कांहींच माहिती नाहीं. पण अशी वस्तुस्थिति असल्यास तेथून सोडून यावी अशी आज्ञा करीन. असें जरी असलें तरी आपण तीं तारवें सोडूं नये. कारण पूर्वी स. १६५९ त अशीच गोष्ट घडली असतां म्ह. कल्याण-भिंवडी येथें शिवाजीचीं २९ तारवें ( sanguiceis ) बांधिलीं जात असतां आपण जें धोरण ठेविलें होतें तेंच धोरण आतांहि चालूं ठेवावें.

डॉ. बाळकृष्णाकृत शिवाजी दि ग्रेट, व्हा.१ भा. २ पृ. ५३३ इ. न्यू. स्टा. }　( २८०४=२६८२ अ )　{श. १५८६ मार्ग व ८ इ. १६६४ नोव्हें. ३०

इचव्यापारी—अधिकारी.

खवासखानाच्या सैन्यास पोचविण्यासाठीं कॅप्टन घोरपडे याच्या ताब्यांत विजापूरच्या राजानें जी रोकड रकम दिली होती तिच्यावर बाळेघाटांत अकस्मात्

हल्ला करून व इतर कांहीं जहाजें लुटून शिवाजीनें लूट मिळविली. ती ८ लाख होन असावी असा अंदाज आहे आणि शिवाय खुष्कीच्या मार्गानें त्यानें याशिवाय २० लाखाचा माल लुबाडला असावा. कॅप्टन घोरपड्यास त्या बंडखोरानें (=शिवाजीनें) आकस्मात गांठून त्याच्यावर जो जय मिळविला तो जय खवासखानाच्या कल्पनेपेक्षां फार निराळ्या प्रकारचा आहे. कारण, घोरपडे हा एक उत्तम सैनापतीपकीं होता त्याला इतकी जबर दुखापत झाली कीं तो लौकरच मेला आणि पेशाखेरीज घोरपड्याचे दोनशे लोक मारले गेले. हा बंडखोर उत्तरेकडील आपल्या मुलखापासून इतक्या दूर अंतरावर गेला असून मोंगलांच्या सैन्यानें कांहींच विशेष हालचाल केली नाहीं याचें आम्हांस मोठें आश्चर्य वाटतें. कारण घोरपड्याचीं जीं ३०० माणसें त्या प्रसंगांतून बचावलीं त्यांनीं खारेपाटणाजवळ व वाटावर वांईनर्जीक शिवाजीचा असा खरपूस समाचार घेतला (made it so hot for Sivasi) कीं त्याला वेंगुर्ल्याचें ठाणें घाईनें मोडून टाकवें लागलें. जरी त्याच्या आरमारांतले लोक रोज बंदरांत उतरत होते तरी आम्हाला ११ तारखेपर्यंत तो कोठें राहतो याचा पत्ता लागला नाहीं हें आश्चर्यच म्हणावयाचें.

| | | |
|---|---|---|
| मराठाज्. एम्. वसई<br>पोर्तु. पृ. ४४ | (२८०५=२७०४ अ) | श. १५८९ मार्ग.शु. १०<br>इ. १६६७ नोवें. १५ |

पोर्तुगीज विजरई—सेक्रेटरी (स्टेट).

" ह्या वेळेस मला कळून येतें कीं, शिवाजीचे लोक व तारवे खालीं येत आहेत. तरी तिवी (बार्देस) व शापोरा (कांयसुव) येथील कॅपट्नास हुशार असल्यावदल आज्ञा करावी. अशीच सूचना रेवडें व नादोडें येथील राण्यांस करावी. त्याचप्रमाणें फेर्नांव व्हाज द सिकैर यांस आपले आरमार जय्यत तयार ठेवण्यांस सांगावें. "

२२-११-१६६७ रोजी विजरईनें स्वतः बार्देज येथें जाऊन शिवाजीच्या सैन्यास तोंड दिलें. पृ. ४४

पोर्तुगीज विजरई नागर लोकसभेस लिहिलेल्या ता. २९-१२-१६६७ च्या पत्रांत म्हणतो." *मी जेव्हां बार्देज येथें गेलों तेव्हां मी शहर सोडूं नये म्हणून* लोकांनीं अर्ज केले पण मी गेलोंच. तेथे केवळ ८४ लोकांनीशीं शत्रूशीं तोंड दिलें व त्यास जिंकलें. तो पळून गेला व तहाची त्यानी मागणी केली. व हा तह आम्हास पाहिजे तसा करून घेतला. " पृ. ४५

[ शिवाजीनें बार्देजवर हल्ला केला त्यावेळीं वेंगुर्लें येथील डचानी त्यास दारुगोळा देऊन मदत केली, असें विजरईच्या ता. १-१२-१६६७ च्या पत्रावरून दिसून येतें. पृ. ४४ . ]

विजरईनें डचास लिहिलेल्या सदर पत्रांत ( ता. १-१२-१६६७ ) म्हटलें आहे : " आपणा ( डचां ) विरुद्ध माझी मोठी तक्रार आहे कीं आपण शिवाजीस दारुगोळा पुरविला व त्यास बार्देजवर हल्ला करण्यास प्रेरणा केली. शिवाजीनें ह्याच गोष्टी सांगून सदरहू हल्ल्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली. " पृ. ४५

–पोर्तुगिजांच्या सांगण्यावरून लखम सांवत देसाई व त्याचा पुतण्या नारवा हे ता. १५-९-१६६७ रोजीं वेंगुर्लेस जाऊन त्यांनीं डचाना त्रास दिला. यामुळें डचांनीं फिरंग्याशीं व शिवाजीकडेहि तशीच तक्रार केली. त्यामुळें शिवाजीनें बार्देजवर हल्ला केला. " पृ. ४५–

विजरई कोंदि द सां विसेंत ( Count of St. Vincent ) म्हणतो :

" शिवाजीची धूर्तता, शौर्य, चपळाई व शहाणपण पाहता त्याची सिझर व अलेक्झांडरशीं तुलना करतां येईल. " पत्रावर तारीख नाहीं.

| | | |
|---|---|---|
| औरंग. नामा भाग २. पृ. २९ टीप. | ( २८०६=२७३३ अ ) | श. १५९२ इ. १६७० |

आम्हांस शिवाजीच्या प्रतिनिधीचा ( वकीलका ) एक हुकूम सुरतेच्या अधिकाऱ्यांच्या नांवें लिहिलेला मिळाला आहे. त्यांत मोठ्या जोरानें असें लिहिलें आहे कीं, " बादशाहीचे दावेदार शिवाजीमहाराज यांनीं आपल्या लष्कराच्या खर्चासाठीं सुरतेची चौथ वसूल करण्यास मला पाठविलें आहे. तरी इमानदारीनें तो वसूल करूं द्या. उशीर कराल किंवा आपल्या बादशहाच्या भरंवशावर रहाल तर महाराज शिवाजी हे आपल्या जंगी फौजेस हुकूम देतील व मग ती फौज येऊन तुमचें शहर लुटून घेईल. तुमच्या बादशाहाच्या किंवा उमरावांच्या हातून कांहींहि होऊं शकणार नाहीं. पूर्वीं देखील असेंच झालें व तें तुम्ही पाहिलेंहि आहे." (या हुकुमांत बादशाही अधिकाऱ्यांच्या मागून इंग्रज व वलंदेज व्यापाऱ्यांनाहि लिहिलें आहे. त्याचा पुरा अनुवाद इतरत्र देण्यांत येईल. *)

| | | |
|---|---|---|
| स. प. पृ. १३२ ले. १८ राज्या. श. २ राक्षस सं. | ( २८०७=२७५८ अ ) उल्लेख | श. १५९७ इ. १६७५ |

महाराज रा. थो. कै.—शिवराम वाजपेये कामुदाल, वृद्धाचल.

कर्नाटक प्रांतीं स्वारी झाली होती ते समई धारादत्त इनाम चंदीप्रांते मौजे इसवेलीपटु व मणी परगणे विळूपूर. रुतिमचालापूर सरकार चंदी; मौजे कुरतुड परगणे वृद्धाचल सरकार पालणकोंडा हे कुलकानु सहित इनाम दिल्ही. ती पत्रें जीर्ण....

* शक १८३२ मध्यें वेंकटेश्वर छापखान्यांत छापलेल्या "औरंगजेबनामा दुसरा भाग" या हिंदी ग्रंथांत इ स. १६७० मधील सुरतेच्या दुसऱ्या लुटीस अनुलक्षून संपादक राय मुन्शी देवीप्रसादजी मुन्सीफ यांनीं पृ २९ टीप ४ मध्यें वरील मजकूर दिला आहे.

आदब, सरकारकृत शिवाजी म. आवृत्ति पृ. ६२ } (२८०८=२६१६ अ) { श. १५७९ ज्येष्ठ इ. १६५७ मे

औरंगजेब——नासिरीखान व इतर सरदार.

तुम्ही मराठ्यांचा पराभव करून मोंगली मुलखांतून त्यांना घालवून द्या; आणि शिवाजीच्या मुलखांत चोहींकडून प्रवेश करून खेडीं ओस करा. दयामाया न धरतां लोकांना ठार मारा आणि त्यांना सपाटून लुटा. पुणें आणि चाकण हे शिवाजीचे परगणे पूर्णपणें उध्वस्त झाले पाहिजेत; लोकांना ठार मारण्यांत व त्यांना गुलाम करण्यांत यत्किंचित् कसूर करूं नका. त्याचप्रमाणें मोंगली मुलखांतील ज्या पाटलांनीं व रयतांनीं गुप्तपणें मदत केली असेल त्यांची कचल केली पाहिजे.

आदब सरकारकृत शिवाजी म. आवृत्ति पृ. ६३ } (२८०९=२६१६ आ) { श. १५७९ ज्येष्ठ इ. १६५७ मे

औरंगजेब——मोंगली अधिकारी.

कारतलबखानानें जुन्नरनजीक रहावें; अबदुल मुनीम यानें गड नमुना (?) येथें असावें; आणि नासिरिखान व राव कर्ण यानीं परिंड्यासमोर पांडे येथें राहून चांभारगोंदें कडे आणि अष्टी या परगण्यांचे रक्षण करावें. शिवाय या अधिकाऱ्यांनीं संधि सांपडताच सरहद्द ओलांडून मराठ्यांच्या मुलखावर चालून जावें आणि शक्य तितकी धामधूम करून परत आपल्या ठाण्याच्या रक्षणासाठीं यावें.

पुरं. द. भा. ३ ले. १६३ } ( २८१० ) {

( सोन ठाकूर याची जबानी ) आपला वडील काल ठाकूर मौजे पिंपळ्याहून मौजे वरड प्रांत फलटण येथें गाई, बैल व घोडी चारणीस जात होते. ते समई वाल्हे येथें वस्ती नव्हती; अरण्य होतें. मग धावशीचे पाणी आणून रात्र गुजरात केली. सकाळीं उठोन जाऊं लागले; तों पाटील कुळकर्णी वगैरे सर्वांनीं येऊन आग्रह करून राहविले. तेथें लोकांनीं वस्ती केली व त्याला वतन करून दिलें. तेव्हां त्यानें आड खणून पाण्यानें रांजण भरून दिला. तो आड वाल्ह्यांत आहे. यानंतर श्री. माहाराज साहेब ( = शहाजी ) पिंगोरीच्या दुन्यामध्यें साहा महिने होते. माहाराजास पुणें, सुपें व कराड देश कल्याण भिवंडी व मावले हे मुकासे इदलशाहीपासून जाहाले. रणदुल्लाखान येऊन माहाराजास हुजूर घेऊन

जाते समई आपले वडील चुलते गोपाजीबाबा यास घरचे जमातीनसी चिमण-गावचे ठाणे बांधोन तेथें ठेविले. कन्हाडास सैतानराऊ ठेविले. त्या समई आपले कबिले थाप्यास गेले. घराच्या ओट्यावर कोष्टे यास ठेविले......पुढें माहाराज-साहेब यास पातशाही अटक जाहाली त्यासमई खैरतखान कन्हाड मुलखावर आला. तेथून चिमणगावास आला ते समई गोपाजीबाबा यानीं पिवळी वस्त्रें करून येक येक बाहेर निघोन संग्राम केला; आणि साहेब कामास आले. त्यामधे मालजीबावा यास त्याणीं जिवंत धरून घोडा व माणसे बरोबर देऊन. चाल्यास रवाना केले. त्यानें गोपाजीबाबा व समस्त युद्धी निवर्तल्याची हकीकत सांगितली; ती ऐकून कान्होजी बाजी व जाजाई या म्हाताऱ्यानीं उरावर धोंडे मारून घेऊन प्राणत्याग केला. त्यासमई गुरें, बैल, घोडीं निंबाळकरांच्या राउतानीं लुटून नेलीं. त्याउपरी मालजीबावा यानी आपले धाकटे भाऊ धारोजी बाबा व संभाजीबावा यांस घेऊन तोरण्यास गेले. तेथे बळवंतराव कोकाटे होते त्यानीं जतन केले. मग ताजे होऊन हाबशापासून मुरूमदेव घेतला आणि श्री-माहाराजाचे चाकर म्हणविले. तेव्हां श्रीमाहाराज व राजश्री दादाजीपंत यानीं बहुत गौरव केला. यानींहि बहुतच चाकरी केली. त्याउपर चाकरी टाकोन आमचे ( = सोन ठाकुराचे ) पिते संभाजीबावा ठाकूर टिके सेत व मळा करीत होते. या देहाचा ( सोन ठाकुराचा ) जन्म येथें जाहाला. आतां चौगुलकी करतो. त्याचा बाप ' जावजी मरोल ' होता त्यानें आम्हांस हक्क दिले आहेत. आमच्या वाड्यांत कोस्टी आहे तेवढा बाहेर निघाल्यानें आमचा मामला सुरळीत होईल. ( ही जबानी पेशवाईत दिलेली आहे )



# जुलूस

दिल्लीकर मोगल बादशहा आपण गादीवर आल्या दिवसापासून नवें वर्ष एक ह्या आंकड्यापासून सुरू करीत व त्यास जुलूस म्हणजे राज्यारोहणशक हें नांव असे. ह्या जुलूस सनाचा आंकडा प्रत्येक पातशहाच्या फर्मानादिकांतून येतो. हा आंकडा वेगवेगळ्या पातशहाच्या कारकीर्दीत तोच तो येतो आणि त्याचा काल वेगवेगळा आहे हें उघड आहे. अर्थात् हा जुलूस म्हणजे सर्वसामान्य जनतेच्या परिचित सनाचें कोणतें वर्ष हें काढणें प्राप्त होतें व तें सामान्यतः कठीण पडतें. शिवकालीन माहितीसाठीं त्या कालच्या साधनांचा अभ्यास करतांना ह्या जुलूस सनाचे उल्लेख बऱ्याच वेळां येतात. उदा० प. सा. सं. ले. ४६१, ५५०, ७७५, २४२६-६३ इत्यादि-फर्मानादि पत्रांतल्याप्रमाणें हे जुलूस पातशहानामा, तवारिख इत्यादि बखरवजा त्यांच्या चरित्र-ग्रंथांतून तर पुष्कळदांच येतात. म्हणून हे जुलूस सन कोणत्या बादशहाचे किती आणि त्यांचा प्रारंभ केव्हां हें समजून येणें आवश्यक आहे व त्यासाठीं पुढील यादी दिली आहे. ह्या यादींत जुलूस सनाबरोबर हिजरी, शा. शक आणि इसवी सन देऊन त्यांतील महिना व तिथि, तारीख दिली आहे. त्यावरून कोणत्याहि जुलुसांतील मधल्याच एखाद्या महिन्यांतील आलेला काल काढणें सुलभ होईल.

ह्या प. सा. सं. ग्रंथांत घ्यावयाच्या पत्रांच्या कालाची प्रारंभींची मर्यादा ज्या धोरणास अनुसरून योजिली व त्याप्रमाणें पत्रे घेतलीं त्याच दृष्टीनें पुढील यादींत अकबराचेहि जुलूस घेणें इष्ट वाटलें.

जुलूस यादीमध्यें अकबर व जहांगीर ह्यांचे जुलूस देऊन झाल्यानंतर इलाहि महिने आणि त्यांचा प्रारंभ केव्हां तें दिलें आहे. हे महिने दिलें. ह्याचें कारण हें कीं, अकबर व जहांगीर ह्यांच्या राजवटींत, महिन्यांचीं हीं नांवें कागदांतून दिलेलीं असतात.

आषा शु ९=इ १६६५ जून ११ शिवाजी राजे राजगडाहून मिर्जा राजाचे भेटीस गेले तेव्हां राजगडचा कारभार केसो नारायण सबनीस याच्या हातीं आला (प स ले ११००)

आषा शु १०=इ १६६५ जून १२=औ जु ८ जिल्हे. ८ शिवाजी राजे यानीं जयसिंगाशीं सल्ला केला व संभाजी राजे यांस पांच हजारी देऊन चाकर केलें (शका शि म पृ. २३; औ ना क्रॉ १५६३)

आषा शु ११=इ १६६५ जून १३ पुरंदरच तह (हफ्त अंजु.)

आषा शु १२=इ १६६५ जून १४ शिवाजी राजे यानीं दिलेरखानाची भेट घेतली (शका शि म पृ ५१)

आषा शु १२=इ १६६५ जून १८ शिवाजी राजे यानीं मोगली सरदार कीरतसिंग याच्या ताब्यांत कोंढाणा किल्ला दिला. (हफ्त अंजु)

आषा व १=इ १६६५ जून १८ संभाजी व उग्रसेन कच्छवा हे जयसिंगाच्या भेटीस आले (हफ्त अंजु)

कार्ति व ८=इ १६६५ नोव्हे २० जयसिंग आणि शिवाजी राजे विजापूरच्या स्वारीवर निघाले (हफ्त अंजु)

मार्ग शु १०=इ १६६५ डिसें ७ मोंगलांनीं फलटणचा किल्ला घेतला (हफ्त अंजु)

मार्ग व ७=इ १६६५ डिसें १८ मोंगलांनीं मंगळवेढ्याचा किल्ला घेतला (हफ्त अंजु)

मार्ग व १४=इ १६६५ डिसें २५ दिलेरखान व शिवाजी यांचे सर्जाखान, ख्वासखान व व्यंकोजी या अदिलशाही सरदाराशीं युद्ध (हफ्त अंजु)

पौष शु १०=इ १६६६ जान ५ जयसिंग विजापूर घेण्याची कल्पना सोडून परत फिरतो (हफ्त अंजु)

पौष व ६=इ १६६६ जाने १६ शिवाजी राजे यानीं पन्हाळ्यावर हल्ला केला, पण तेथील लोक सावध असल्यामुळें मराठ्यांस हटून खेळण्यावर यावें लागलें (हफ्त अंजु)

पौष व. १३ = इ. १६६६ जाने. २२ = औ. ज़ु. ८ रजब २६ शहाजहानाचा मृत्यु ( औ. ना. व्हॉ. १ पृ. ६५. )

फाल्गु. शु. ९ = १६६६ मार्च ५ शिवाजी राजे व संभाजी राजे औरंगजेबाचे भेटीस निघाले. ( शका शि. प्र. पृ. २३. )

फाल्गु. व. १० = इ. १६६६ मार्च २० नेताजीनें विजापूरकरांची बाजू सोडून मोंगलांच्या सैन्यांत ५००० ची मनसबदारी पत्करिली. ( हफ्त अंजु. )

श. १५८८ चैत्र व. ३० = इ. १६६६ एप्रि. २४ जयसिंगाशीं झालेल्या युद्धांत रतनजी माने व सर्जाखान या आदिलशाही सरदारांनीं पराक्रम गाजविला. ( प सं. ले. ११२६ )

वैशा. व. ४ = इ. १६६६ मे १२ = औ. ज़ु. ९ जिलका १८ आग्रा येथें शिवाजी राजे व औरंगजेब यांची दरबारांत भेट झाली. ( औ. ना. व्हॉ. १ पृ. ६६. )

ज्येष्ठ शु. २=इ. १६६६ मे २५ औरंगजेबानें शिवाजी राजांना नजर कैदेंत ठेवलें. ( शका. शि. प्र. पृ. २३ )

श्रावण व. ३=इ. १६६६ ऑग. ७ = सु. १०६७ सफर १५ नेताजी राजे हा मोगलांच्यातर्फे सुपे परगण्याचा मोकासेदार झाला. ( प. सं. ले. २६९५ )

श्रावण वद्य १२ = इ. १६६६ ऑग. १७ – औ. ज़ु ९ सफर २७ शिवाजी राजे आग्र्याहून पेटाऱ्यांत बसून पळाले (शका. शि. प्र. पृ. २३ औ. ना. व्हॉ १ पृ. ६७ )

श्रावण व. ३०=इ. १६६६ ऑग. २० त्रिंबकपंत डबीर व रघुनाथपंत कोरडे यांना औरंगजेबानें कैद केलें. ( शका. शि. प्र. पृ. २४ )

कार्तिक व. १=इ. १६६६ नोव्हें. २ वेंकाजीपंत व आनंदराव म्हारीवर निघाले. ( शका. शि. प्र. पृ. ५१ )

मार्ग.=इ. १६६६ नोव्हें.–डिसें. पीरमिया व ताजखान देवरुख येथें होते ते झगडा होऊन मारले गेले. ( शका. शि. प्र. पृ. २४ )

मार्ग. शु. ५=इ. १६६६ नोव्हें. २० आग्र्याहून सुटून शिवाजी राजे राजगडास परत आले. (शका. शिं. प्र. पृ. २४)

पौष व. ११=इ. १६६७ जाने. १०=औ. जु. ९ रजब २४ जयसिंग भीमा नदी उतरून परत उत्तरेस जाण्यास निघाला. (औ. ना. व्हॉ १ पृ. ७०)

श. १५८९ चैत्र व. ५ =इ. १६६७ एप्रि. ३ शिवाजीराजे व औरंगजेब यांचे सख्य झालें आणि त्रिंबकपंत डबीर व रघुनाथपंत कोरडे कैदेतून दिल्लीहून सुटले. (शका. शि. प्र. पृ. २४.)

वैशाख=इ. १६६७ मे बहलोलखान व व्यंकोजी राजे यांनीं रांगण्यास वेढा घातला तो शिवाजी राजे यांनीं मारून काढला (शका. शि. प्र. पृ. २४.)

आषाढ व. ३० =इ. १६६७ जुलै ११=औ. जु. १० मोहर. ३८ जयसिंगाचा मृत्यु. (औ. ना. व्हा. १ पृ. ७२.)

भाद्र.=इ. १६६७ सप्टें. आदिलशहा व शिवाजी राजे यांचा तह झाला. (शका. शि. प्र. पृ. २४.)

भाद्र.=इ. १६६७ सप्टें. शिवाजी राजे यांचें मोगलांशीं तहाचें बोलणें सुरु झालें व अनाजी दत्तो यांनीं मुलखाची चटाई केली. (शका. शि. प्र. पृ. ६१)

आश्विन शु. ११=इ. १६६७ सप्टें. १८ शिवाजी राजे कुडाळास गेले. (शका. शि. प्र. पृ. ५१)

कार्तिक शु. २=इ. १६६७ ऑक्टो. ९ संभाजी औरंगाबादेस जाण्याकरितां निघाला. (शका. शि. प्र. पृ. ५१)

कार्तिक व. ५ =इ. १६६७ ऑक्टो. २७ संभाजी शहाजाद्याच्या भेटीसाठीं औरंगाबादेस गेला. मोगलांशीं तह झाला. (शका. शि. प्र. पृ. २४)

कार्तिक व. ६ = इ. १६६७ आक्टो. २८ संभाजी औरंगाबाद येथें जसवंतसिंगास भेटतो. (शका. शि. प्र. पृ. २४)

कार्तिक व. १३ = इ. १६६७ नोव्हें. ४ संभाजी औरंगाबाद येथें शहाजाद्यास भेटून तेथून परत निघतो. (शका. शि. प्र. पृ. २४व५२)

श. १५९० चैत्र शु. ७=इ. १६६८ मार्च ९=हि १०७८ सवाल ५ शिवाजीस 'राजे' किताब दिल्याबद्दल औरंगजेबाचें पत्र (प.सं.ले १२०१)

श्रावण शु. ५=इ. १६६८ ऑग. २ नीराजी राहुजी फौजेनिशी औरंगाबादेस जाण्यासाठीं निघाले (शका. शि. प्र. पृ. २४,५२)

श्रावण शु. ८=इ १६६८ ऑगष्ट ५ प्रतापराव (कडतोजी गुजर) औरंगाबादेस जाण्यासाठीं फौजेनिशीं निघाले. (शका. शि. प्र. पृ. २४, ५२.)

१५९१ ज्येष्ठ-आषाढ = इ. १६६९ जून शिवाजी राजांचें दंडाराजपुरीच्या शिद्याशीं युद्ध (प. सं. ले. १२५७ व १२६८)

भाद्र. = इ. १६६९ ऑग-सप्टें. औरंगजेबानें काशीस उपद्रव केला व देवालय पाडलें (शका. शि. प्र. पृ. २४; प. सं. ले. १२८१)

पौष = इ. १६६९ डिसें. मोगल व शिवाजी राजे यांचा तह मोडला; प्रतापराव व आनंदराव औरंगाबादेस फौजेनिशी शहाजाद्याजवळ होते ते राजगडास आले. (शका. शि. प्र. पृ. २४)

माघ व. ९=इ. १६७० फेब्रु. ४ मराठ्यांनीं कोंढाणा घेतला तेव्हां उदयभान सुभेदार मारला गेला व हशमाचा सुभेदार तानाजी पडला. (शका. शि. प्र. पृ. २४)

फाल्गुन. शु. १५=इ. १६७० फेब्रु. २४ राजारामाचा राजगडीं जन्म (शका. शि प्र. पृ. २४)

फाल्गुन व. १२=इ. १६७० मार्च ८ = औ. जु. १३ सवाल २५ निळोपंत मुजुमदारानीं पुरंदर घेतला तेव्हां केसो नारायण नन्हेकर पडला व मोंगलांचा किल्लेदार शेख रजिउद्दीन यास पकडलें. (शका. शि. प्र. पृ.२४; प. सं. ले. १२९३; औ. ना. व्हा. २ पृ. २४)

श. १५९२ चैत्र शु. ४=इ. १६७० मार्च १५ शिवाजी राजे यांनीं कल्याण घेतलें (उल्लेख) (प. सं. ले. १२९२)

चैत्र शु. ९=इ. १६७० मार्च १९ निळोपंतांस रवाना केले (शका. शि. प्र. पृ. ५२.)

चैत्र व. ४=इ. १६७० मार्च ३०=औ. जु. १३ शहाजादा मुअज्जम शिवाजीचें सहाय्य घेऊन औरंगजेबाविरुद्ध बंड उभारणार अशी अफवा उठली (प. सं. ले. १२९५; औ. ना. व्हा. २ पृ. २४.)

ज्येष्ठ शु. ४=इ. १६७० मे १३ मराठ्यांनीं माळा लाऊन लोहगड घेतला (शका. शि. प्र. पृ. २५;५२)

आषाढ शु. ८=इ. १६७० जून १५ मराठ्यांनीं हिंदोला घेतला (शका. शि. प्र. पृ. ५२)

आषाढ शु. ९=इ. १६७० जून १६ मराठ्यांनीं माहुली घेतली (शका. शि. प्र. पृ. २५, ५१; प. सं. ले. १३१५)

आषाढ शु. १४=इ. १६७० जून २२ मराठ्यांनीं कर्नाळा घेतला. (शका. शि. प्र. पृ. ५२)

आषाढ व. २=इ. १६७० जून २४ मराठ्यांनीं रोहिडा घेतला. (शका. शि. प्र. पृ. २५)

भाद्रपद=इ. १६७० आगष्ट सु. १०७१ रखर त्रिंबक व शिवनेरी हे किल्ले घेण्यासाठीं मोरोपंतास पाठविण्यांत आले व निळोपंत मुजुमदार यास वतनीचा कारभार करावयास ठेविलें; त्यावेळीं 'एकानें सिद्ध संरक्षण करावें; व एकानें साध्य करावें, दोन्हीं कामें साहेब बराबरीनें मानितातीं' असें राजकीय धोरण शिवाजी राजे यांनीं निश्चित केलें. (प. सं. ले. १३२९)

भाद्रपद=इ. १६७० ऑग. सप्टेंबर शिवाजी राजे रायगडाहून मोंगलांच्या मुलखावर चाल करून गेले व जुन्नरास वेढा घातला. (शका. शि. प्र. पृ. २५; प. सं. ले. १३२९)

भाद्र-आश्वि = इ. १६७० ऑग-अक्टो. = शिवाजी राजांचा जंजिऱ्यावर हल्ला (प. सं. ले. १३२७).

कार्तिक शु. १=इ. १६७० आक्टो. ४-औ. जु. १२ जवल. २७ शिवाजी राजे यांनीं दुसऱ्या वेळीं सुरत लुटिलें, (शका. शि. प्र. पृ. २५; औ. ना. व्हॉ. २ पृ. २९; प. सं. ले. १३३९)

कार्तिक शु. १४ = इ. १६७० आक्टो. १७ शिवाजी राजे सुरतेहून परत येत असतांना दिंडोरीपाशीं त्यांची दाऊदखानाशीं चकमक झाली तेथें एक हत्ती पाडाव केला. मग ते कुंजरगडास येऊन राहिले. (शका. शि. प्र. पृ. २५)

कार्तिक वद्य = इ. १६७० आक्टो. नोव्हें. मोरोपंतांनीं त्रिंबक गड घेतला. (शका. शि. प्र. पृ. २५)

मार्ग. = इ. १६७० नोव्हें. शिवाजी राजे कारंज्यास गेले (शका. शि. प्र. पृ. २५)

मार्ग. व. ११ = इ. १६७० नोव्हें. २८ (पत्र) मराठ्यांचें आरमार नागांव, मुंबई, माहीम या बाजूनें गेलें (प. सं. ले. १३६२).

पौष = इ. १६७० डिसें. शिवाजी राजे यांनीं अहिवंत, रवलाजवला व मारकंडा हे गड काबिज केले. (शका. शि. प्र. पृ. २५)

पौष = इ. १६७० डिसेंबर मराठ्यांनीं फितुरीनें सालेरी घेतली. (शका. शि. प्र. पृ. २५)

माघ वद्य ११ = इ. १६७१ जाने. १६ संभाजी राजांना कारभार सांगितला. (शका. शि. प्र. पृ. ५२)

फाल्गुन शु. १५=इ. १६७१ फेब्रु. १२-हि. १०८१ सवाल १० सिद्दी कासीमनें दंडा राजपुरी परत घेतली. (खाफीखान इ. डौ. व्हॉ. ७ पृ. २९१)

शं. १५९३ अ. वैशाख शु. १० = इ. १६७१ एप्रिल. ८ (पत्र) महबतखान नाशिक त्रिंबकपर्यंत आला व त्यानें अहिवंतगड, साल्हेर वगैरे किल्ले घेतले (प. सं. ले. १३९०)

अ. वैशाख = इ. १६७१ एप्रि. महाबतखानानें वेढा घालून मार्कंडा, अहिवंतगड, जवला व अंचलागिरी हे किल्ले घेतले. (शका. शि. प्र. पृ. २५; प. सं. ले. १३९० )

ज्येष्ठ = इ. १६७१ जून बहादुरखान व दिलेरखान येऊन त्यांनीं सालेरीस वेढा घातला. (शका. शि. प्र. पृ. २५ )

आश्विन = इ. १६७१ सप्टेंबर–आक्टोबर बहादुरखान व दिलेरखान सालेरचा वेढा उठवून औरंगाबादेस आले. (शका. शि. प्र. पृ. २५)

आश्विन शु. ७ = इ. १६७१ सप्टें ३० (पत्र) शिवाजी राजे यांचा वकील इंग्रज कंपनीशीं तहाची वाटाघाट करण्यास मुंबईस आला. (प. सं. ले. १४१८)

कार्तिक शु. ५ = इ. १६७१ आक्टो. २७ शिवाजी राजांचा मुक्काम शिवापट्टणास होता. (प. सं. ले. १४२३)

मार्ग. व. १ = इ. १६७१ दिसें. ६ = सु. १०७२ साबान १४ बार-देशांतुन प्रभानवली संगमेश्वराकडे येणाऱ्या मिठावर जबर जकात बसविण्याविषयीं शिवाजी राजे यांनीं कुडाळच्या सर-सुभेदारास हुकूम पाठविला (प. सं. ले. १४३३)

पौष व. ९ = इ. १६७२ जाने. १३ (पत्र) दिलेरखानानें पुणें लुटलें व तेथील लोकांची कत्तल केली. यावेळीं शिवाजी राजांचा मुक्काम महाडास होता. (प. सं. ले. १४३९)

माघ शु. १३ ते व. ५ = इ. १६७२ फेब्रु. १–७ मोरोपंतांनीं मोंगली सेनापती इख्लासखान, मोहकमसिंग वगैरेंचा पराभव करून सालेरीच्या मार्चाचा वेढा उठविला आणि नंतर मुल्हेरचा किल्ला घेतला. (शका. शि. प्र. पृ. २५ प. सं. ले. १४४७.)

माघ = इ. १६७२ जाने.–फेब्रु. सुलतान शहाआलम औरंगाबादेहून दिल्लीस गेला. (शका. शि. प्र. पृ. २५ )

फाल्गुन व. ११ ते १५९४ वैशाख व. ६ = इ. १६७२ मार्च १५ ते मे ८ लेफ्टनंट उस्टीक वकील रायगडीं आला; पण काम झालें नाहीं. (प. सं. ले. १४६४, १४६९.)

———— = इ. १६७२ प्रतापराव व आनंदराव यांनीं फौजेनिशीं जाऊन बहलोलखानास धरिलें, मोहकमसिंग व दारकोजी भोंसले धरिले. ( शका. शि. प्र. पृ. २५. )

शः १५९४ वैशाख शु. ४ = इ. १६७२ एप्रिल २१ = हि. १०८३ मोहर. ३. सुलतान अब्दुल कुतुबशाहाचा मृत्यु (प. सं. ले. १४६५.)

ज्येष्ठ शु. ५ = इ. १६७२ मे २१ शिवाजी राजांचा वकील निराजीपंत यानें भोंगानगरास जाऊन एक लक्ष होनाचा तह केला व सासष्ट हजार होन घेऊन आला ( शका. शि. प्र. पृ. २६ )

ज्येष्ठ व. ५ = इ. १६७२ जून ५ मोरोपंतानें जवार घेतलें. तेथील राजा विक्रमशहा पळून मोगलाईत गेला. शका. (शि. प्र. पृ. ३५; प. सं. ले.१४७)

आषाढ = इ. १६७२ जून मोरोपंतानें रामनगर घेतलें. ( शका. शि. प्र. पृ. २५; प. सं. ले. १४७४ )

श्रावण शु. ६ = इ. १६७२ जुलै २० ( पत्र ) मोरोपंतानें नाशिक घेतलें ( प. सं. ले. १४८४ )

कार्तिक शु. ७ = इ. १६७२ आक्टो. १८ शिद्दी हिलाल व जाधव हे मोंगलाकडून फुटून मराठ्यांकडे मिळाले ( उल्लेख ) प. सं. ले. १४९६; पर्णा. (अ. २ श्लो. ४३; ४४ )

मार्ग. शु. १५ = इ. १६७२ नोव्हें. २४ = हि. १०८३ साबान १३ दुसऱ्या अल्ली अदील शाहाचा मृत्यु. शिकंदर तख्तावर बसतो व खवासखान वजीर होतो ( बु. स. ( हि ) पृ. ६२६ )

पौष व. ६ = इ. १६७२ डिसें. २९ शिवाजी व विजापूरकर यांच्यामधील तह मोडला; व बाबाजी नाईक पुंडे विजापुरांत वकील होते त्यांना परत बोलावलें. नंतर शिवाजी राजे स्वारीवर निघाले ( शका. शि. प्र. पृ. २६ व ५२ )

पौष व. १४ = इ. १६७३ जाने. ६ अनाजी दत्तो यास पन्हाळ्याच्या स्वारीवर पाठविलें ( शका. शि. प्र. पृ. ५२ )

माघ = इ. १६७३ जाने. = औ. जु. १६ सवाल बहादूरखानाची दक्षिणच्या सुभेदारीवर नेमणूक होते (औ. ना. व्हॉ. २ पृ. ४२)

फाल्गुन व. १३ = इ. १६७३ मार्च ६ अनाजी दत्तो यांनीं भेदे करून पन्हाळा घेतला. (शका. शि. प्र. पृ. २६; पर्णा. अ. ३)

श. १५९५ चैत्र शु. १ = इ. १६७३ मार्च ९ शिवाजी राजे रायगडाहून पन्हाळ्यास गेले. (शका. शि. प्र. पृ. २६)

चैत्र व. १० = इ. १६७३ एप्रि. १ मराठ्यांनीं परळीचा किल्ला घेतला (शका. शि. प्र. पृ. २६)

वैशाख शु. ९ = इ. १६७३ एप्रिल १५ – हि. १०८४ मोह. ७ उम्राणीची लढाई. प्रतापरावानें बहालोलखानाचा पराभव केला. (शका. शि. प्र. पृ. २६; हिं. मु. स. ६३१; पर्णा. अ. ५)

वैशाख शु. १० = इ. १६७३ एप्रील १६ (पत्र) मराठ्यांच्या सैन्यानें हुबळी लुटली; त्यांत इंग्रजी व्यापाऱ्यांचा कांहीं माल लुटला गेला (प. सं. ले. १५२४)

श्रावण व. ९ = इ. १६७३ जुलै २७ मराठ्यांनीं सातारा घेतला. (शका. शि. प्र. पृ. २६)

आश्विन शु. ७ = इ. १६७३ आक्टो. ७ मराठ्यांनीं पांडवगड घेतला. (शका. शि. प्र. पृ. ५२)

आश्विन शु. १० = इ. १६७३ आक्टो. १० शिवाजी राजे विजयादशमीच्या मुहूर्ते निघाले व नंतर बंकापूर लुटलें (शका. शि. प्र. पृ. २६)

आश्विन शु. १३ = इ. १६७३ आक्टो. १३ शिवाजी राजे सातान्यास आले; व बाळाजी आवजी प्रभु यास पालखी दिली (शका. शि. प्र. पृ. ५२)

आश्विन ते मार्ग. = इ. १६७३ आक्टो. ते डिसें. शिवाजी राजे कारवार (कानडा) प्रांतावरील स्वारींत तीन महिने होते. (प. सं. ले. १६०४)

कार्तिक = इ. १६७३ आक्टो.–नोव्हें. सर्जाखानाशीं विठोजी शिंदे यांचें युद्ध होऊन विठोजी शिंदे ठार झाला. (शका. शि. प्र. पृ. २६)

मार्ग. = इ. १६७३ नोव्हें.–डिसें. सर्जाखानास महिमाजी शिंयानें मारिलें. ( शका. शि. प्र. पृ. ६४ )

मार्ग. शु. ६ ते १० = इ. १६७३ डिसें. ४ ते ८ शिवाजी राजे यांचा कद्रा येथें मुक्काम; बहलोलखान व सर्जाखान यानीं बंकापूर व चांदगड नजीक मराठी सैन्याचा पराभव केला. ( प. सं. ले. १६०६ व १६०२ )

मार्ग. व = इ. १६७३ डिसें. शिवाजी राजे कारवार प्रांतांतून परत फिरतात ( प. सं. ले. १६०६ )

माघ शु. १० पूर्वी = इ. १६७४ फेब्रु. ६ दिलेरखानाचा मोड करून मराठ्यांनीं त्याला कोंकणांत उतरूं दिलें नाहीं ( प. सं. ले. १६१५ )

माघ व. १४ = इ. १६७४ फेब्रु. २४ बहलोलखान व प्रतापराव यांचें युद्ध निवटयाजवळ झालें त्यांत प्रतापराव पडले ( शका. शि. प्र. पृ. २६; प. सं. ले. १६२५ )

फाल्गुन शु. ९ = इ. १६७४ मार्च ६ पूर्वी शिवाजी राजे रायगडास परत आले ( प. सं. ले. १६१८ )

फाल्गुन व. ७ = इ. १६७४ मार्च १८ शिवाजी राजे यांची स्त्री वारली ( प. सं. ले. १६२५ )

फाल्गुन व. ११ = इ. १६७४ मार्च २३ आनंदरावानें संपगांवची पेठ लुटली व तेथून परत येतांना त्याची खिदरखानाची लढाई झाली; आनंदरावाचा जय झाला. ( शका. शि. प्र. पृ. २६, प. सं. ले. १६२५ )

श. १५९६ चैत्र शु. ७ = इ. १६७४ एप्रिल ३ पोर्तुगीजांचा दुभाष्या नारायण शेणवी शिवाजी राजे यांना दरबारांत भेटतो. ( प. सं. ले. १६२५ )

चैत्र शु. ८ = इ. १६७४ एप्रि. ४ दौलतखानानें शिद्दी संबूळच्या आरमाराचा सातवळीचे (?) खाडींत पराभव केला (उल्लेख) ( प. सं. ले. १६२५ )

चैत्र शु. १३ = इ. १६७४ एप्रिल ८ = औ. जु. १७ मोह ११ खैबर घाटांतील बंड मोडण्यासाठीं औरंगजेब दिल्लीहून येऊन हसन अबदल (जि. अटक) येथें गेला. तेथून सुमारें दोन वर्षांनी (२७।३।१६७६ रोजीं) तो परत आला (औ. ना. व्हॉ. २ पृ. ४७)

चैत्र शु. १३ = इ. १६७४ एप्रिल ८ शिवाजी राजे यानीं चिपळूण येथें लष्कराची पाहाणी केली व हंबीरराव मोहिते यास सरनौबती दिली. (शका. शि. प्र. पृ. २७; खं. ८ पृ. २३)

चैत्र व. १२ = इ. १६७४ एप्रिल २२ शिवाजी राजे यांचा मुक्काम कारवारपासून एक दिवसाच्या अंतरावर होता. (प. सं. ले. १६३२)

चैत्र व. १४ = इ. १६७४ एप्रिल २४ शिवाजी राजे यानीं केळंजा घेतला. (शका. शि. प्र. पृ. २७)

वैशाख व. ५ = इ. १६७४ मे १४ (पत्र) शिवाजी राजे चिपळुणाहून रायरीस आले (प. सं. ले. १६४३)

वैशाख व. ९ = इ. १६७४ मे १९ (पत्र) शिवाजी राजे प्रतापगडच्या भवानीला सोन्याचें छत्र अर्पण करण्यासाठीं गेले होते. (प. सं. ले. १६४५)

वैशाख व. ११ = इ. १६७४ मे. २१ शिवाजी राजे प्रतापगडाहून परत रायगडास आले. (प. सं. ले. १६४९)

ज्येष्ठ शु. ४ = इ. १६७४ मे २९ शिवाजी राजे यांची मुंज झाली (शका. शि. प्र. पृ. २७)

ज्येष्ठ शु. ६ = इ. १६७४ मे ३० शिवाजी राजे यानीं समंत्रक विवाह केला. (शका. शि. प्र. पृ. २७)

ज्येष्ठ शु. ११ = इ. १६७४ जून ४ शिवाजी राजे यांची सुवर्णतुला केली. वजन १७००० होन अगर १६० पौंड भरलें. (प. सं. ले. १६८४)

श. १५९६ ज्येष्ठ शु. १३ शुक्रवार = इ. १६७४ जून ६ = सु. १०७५ रबल १०
शिवाजी राजे यांना राज्याभिषेक करण्यांत आला (तीन घटका रात्र उरली असतां; उजाडतां शनवार); राज्याभिषेक शक सुरू झाला. (शका. शि. प्र. पृ. २७ प. सं. ले. १६८४)

ज्येष्ठ व. ९ = इ. १६७४ जून १७ जिजाबाई निवर्तली. (शका. शि. प्र. पृ. ५२ प. सं. ले. १६८४)

भाद्र. शु. ६ = इ. १६७४ ऑग. २६ फोंड्यावर छापा घालण्याकरितां शिवाजी राजे यांचा सेनापती कुडाळास गेला पण तो महमदखानाच्या सावधगिरीमुळें अपयश पावला. (प. सं. ले. १६८४)

आश्विन शु. ५ = इ. १६७४ सप्टें. २४ शिवाजी राजे यांनीं पुन्हा राज्याभिषेक विधी केला (शका. शि. प्र. पृ. ५२; राज्याभिषेक कल्पतरू.)

आश्विन शु. ६ = इ. १६७४ सप्टें. २५ प्रतापगडीं देवालयावर वीज पडली. (शका. शि. प्र. पृ. ५२)

मार्ग. व. ८ = इ. १६७४ डिसें. १० शिवाजी राजे यांची खानदेशावर स्वारी (प. सं ले. १७१०)

माघ शु. ३ = इ. १६७५ जाने. १८ मराठ्यांच्या ताब्यांतील पद्मदुर्गावर हबशी फौजांचा हल्ला (उल्लेख) (प. सं. ले. १७१८)

माघ व. ५ = इ. १६७५ फेब्रु. ४ संभाजी राजे यांची मुंज झाली. (शका. शि. प्र. पृ. २७.)

माघ व. ७ = इ. १६७५ फेब्रु. ६ दत्ताजी वाकनिसानें कोल्हापूरकडे स्वारी केली व आण्णाजीनें फोंड्याच्या स्वारीवर निघण्याची तयारी केली (उल्लेख) (प. सं. ले. १७२४)

फाल्गुन शु. १३ = इ. १६७५ फेब्रु. २७ मोंगलांच्या सैन्यानें कल्याण भिवंडी लुटली; मराठ्यांचा दंडाराजपुरीस वेढा (प. सं. ले. १७२९)

चैत्र शु. ५ = इ. १६७५ मार्च २१ शिवाजी राजे यांचा मुक्काम वेलवड्यास ( Vellorah ) होता. ( प. सं. ले. १७४२ )

चैत्र शु. ८ = इ. १६७५ मार्च २४ शिवाजी राजे यांचा मुक्काम राजापुरास झाला. दुसरें दिवशीं इंग्रजांच्यातर्फे नजराणा देण्यांत येऊन सवलतींची मागणी करण्यांत आली. ( प. सं. ले. १७४२ )

श. १५९७ चैत्र शु. ९ ते श्राव. शु. ११ = इ. १६७५ मार्च २५ ते जुलै २१ शिवाजी राजे व बाहादुरखान यांच्यात तहाचें बोलणें चाललें होतें पण तें निष्फळ ठरलें ( प. सं. ले. १७३९; १७६५ )

चैत्र व. २ = इ. १६७५ एप्रिल १ मराठ्यांनीं कोल्हापूर घेतलें. ( प. सं. ले. १७४० )

चैत्र व. ५ = इ. १६७५ एप्रिल ४ मराठ्यांनीं फोंड्यास वेढा घातला. ( शका. शि. च. प्र. पृ. ६४; प. सं. ले. १७४१ )

वैशाख शु. २ = इ. १६७५ एप्रिल १७ फोंड्याच्या कोटास सुरूंग लाऊन उडविला ( शका. शि. च. प्र. पृ. २७ )

वैशाख शु. ७ = इ. १६७५ एप्रिल २२ ( पत्र ) मराठ्यांच्या सैन्यानें आदिलशाही किल्ला एतगिरी व गोवळकोंडेकरांची दोन शहरें व पोर्तुगीज हद्दींवरील कुकळी व वरोडे हीं गांवें लुटलीं ( प. सं. ले. १७४३ )

वैशाख शु. १२ = इ. १६७५ एप्रिल २६ मराठ्यांच्या सैन्यानें कारवारास जाळपोळ केली ( प. सं. ले. १७४७ )

वैशाख व. ९ = इ. १६७५ मे ८ ( पूर्वी ) मराठ्यांनीं फोंडा किल्ला जिंकून तेथील किल्लेदार महंमदखान यास कैद केलें; आणि शिवेश्वरच्या किल्ल्यास वेढा दिला. ( प. सं. ले. १७४७ )

ज्येष्ठ शु. ७ = इ. १६७५ मे २१ कारवार प्रांतांतील बराच भाग मराठ्यांच्या ताब्यांत आला ( प. सं. लें. १७५१ )

ज्येष्ठ व. १३ = इ. १६७५ जून ११ कारवार प्रांतांतून रायगडास परत जातांना राजापुरास शिवाजी राजे यांचा मुक्काम ( प. सं. ले. १७५८ )

ज्येष्ठ = जून कडवाडी, शिवेश्वर व अंकोर्ले येथील ठाणीं मराठ्यांनीं ताब्यांत घेतलीं. बाबाजी नाईक पुंडे मरण पावले (शका. शि.. प्र. पृ. २७; प. सं. ले. १७५१)

भाद्र. शु. ८ = इ. १६७५ आगष्ट १८ (पत्र) मराठ्यांच्या सैन्यानें सोंधे प्रांतावर हल्ला केला (प. सं. ले. १७७४)

भाद्र. व. १३ = इ. १६७५ सप्टें. ७ इंग्रजांचा वकील रायगडास शिवाजी राजांना भेटून इंग्रजांच्या वखारींना अभयपत्राबद्दलचें अभिवचन मिळविलें. (प. सं. ले. १७७६)

मार्ग. = इ. १६७५ नोव्हें. मराठ्यांचें जंजिऱ्याशीं व पोर्तुगीजांशीं युद्ध (प. सं. ले. १७७९ व १७९८)

मार्ग. शु. ५ = इ. १६७५ नोव्हेंबर ११ मराठ्यांनीं सातारा घेतला (शका. शि. प्र. पृ. २७)

मार्ग. शु. ५ = इ. १६७५ नोव्हेंबर ११ = हि. १०८६ रमजान ३ अब्दुल करीम (बहलोलखान) यानें खवासखानास कैद केलें व विजापूर दरबारचीं सूत्रें हातीं घेतलीं (हिं. बु. स. पृ. ६३९; शका. शि. प्र. पृ. २७; प. सं. ले. १८०५)

मार्ग. व. ४ = इ. १६७५ नोव्हें. २६ मोगलांचें सैन्य कल्याणपर्यंत चालून आलें (प. सं. ले. १७९८)

माघ शु. ७ = इ. १६७६ जाने. १२ = हि. १०८६ जिल्का. ६ बहलोलखानाच्या हुकुमावरून बंकापूरच्या किल्लेदारानें खवासखानास ठार मारलें; विजापुरांत दंगेधोपे व यादवीयुद्ध सुरू झालें (हिं. बु. स. पृ. ६४४; विजा. इ. पृ. २३४)

माघ–फाल्गुन = इ. १६७६ जाने–फेब्रु. शिवाजीराजे साताऱ्यास आले व आजारी पडले; त्यांच्या मृत्यूच्या अफवा उठल्या (शका. शि. प्र. पृ. ५३; प. सं. ले. १८०५, १८११ व १८१३).

श. १५९८ चैत्र व. २ = इ. १६७६ मार्च २१ = हि. १०८७ मोहर-१६ विजापूर दरबारांतील दक्षिणी पक्षाचा पुढारी सर्जाखान व पठाण पक्षाचा पुढारी अबदुलकरीम (बहलोलखान) यांच्यांत यादवी-

युद्ध सुरू झालें व सर्जाखानानें मोंगली सरदार बहादुरखान याला आपल्या मदतीस बोलावलें ( हिं. बु. स. पु. ६४६ )

ज्येष्ठ = इ. १६७६ मे मोरोपंत पेशवे रामनगर घेऊन रायगडास परत आले ( प. सं. ले. १८४८; १८५१ )

ज्येष्ठ व ३० = इ. १६७६ जून १ = हि. १०८७ रबिवल २८ मोगली सरदार बहादुरखान व आदिलशाही बहलोलखान यांच्या सैन्यांत हलगीस (अलीआबाद नजीक, लढाई झाली. त्यावेळीं मोंगलाचा एक नामांकित सरदार इस्लामखान रूमी हा ठार झाला; व बहलोलखानाची फत्ते झाली (शका. शि. पु. २८; हिं. बु. पु. ६४७ )

आषाढ व. ४ = इ. १६७६ जून १९ नेताजी पालकर यास प्रायश्चित्त देऊन शुद्ध करुन घेतलें ( शका. शि. प्र. पु. २८; प. सं. ले. १८६३ )

आषाढ व. ५ = इ. १६७६ जून २० मराठ्यांच्या सैन्यानें अथणी लुटली ( प. सं. ले. १८५३ )

श्रावण = इ. १६७६ आगष्ट मोरोपंत पेशवे यांचा जंजिन्यावर हल्ला ( प. सं. ले. १८६६ )

श्रावण शु. १० = इ. १६७६ आग. ८ = सु. १०७७ जखर ८ रामदास स्वामी शिवथरहून सज्जनगडास; राहण्यास. गेले; त्यासंबंधीं शिवाजी राजे यांचा त्या किल्ल्याच्या हवालदारास हुकूम ( प. सं. ले. १८६५ )

आश्वीन शु. १० = इ. १६७६ आक्टो. ६ नारायण शेणवी वकील रायगडाहून मुंबईस परत आला ( प. सं. ले. १८७३,१८७४ )

आश्वीन शु. १० = इ. १६७६ आक्टो. ६ दसऱ्याच्या मुहूर्तावर शिवाजीराजे कर्नाटकच्या स्वारीवर निघाले ( वतनपत्रें वगैरे पृ. ४७ )

कार्तिक शु. ६ (?) = इ. १६७६ नोव्हें. १ संभाजी राजे शृंगारपुरास जाऊन राहिले ( श. शि. प्र. पृ. २८ )

मार्ग. शु. ७ = इ. १६७६ दिसें. १ सिद्दीसंबूल जैतापूर जाळतो (प. सं. ले. १८८३)

पौष = इ. १६७७ जाने. हुसेनखान माइणा व हंबीरराव यांचा गदगप्रांतांत यालगेदलानजीक झगडा होऊन हुसेनखान पाडाव सांपडला (शका. शि. प्र. पृ. २८)

फाल्गुन शु. १० = इ. १६७७ मार्च ४ छत्रपती शिवाजी यानीं भागानगरास कुतुबशहाची भेट घेतली व नंतर त्याची कांहीं फौज बरोबर घेऊन कर्नाटकच्या स्वारीवर गेले (शका. शि. प्र. पृ. २८; प. सं. ले. १९०१)

इ. १६७६–७७ = सु. १०७७ आदिलशाही मुत्सद्दी काशी यानतराव मरण पावला (खं. १८ ले. २४)

श १५९९ चैत्र व. १२ = इ. १६७७ एप्रील १८ त्रिंबकपंत डबीर शिवापुरास वारले (शका. शि. प्र. पृ. २८)

चैत्र = इ. १६७७ मार्च–एप्रिल शिवाजीराजे यानीं जिंजी घेतली व कर्नाटक काबीज केलें (शका. शि. प्र. पृ. २८; प. सं. ले. १९२०)

वैशाख शु. १३ = इ. १६७७ मे ५ शिवाजीराजे पेडापोलाम येथें आले; आणि त्यांचें कांहीं घोडदळ चार दिवसांनीं कांचीवरंवरून जिंजीला गेलें (प. सं. ले. १९३२)

वैशाख व. ७ = इ. १६७७ मे १३ शिवाजीराजे यांच्या सैन्यानें जिंजी घेतली; नंतर दोन दिवसांनीं राजे तेथें गेले (मद्रा. फॅ. रें)

ज्येष्ठ शु. २ = इ. १६७७ मे २३ शिवाजीराजांनीं वेलोरास येऊन वेढ्याचे कामास सुरुवात केली (प. सं. ले. १९३७)

आषा = इ. १६७७ जून त्रिपतीजवळ मराठ्यांनीं सैदखान बैरागी पाडाव केला; स्वतः शिवाजीराजांची छावणी तेवनापट्टणच्या दक्षिणेस होती. (शका. शि. प्र. पृ. २८; प. सं. ले. १९४८)

आषा. शु. ७ = इ. १६७७ जून २७ शीरखानाचा पाठलाग, करीत मराठ्यांचें सैन्य त्रिवादी, चीनागिरीपट्टण व तिरुमलवाडी येथें गेलें ( प. सं. १९४८ व १९५३ )

आषाढ शु. १४ = इ. १६७७ जुलै ३ = हि. १०८८ जवल १२ मोंगलांनीं रणमस्तखानाच्या वियमानें आदिलशाही किल्ला शहादुर्ग नळदुर्ग घेतला. ( हिं. बु. स. पृ. ६४९; विजा. इ. पृ. २३६; शका. शि. म. पृ. २८ )

आषाढ व. १ = इ. १६७७ जुलै ५ शेरखान आपला मुलूख तहानें शिवाजीराजांना देतो. ( प. सं. ले. २७६७ )

आषाढ व. ३ = इ. १६७७ जुलै ७ = हि. १०८८ जवल १६ मोगली सरदार बहादुरखान यानें आदिलशाही कोट कलबुर्गी हा घेतला ( शका. शि. म. पृ. २८; हि. बु. स. पृ. ६४९; विजा. इ. पृ. २३६; प. सं. ले. १९६९ )

आषाढ व. १२ = इ. १६७७ जुलै १६ शिवाजीराजे यांचा मुकाम तिरुमलवाड्यास होता. ( प. सं. ले. १९५३ )

श्रावण शु. ७ = इ. १६७७ जुलै २६ वालगुडापूर येथील कोटाची हवालदारी यशवंतराव शहाजी कदम यांस दिल्याचें व त्याचें लिहिणें करण्यासाठीं तिमाजी नारायण याची नेमणूक केल्याचें शिवछत्रपतींचें पत्र ( प. सं. ले. १९५६ )

श्रावण शु. ८ = इ. १६७७ जुलै २७ व्यंकोजी राजा शिवाजी राजे यांच्या गोटांतुन पळून गेला ( प. सं. ले. १९५७ )

श्रावण शु. ११ = इ. १६७७ जुलै ३० उटलूरच्या कोटाचें मुद्राधारीपण नागोजी भोसले यास व हवालदारी केदारजी फिरंगोजी जाधव यास छत्रपती शिवाजी यानीं दिली. ( प. सं. ले. १९५८–६० )

श्रावण शु. १४ = इ. १६७७ ऑग. २ शिवाजी राजे वलिगोंडपूर तुंडुपगुर्ती या मार्गानें येऊन वृद्धाचलं येथील देवदर्शनास गेले. ( प. सं. ले. १९६४ )

शं. १५९९ श्रावण = इ. १६७७ आग. संताजी राजे, रघुनाथपंत व हंबीरराव यांना जिंजी प्रांतांत ठेऊन शिवाजी राजे तोरगल प्रांताकडे जाण्यास निघाले ( प. सं. ले. २३३२ )

भाद्र. = इ. १६७७ ऑग. सप्टें. दक्षिणच्या सुभेदारीवरून बहादुरखानास काढून त्याच्या जागीं दिलेलखानाची नेमणूक केली ( शका. शि. प्र. पृ. २८; प. सं. ले. १९७९ )

भाद्र. व. २ = इ. १६७७ सप्टें. ३ = मु. १०७८ रजब १५ रामदासांच्या रामाच्या देवालयास दर गांवांत ११ बिघेप्रमाणें ११ गांवांत इनाम चालविण्याबद्दल दत्ताजीपंत वाकनीसाचा हुकूम ( प. सं. ले. १९७१ )

आश्विन = इ. १६७७ सप्टें–आक्टो. सर्जाखान, मसूदखान व भागानगरगर यांनीं मिळून मळखेडीस दिलेरखानाशीं झगडा केला व मोगल नळदुर्गास गेला. ( शका. शि. प्र. पृ. २९. )

कार्तिक व. १ = इ. १६७७ आक्टो. ३१, मराठ्यांच्या सैन्यानें श्रीरंगपट्टण लुटलें ( उल्लेख. ) ( प सं. ले. १९९२ )

मार्ग. शु. १ = इ. १६७७ नोव्हें. १५ व्यंकोजी, संताजीवर अहिरीजवळ हल्ला करितो. ( मार्टिन पृ. ३१७; प. सं. ले. १९९५ )

मार्ग. व. ९ = इ. १६७७ डिसें. ८ दत्ताजी पंडित हुबळी लुटतो. ( उल्लेख. ) ( प. सं. ले. १९९८; २००९ )

पौष शु. ९ = इ. १६७७ डिसें. २२ शिवाजीराजांचा वकील पितांबर शेणवी चौथाईसंबंधींचें पत्र देण्यासाठीं गोव्यास जातो. ( प. सं. ले. २००२ )

पौष शु. १० = इ. १६७७ डिसें. २३ = हि. १०८८ जिल्काद. ८ बहलोलखानाचा मृत्यू. ( हिं. बु. स. पृ. ६५७; विजा. इ. पृ. २३९; शका. शि. प्र. पृ. २९ )

माघ शु. ४ = इ. १६७८ जाने. १६ मोरोपंतांनें त्रिंबक, नाशिक, वगैरे शहरें लुटलीं ( उल्लेख. ) ( प. सं. ले. २००७ )

फाल्गुन शु. ३ = इ. १६७८ फेब्रु. १४ सिद्दी मसऊद विजापूरचा वजीर होतो असा उल्लेख ( प. सं. ले. २०१३ )

१६०१ चैत्र शु. १० = इ. १६७९ मार्च ११ रायगडी तरवारींतून ज्वाला निघाल्या. ( शका. शि. प्र. पृ. २९ )

चैत्र व. १ = इ. १६७९ मार्च १८ मराठ्यांनीं बहादुरविंडा घेतला. ( शका. शि. प्र. पृ. ५३ )

वैशाख शु. २ = इ. १६७९ एप्रिल २ = औ. ज. २२ र.वल १ (फरूकी-यांच्या मतें ) औरंगजेब हिंदूवर जिजिया लादतो. ( सरकार यांच्या मतें २ एप्रिल १६७८ रोजीं हा कर सुरूं झाला.) (फ. औ. च. पृ. १५९; औ. ना. व्हॉ. २ पृ. ८२ )

वैशाख व. २ = इ. १६७९ एप्रिल १७ दिलेरखानानें भूपालगड घेतला ( शका शि. प्र. पृ. ५३ )

श्रावण व. ७ = इ. १६७९ ऑगष्ट १८ = हि. १०९० रजब २० दिलेरखान भीमा उतरून विजापुरावर हल्ला करण्याकरितां येतो. ( हिं. बु. स. पृ. ७०१; प. सं. ले. २२३६ )

भाद्र. = इ. १६७९ सप्टें. = हि. १०९० साबान मोगल मंगलवेढे काबीज करतात ( हिं. बु. स. पृ. ७०६ )

भाद्र. शु. १ = इ. १६७९ ऑग. २६ शिवाजी राजे यांनीं शामजी नाईक यास विजापुरास पाठविलें ( शका. शि. प्र. पृ. ३० )

भाद्र. व. १० = इ. १६७९ सप्टें. १९ मराठ्यांचें इंग्रजाबरोबर पहिलें नाविक युद्ध ( प. सं. ले. २१३१ )

भाद्र. व. १३ = इ. १६७९ सप्टें. २२ शिवाजीराजे यांनीं खांदेरी बेट ताब्यांत घेतलें व तेथें तटबंदी केली ( उल्लेख ) ( प. सं. ले. २१३३ )

आश्विन शु. ३ = इ. १६७९ सप्टें. २७ वांसोटा किल्ल्यावर मराठ्यांना ४ घागरी रुपये ( २६००० ) सांपडले. ( शका. शि. प्र. पृ. ३० )

आश्विन शु. १२ = इ. १६७९ आक्टोबर ६ = हि. १०९० रमजा ११. दिलेरखान विजापुराजवळ येतो, व १४ नोव्हेंबर रोजीं

निघून जातो ( शका. शि. पृ. ३०; हिं. बु. स. पृ. ७०८ व ७१४ )

आश्विन व. ९ = इ. १६७९ आक्टोबर १८ मराठ्यांचें इंग्रजांशीं दुसरें नाविक युद्ध ( प. सं. ले. २१४४ )

कार्तिक = इ. १६७९ आक्टो. नोव्हें. शिवाजी राजे व आदिलशाहा यांचा तह झाला. ( शका. शि. प्र. पृ. ३० )

कार्तिक शु. ७ = इ. १६७९ आक्टोबर ३१ = हि. १०९० सवाल ५ शिवाजी राजे विजापूर येथें आदिलशाहाला मदत करण्याकरितां येतात; व तेथून पांचवे दिवशीं मोगली प्रांतांवर स्वारी करण्यास निघतात. ( हिं. बु. स. पृ. ७०९ )

कार्तिक = इ. १६७९ नोव्हेंबर शिवाजी राजे जालनापूर लुटतात ( शका. शि. प्र. पृ. ३० )

कार्तिक = इ. १६७९ नोव्हें. जालनापुराहून पट्टागडाकडे येत असतां रणमस्तखान व असफखान व जावीतखान वगैरे उमराव ८।१० हजार स्वारानिशी मराठ्यांच्या सैन्यावर चालून आले; त्यांना पराभूत करून शिवाजी राजे पट्टागडास आले ( प. सं. ले. २२३६; व २१८५ )

मार्ग = इ. १६७९ दिसें. शिवाजी राजे पन्हाळ्यास आले व तेथून विजापुरकरांना द्रव्याचें व सैन्याचें सहाय पाठविलें; यामुळें दिलेलखानास वेढा उठवावा लागला ( प. सं. ले. २२३६ )

मार्ग = इ. १६७९ डिसें. मराठ्यांनीं खानदेशावर हल्ला व धरणगांवची लूट केली. ( उल्लेख ) ( प. सं. ले. २१९० )

मार्ग व. ९ = इ. १६७९ डिसें. १६ शिवाजी राजे पन्हाळ्यास जाणार अशी बातमी ( प. सं. ले. २१९७ )

मार्ग व. १४ = इ. १६७९ डिसें. २१ = हि. १०९० जिलकाद २७ संभाजी दिलेरखानाच्या तळांतून पळतो व पन्हाळ्यास येतो ( शका. शि. प्र. पृ. ३०; हिं. बु. स. पृ. ७१६ टीप. )

पौष व. ७ = इ. १६८० जाने. १३ शिवाजी राजे व संभाजी यांची भेट झाली. ( शका. शि. प्र. पृ. ३० )

माघ = इ. १६८० जाने. फेब्रु. आदिलशाहा व मोगल यांचा तह होऊन विजापूरचा वेढा उठला. ( शका. शि. प्र. पृ. ३० )

माघ शु. ११ = इ. १६८० जाने. ३१ (पत्र) दौलतखानाचा उंदेरीवर अयशस्वी हल्ला ( प. सं. ले. २२१९ )

फाल्गु. व. २ = इ. १६८० मार्च ७ राजारामाची मुंज झाली ( शका. शि. प्र. पृ. ३० )

फाल्गु. व. १० = इ. १६८० मार्च १५ रायगडावर राजारामाचा प्रतापरावाच्या मुलीशी विवाह झाला. (शका. शि. प्र. पृ. ३०)

श. १६०२ चैत्र शु. ४ = इ. १६८० मार्च २४ शिवाजी राजे यांचें शेवटचें दुखणें सुरू झालें. ( प. सं. ले. २२५३ )

चैत्र. शु. १५ = इ. १६८० एप्रिल ३ शिवाजी राजे रायगडावर मृत्यू पावले ( शका. शि. प्र. पृ. ३० )

---

# शिवकालीन शकावली

## पुरवणी

——:0:——

श. १५५८ आश्विन शु. ६ = इ. १६३६ सप्टेंबर २६ "निजामशाहीचा मालक जो वाल बादशहा त्याच्यासह चौल येथील किल्ल्यांत मला राहूं याल काय" असें पत्रद्वारें शहाजीनें पोर्तुगीजांना विचारलें, पण त्यांनीं नकार दिला. (प. सं. ले. २७९९ व २८००)

श. १५७० श्रावण व. ३० = इ. १६४८ ऑगस्ट ८ = सु. १०४८ रजब २८. फत्तेखान यास महमद् अदिलशहानें कोंढाणा किल्ल्याच्या तर्फेस स्वारीसाठीं पाठविलें. (प. सं. ले. २५३९)

श. १५७१ ज्येष्ठ व. = १६४९ मे १६ (नंतर) शिवाजी राजे खेडेबारे गांवातून पुणें येथें राहण्यास येतात (प. सं. ले. २५९०)

श. १५७१ आषाढ-भाद्रपद=इ. १६४९ जुलै-सप्टेंबर. अफजलखानाची जावलीवर स्वारी. (प. सं. ले. ५५७, ५५८, ५६०, ५६४, ५६७)

श. १५७१ मार्गशीर्ष व. ८ = इ. १६४९ डिसेंबर १७ = हि. १०५९ जिल्हेज २२ जिंजीचा किल्ला विजापुरकरांच्या ताब्यांत आला. (हिं. बु. स. पृ. ५१४)

श. १५७१-७६ = इ. १६४९-१६५४ शहाजीची कैदेंतून सुटका झाल्यानंतर तो दाक्षिणेंतच असतो व ह्या अवधींतील पत्रांवर जैनाखान पीरजादे ह्याची 'परवानगी' असते. पुढें ह्यानंतर शहाजी कायमचा कर्नाटकांत गेला. (प. ले. सं. २५७५, २५९५)

श. १५७२ कार्तीक = १६५० नोव्हें. शहाजी राजे यांचे आधीन हिरडस मावळ आहे व अदिलशाही अधिकाऱ्यांच्या सांगण्यावरून तो शिवाजी राजे यांना पत्र लिहून बंदोबस्त व शांतता राखण्याविषयीं कळवितो (प. सं. ले. २५७१)

श. १५७७ पौष = इ. १६५६ जाने. विजापुरकरांनीं फत्तेखानास शिवाजी राजावर पाठविलें. तेव्हां खळदबेलसर येथें ३ ह. मावळ्यानिशीं शिवसैन्यानें फत्तेखानाचा पराभव केला. आणि राजगड व तोरणा या किल्ल्यांच्या बांधकामास सुरुवात केली. (खं. १५ ले. ३०२, ३१३, प. सं. ले. २५५९; शि. च. प्र. पृ. ४१, ४२)

## पुरवणी शिवकालीन शकावली

श. १५७८ = इ. १६५६ शिवाजीराजांनीं सुपे घेतल्यानंतर एसाजी गणेश यास तेथें हवालदार म्हणून नेमलें (खं. २० ले. ७१)

श. १५८० आश्विन शु.१५=१६५८ आक्टो. १ = सु. १०५९ मोहर १३ शिवाजी राजे पुरंदराहून कर्नाटकांत मसलतीस म्ह. स्वारीवर गेले होते (प. सं. ले. ७५३ उल्लेख)

श. १५८५ चैत्र शु. ५ = इ. १६६३ एप्रील ३ = सु. १०६३ रम ४. सिंहगडावर फितूर झाल्याची बातमी येऊन त्याच्या बंदोबस्ताविषयीं शिवाजीराजांनी मोरोपंतांस आज्ञा दिली (प. सं. ले ९२५)

श. १५८५ पौष अखेर = १६६४ जाने. सुरतेवरील पहिल्या स्वारींतून परत येतांना मराठी सैन्याचा नेताजी पालकराच्या आधिपत्या-खालीं लोहगडीं मुक्काम (प. सं. ले. २५९०)

श. १५९३ = इ. १६७१–७२ शिवाजीराजे रायगडावर १॥। लक्ष रु. खर्चून घरें, तळीं इ. बांधण्यास आज्ञा देतात व इतरहि २० किल्ल्यांवरील दुरुस्ती वगैरेसाठीं रकम मंजूर करतात (प. सं. ले. १४५९)
—शिवाजी आपल्या ताब्यांतील मुलखांतून होन गोळा करून ते मोंगलाशीं लढण्याचे वेळीं उपयोगीं पडतील म्हणून संग्रह करून ठेवण्यास आज्ञा करतात (प. सं. ले. १२५६)

श. १५९४ चैत्र व. १ = इ. १६७२ एप्रिल ३ शिवाजीराजे यांची समर्थ रामदास यांशीं 'पाहिलीचि' भेट (प. ले. सं. १८७५)

श. १५९६ = श. १६७४ शिवशाहींत वतनदारावर मिरासपट्टी बसविली गेली (शिव. च. साहित्य. खं. १ ले. ५५)

श. १५९९ फाल्गुन व. २ = इ. १६७८ फेब्रु. २८ कर्नाटकच्या स्वारींतून परत येतांना मराठ्यांच्या सैन्याची अडवणूक (बेलवडी येथील) देसाइणीनें केली होती (प. सं. ले. २०१९ उल्लेख.)

# शिवकालीन पत्रांसाठीं शोधिलेलीं

## गांवें व घराणीं

| गांव | घराणें |
|---|---|
| अकोलें | देशपांडे |
| अथणी | शेट्टी |
| अक्षी | पाटील |
| आळंद (सं. भोर) | बांदल देशमुख |
| ओझर्डें | पिसाळ देशमुख |
| ओतूर | चैतन्य |
| अंबोर्डे | खोपडे |
| इंदापूर | काजी |
| " | देशमुख |
| " | देशपांडे |
| इंदूर—बोधन | मठ |
| उंबरज | जाधव |
| कऱ्हाड | अग्निहोत्री |
| कल्याण | जोशी |
| काझड | पाटील |
| कानद्खोरे | मरळ देशमुख |
| कारी | मुळ्ये |
| " | जेधे–देशमुख |
| कालगांव | आचार्य |
| कुडाळ | देसाई |
| " | देशमुख |
| कोंढीत | वडधे |
| कोल्हापूर | धर्माधिकारी |
| कोंदाट | मोरे |
| कुंद्गोळ | देसाई |
| खर्डे | पीर |

| गांव | घराणें |
|---|---|
| खानापूर | घोरपडे |
| खामगांव | भोसले पाटील |
| गोळवली | पाध्ये |
| गुंजण | शिलिमकर देशमुख |
| " | देसाई |
| गोवें | सर ज्योतिषी, सरदेसाई |
| चाकण | म्हले |
| चाफळ | देशपांडे, मठ |
| चेऊल | |
| चांवली | सरनाईक |
| जमखिंडी | देशपांडे |
| जेजुरी | पेशवे |
| जिंती | भोसले |
| डोमगांव | मठ |
| तुळापूर | मलकरे |
| त्र्यंबकेश्वर | ढेरगे-भोसल्याचे उपाध्ये |
| नागोठणें | कुलकर्णी |
| नाशिक | धर्माधिकारी |
| " | तीर्थोपाध्ये |
| नींव | सदानंद |
| पाटगांव | मौनीबाबा |
| पाडोळी | पाटील |
| पानवहाळ | कोंढाळकर |

| गांव | घराणें | गांव | घराणें |
|---|---|---|---|
| पुणतांबें | जोशी | मोरेश्वर | इनामदार भगत |
| पुणें | पुरंदरे | म्हसवड | माने |
| ,, | होनप-देशपांडे | मंगळवेढें | |
| ,, | ठकार | मंगळूर | साठे |
| पुरंदर घेरा | सरनाईक | मुंगसेर | कुळकर्णी |
| पेठ | पुरंदरे | येरवडे | चित्राव |
| पेढ | धनगर | रहाटवडे | चोरघे |
| प्रतापगड | | रोहिडखोरें | गुप्ते-देशपांडे |
| पंढरपूर | आराध्ये | ,, | जेधे-देशमुख |
| फलटण | निंबाळकर | रांझे | गुजर पाटील |
| फोंडे | सरदेसाई | वडतुंबी | जेधे |
| बावडे | अमात्य | वाई | देशपांडे |
| बेडसिंगे | पाटील | ,, | चित्राव |
| बेलसरे | पाटील | वाळवें | देशपांडे |
| बोकडवाग (गोवें) | सरदेसाई | वेळवंडखोरें | कंक |
| बोरी | पाटील | शिरवळ | देशपांडे |
| भोर | सांगवी | ,, | निगडे देशमुख |
| मह्वर | जगदळे | शिरसवडे | पाटील |
| ,, | बुधकर | शिरोळे | देसाई |
| मालवण | अभ्यंकर | शिवरे | पाटील |
| मावळंग | सरदेसाई | सातारा | राजोपाध्ये |
| मिरज | काजी | सासवड | बोकिल |
| मुरुम खोरें | सिलीमकर | सुपे | देशपांडे |
| | देशमुख | संगमनेर | कुळकर्णी |
| मुसे खोरें | देशमुख | सिंहगड | कोळी |
| | पासलकर | सोंधें | सोंधेकर |
| मोरगांव | चौधरी | हनगंडी | देसाई |
| ,, | गोसावी | हिवरे | बोकील |

---

# शिवशाहींतील अधिकारी.

( शिवशाहींतील सुभेदार, सरसुभेदार व हवालदार यांचीं उपलब्ध पत्रांत आढळणारीं कांहीं नांवें अक्षरानुक्रमानें देऊन पुढें शक दर्शविले आहेत. )

अनाजी पंडित–कोकण श. १५९६
आवाजी महादेव–भिवंडी श. १५७८
" मोरदेव–जावळी श. १५९८
आमाजी कान्हो–कोरेगांव श. १५९८
एसाजी गणेश–पुणें श. १५९५
" मल्हार–वाई श. १५९८
" राम–निंब श. १५९८
अंबाजी मोरदेव जावळी श. १५९८
काशी रंगनाथ–जावळी श. १६०२
कुकाजी बयाजी–सातारा श. १५९७
कृष्णाजी भास्कर–मावळ श. १५८०
केदारजी फिरंगोजी–उटलूर श. १५९९
कोनेर रुद्र–मावळ श. १६०१
" रंगनाथ–कल्याण श. १५९८
खंडो बायदेव–अथणी श. १५९९
खेम सावंत–कुडाळ श. १५९८
गणेश जोगदेऊ–कोल श. १५९४
गणेश पंडित–कुडाळ श. १६०१
गणो राम–कुडाळ श. १६०२
गिरमाजी तुकदेव–भिवगड श. १५९८
" पंडित–डिचोली श. १५९९
गोपाळ रायाजी–जावळी श. १५९९
गंगाजी मुद्गल–कन्हेपठार श. १५९२
गंगाधर मुद्गल–चिंचवड श. १५९८
जावजी कृष्ण–पाटगांव श. १६०२
जिजोजी कादकर–सज्जनगड श. १५९८
जिवाजी विनायक–प्रभावळी श. १५९६
तानाजी जनार्दन–नीरथडी श. १५९३
तानाजी राम–वेंगुर्ली श. १६००
त्रिंबक गोपाळ–पुणें श. १६०१
" पंडित–फोंडा श. १५९९
" वासुदेव–कन्हेपठार श. १५९७
" सोनदेव– श. १५८७
तुकाजी प्रभु–सुपे श. १५९८
तुकोराम सुभेदार–प्रभावळी श. १५९३
दत्ताजी त्रिमल वाकनीस श. १५९६
दसमाजी नरसाला–महिपतगड श. १५९८
दादाजी अनंत–वाळवे श. १५८२
दादाजी बापाजी–खडकवासले १५९७
धर्माजी नागनाथ–फोंडा श. १५९८
नरहरी आनंदराव–कुडाळ श. १५९३
नाईकजी खराडे–मसूर श. १५९६
नागोजी भोसले–उटलूर श. १५९९
नारो निळकंठ–श. १५९६
" भिकाजी–तळकोंकण श. १५८१
निळो सोनदेव–श. १५८५
नेताजी पालकर–तळबीड श. १५८५
पदो नारायण–कोंढाणा श. १५८०
परसोजी राजे–निगडी श. १५८७
पिलाजी निळकंठ–प्रभावळी श. १५८३
" घाटगे–कागल श. १५९१
पंताजी गोपिनाथ–सासवड श. १५९७
बकाजी फर्जंद–नांदेड श. १५९५

बजाजी नागनाथ–वेहरवडे श. १५९९
बहिरो शिवदेव–मलकापूर श. १५९९
बाजी घोलप–पुरंदर श. १५९६
„ सर्जाराव–भोर श. १५९१
बाबाजी गस्ताम्रे श. १६००
„ विठ्ठल–मलकापूर श. १६०१
बाळाजी आवजी–दाभोळ श. १५९६
भानजी गोपाळ–कऱ्हाड श. १६०२
भिमाजी मल्हार–कोरेगांव श. १५९८
मल्हारजी यशवंतराव–शिरवळ- १५९७
मल्हारजी लेंढे–बिगाड श. १५९०
महादाजी अनंत–सातारा श. १५९८
„ पंडित–कोंकण श. १६०१
„ नरस–मावळ श. १५९७
„ शामराज–मावळ श. १५९६
„ राम–शिरवळ श. १५९३
मेरेश्वर पंडितराव श. १५९६
मोरो दादाजी–डिचोली श. १६०१
„ त्रिमल–पेशवे श. १५९६
„ निबाजी–पुणें श. १५९७
यशवंत शहाजी–चालगुडानूर श. १५९९
येसाजी मल्हार–वाई श. १६०१
रावो अनंत–कल्याण भिवंडी श. १५७८
„ बल्लाळ–जुन्नर श. १५९८
„ भास्कर–पुणें श. १५९७
रामाजी अनंत–प्रभावळीं श. १५९८
„ हवालदार–कोंडाणा श. १५८०
„ जगताप–सुपे श. १५९८
रायाजी गंगादास–भिवगड श. १५९०
रावजी पंडित–कुडाळ श. १५८५
विठ्ठल दत्तो–जावळी श. १५९३
„ पीलदेव–मावळ श. १५९४
विठोजी सिलिंबकर–गुंजणमावळ श. १५९०
विसाजी गंगाधर श. १५९९
„ पंडित–अंकोला श. १६००
„ बल्लाळ श. १५९०
विरोराम–जावळी श. १५८७
व्यंकाजी रुद्र–कोले श. १५९९
शामजी आवजी–जाळगाऊ श. १५९७
शंकराजी निळकंठराव–सुपे श. १५९३
सर्जाराव देशमुख–रोहिडखोरे श. १५८४
हणमंतराव खराडे श. १५९९

# सूची.

( आंकडे लेखांकाचे आहेत )

# शिवचरित्रसाधन समितीचे

## यापुढील

## संकलित ग्रंथ

१ शिवचरित्रसाहित्य खं. ५ वा.

( कर्नाटकांतील शहाजीकालीन मराठी, कानडी व फारसी पत्रें. )

२ शिवचरित्रसाहित्य खं. ६ वा.

( महाराष्ट्रांतील व कर्नाटकांतलि शिवशाही-विषयक पत्रें. )

३ वृत्तसारसंग्रह भाग १.

( फारसी, कानडी, आणि संस्कृत ग्रंथांतील शिवचरित्रोपयोगी उतारे )

# भारत–इतिहास–संशोधक–मंडळ–स्वीय–ग्रंथमाला

* अशी खूण केलेले ग्रंथ मुंबई सरकारानें प्राथमिक व दुय्यम शाळांच्या पुस्तकालयांसाठीं मंजूर केले आहेत.

| अनुक्रम | किंमत रु. |
|---|---|
| १ अहवाल ( शके १८३२ ) | ३ |
| २ „ ( शके १८३३ ) | ५ |
| +३ सुवंत विचार(के.वि.का.राजवाडे) | १० |
| ४ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३४ ) | ५ |
| ५ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १२ (के.वि.का.राजवाडे) | १८ |
| *६ प्रथम संमेलन वृत्त (शके १८३५) | ०१२ |
| *७ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३५ ) | ६ |
| *८ द्वितीय संमेलन वृत्त ( शके १८३६ ) | ३ |
| *९ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३६ ) | ३ |
| *१० मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड २० ( शिवकालीन घराणीं ) | ३ |
| *११ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३७ ) | ६ |
| *१२ तृतीय संमेलन वृत्त (शके १८३७) | ३ |
| *१३ मुकुंद–महाभाष्यं ( संस्कृत ) | ०८ |
| *१४ ग्रंथराज ( दासोपंत ) | ०८ |
| *१५ स्फुट प्रकरणें भाग १ ला | ०१२ |
| *१६ स्फुट प्रकरणें भाग २ रा | ०१२ |
| *मंडळ–त्रैमासिक-१८४२-४३-४४-४५-४६-४७-४८-४९-५०-५१-५२-५३-५४-५५-५६-५७ प्रत्येकी रु. | ३ |
| *१७ वार्षिक इतिवृत्त ( शके १८३८ ) | ३ |
| १८ चतुर्थ-संमेलन-वृत्त (शके १८३८) | ३ |
| *१९ राजवाडे-खंड-स्थलसूची | ४ |
| *२० पंचम संमेलन-वृत्त (शके १८३९) | ३ |
| २१ संशोधनसंग्रह (१८३९) छापत आहे. | |
| २२ चंद्रचूड–दप्तर–कला १ | ३ |
| २३ महाराष्ट्र–सारस्वत (संपलें) | |
| २४ षष्ठ संमेलन-वृत्त ( १८४० ) | ४ |

| अनुक्रम | किंमत रु. |
|---|---|
| २५ सप्तम संमेलन वृत्त ( १८४१ ) | ३ |
| २६ संशोधकाची छोटी जंत्री (श्री.द.वि. आपटे ) | ०४ |
| २७ प्रदर्शन परिचय | ०४ |
| *२८ फारसी पत्रव्यवहार–मूळ व भाषांतर ( कंपनी व पेशवे ) | ५ |
| २९ फार्सी–मराठी–कोश | ४ |
| ३० शिवचरित्र साहित्य खंड १ ला | १८ |
| ३१ Historical Miscellany | ३ |
| ३२ पुरंदरे-दप्तर-भाग १ (रु.वा.पुरंदरे) ( छत्रपति राजाराम ते पानिपत अखेर ) | ४ |
| ३३ शिवचरित्र साहित्य खं. २ रा. | ४ |
| ३४ द. म. इतिहासाचीं साधनें खंड १ ला | २ |
| ३५ ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खं.१,२ | |
| ३६ राजाराम–चरितम् | १८ |
| ३७ मंडळांतील नाणीं | १ |
| †३८ शिवचरित्र साहित्य खंड ४ था | १८ |
| ३९ A History of the late Revolution in the Kingdom of Golconda मराठी विवेचन | रु. ४ |
| †४० ऐतिहासिक फारसी साहित्य खंड १ ला. | १८ |
| †४१ दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें खंड २ रा. | २ |
| †४२ ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खंड ३ रा. | १८ |
| ४३ मंडळ चित्र ग्रंथ–चित्रें २० किं. | ०८ |

टीप–ट. ह. ष यांची, व्ही. पी. वगैरे खर्च निराळा पडेल. घाऊक घेणारांस चांगलें कमिशन् देऊं. माहितीपत्रक मागवा. + दुर्मिळ समय वाढविलेल्या किंमती. † हा ग्रंथ त्रैमासिकांत भागशः प्रसिद्ध झाला आहे.